भारत इतिहास संशोधक मंडळ पुरस्कृत ग्रंथमाला क्रमांक २४.

# राजधानी रायगड.



लेखक

विष्णु वासुदेव जोशी.



शके १८५१

किंमत १ रुपया

[ मंडळाचे सभासदांस बारा आणे ]

# पुरस्कार

( १ ) रा. जोशी यांनीं श्रीशिवाजी महाराजांचे त्रिशतसांवत्सरिक-महोत्सवाचे निमित्तानें राजधानी रायगड हें लहानसें पुस्तक लिहून काढून मंडळाकडे पुरस्कारार्थ पाठविलें. रा. जोशी यांच्या विनंतीचा कारभारी मंडळानें विचार करून अखेर तिचा स्वीकार केला.

( २ ) रा. जोशी यांनीं प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें त्यांनीं आपलें पुस्तक आकर्षक करण्यासाठीं ऐतिहासिक संकलनाच्या शास्त्रीय मर्यादा कोठें कोठें उल्लंघिल्या आहेत. त्यामुळें बखरींतली हल्लीं निराधार व भ्रामक ठरलेली कांहीं माहिती रा. जोशी यांनीं चिकित्सेच्या अभावीं स्वीकारिली आहे. त्याचप्रमाणें रम्य भावना व मोहक भाषा यांना वश होऊन " मराठ्यांचीं युद्धें " या सारख्या ग्रंथांतील काव्यमय विचार-सरणीहि उतरून घेतली आहे; इतकेंच नव्हे, अनुसरलीहि आहे. असे जरी कांहीं दोष या पुस्तकांत असले तरी साधार अशी बरीच ऐतिहासिक माहिती रायगड किल्ल्याविषयीं रा. जोशी यांनीं जुळवून येथें दाखल केली आहे. ती महत्वाची आहे आणि एवढ्यासाठीं तिचापुर-स्कार मंडळानें केला आहे.

सुपरीक्षित व सुनिर्णीत अशी माहिती किल्ले रायगडबाबत अल्पच उपलब्ध आहे. ही ग्रंथकारास एक मोठीच अडचण भासणारी आहे. त्या-मुळें नवीन माहिती या गडाच्या रहाळांत हिंडून शोधून मिळविल्या शिवाय रायगडचा सुसंगत, साधार, व भ्रान्त कल्पनांपासून अलिप्तसा मनोरम इतिहास रचून प्रसिद्ध करितां येणार नाहीं. रा. जोशी हे उत्साही आहेत आणि आतां त्यांनीं रायगडचा विषय हातीं घेतला आहे त्यापक्षीं ही पुढील कामगिरी पुरी करण्याची जबाबदारी त्यांचेवर आपोआपच येऊन पडते. ती ते पुरी करतील अशी आशा आहे.

आपलीं मतें सांगण्याचा सर्वांसच हक्क आहे. त्याप्रमाणें अर्थात् मतभेदाचे विषय होण्यासारखींहि विधानें या पुस्तकांत आहेत तथापि तो विषय अलाहिदा आहे.

रा० जोशी परस्थळीं राहात असल्यामुळें ग्रंथ स्वतःचे देखरेखीखालीं त्यांस छापवून घेतां आला नाहीं त्यामुळें मुद्रणदोषहि ग्रंथांत पुष्कळच राहिले. तथापि रा० जोशी यांचे पुढें असलेले प्रवासी वाचक यांची विशेष गैरसोय होईल असें भय वाटत नाहीं.

रा. जोशी यांनीं आपलें काम अत्यंत प्रतिकूल स्थितींत विशेष उत्साहानें केलें आहे. त्यामुळें पुढील आवृत्तींत हे दोष जाऊन नवीन माहिती व नवी मांडणी यांनीं ती अलंकृत करून ते सर्वांची –म्हणजे शास्त्रीय इतिहासाचे वाचक व साधारण रसिक वाचक या उभयतांची–संतुष्टि साधनील अशी आशा वाटते.

दोष फार लवकर दिसतात व त्यांचा बोभाटाहि फार होतो; गुणांवर बरेच वेळां नजर पोंचावी तितकी पोंचत नाहीं. तरी असा प्रकार या ग्रंथासंबंधानें न व्हावा आणि रा० जोशी यांनीं केलेल्या प्रयत्नांस शक्य तितकें प्रोत्साहन यावें याच हेतूनें या ग्रंथास पुरस्कृत–ग्रंथ–मालेंत स्थान दिलें आहे. तीच दृष्टि ठेऊन रा. जोशी यांचे ग्रंथाचा स्वीकार महाराष्ट्र करील तर पुढील काम करण्यास त्यांस उत्साह प्राप्त होईल.

ज्येष्ठ शु॥ ६
पुणें १८५२

**दत्तो वामन पोतदार.**
चिटणीस भा. इ. सं. मंडळ, पुणें.



श्री शिवाजी महाराजांच्या समाधीवरील छत्री.

# प्रस्तावना.

रायगड किल्ला ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्वाचा आहे. दरवर्षी पुष्कळ प्रवासी रायगड पाहण्यास येतात. "हिंदवी स्वराज्याची पहिली राजधानी" ह्या भावनेनें रायगडची यात्रा करणारेच प्रवासी पुष्कळ. अशा प्रवाशांना उपयोगीं पडावें, म्हणून हें पुस्तक लिहिलें आहे. रायगडच्या वर्णनाचीं छोटीं दोन पुस्तकें ह्यापूर्वीं मराठींत प्रसिद्ध झालीं आहेत. प्रस्तुत पुस्तकांत रायगड विषयक संपूर्ण ऐतिहासिक माहिती संकलित करण्याचा प्रयत्न केला असून, प्रवाशांना उपयुक्त असे मार्ग व स्थळवर्णन हीं संपूर्ण दिलीं आहेत. इतिहास समकालीन अस्सल पत्रांचा उपयोग करून लिहिला पाहिजे हें लक्षांत वागवन, कै० इतिहासाचार्य राजवाडे यांच्या खंडांचा व इतर साहित्याचा भरपूर उपयोग केला आहे. परंतु पत्रावरून उपलब्ध झालेल्या माहितींत मध्यंतरीं जो खंड पडला तो बखरी वगैरेंच्या साह्यानें भरून काढला आहे. सोन्याचे मणी ओवून मध्यंतरीं राहिलेल्या जागा कलाबतूनें भरून काढाव्या तशांतलाच हा प्रकार. रायगडावर येणाऱ्या प्रवाश्यांची दृष्टि इतिहासकाराइतकी चिकित्सक नसून, यात्रेकरूसारखी भाविक असते. म्हणून पुस्तक लिहितांना वर्णनें व माहिती थोडी भावनापूर्ण व क्वचित् सावेश अशी लिहिलीं आहेत. एकंदर पुस्तक मनोरंजक व्हावें म्हणून, कै० प्रो. शि. म. परांजपे यांच्या "मराठ्यांचीं युद्धें" या पुस्तकांतील रायगडविषयक काल्पनिक मोहक वर्णनें व श्री. भालचंद्र यांच्या तीन सुंदर कविता समाविष्ट केल्या आहेत. शुद्ध इतिहास कथनाच्या कसोटीला हा मनोरंजपकणा उतरणार नाहीं हें कबूल केलें पाहिजे व त्याकरतां शेवटीं इ. सं. शंकरराव जोशी यांचा खुलासा जोडला आहे. सारांश, हें पुस्तक मुख्यत्वें करून "रायगड हें राजकीय पुण्यक्षेत्र आहे" अशा भाविकपणें जे यात्रेकरु तेथें जातात व तेथील स्थल–कालाच्या इतिहासाची पृच्छा करतात, त्यांच्या भाविक जिज्ञासेला तृप्त करण्यासाठीं लिहिलें आहे. मला वाटतें रायगडच्या प्रवाश्यांना हें पुस्तक यथायोग्य माहिती पुरवील. रायगडावर गेल्यावर उत्पन्न होणारे "कोठें व काय" हे प्रश्न सोडविण्यास या पुस्तकाचा उपयोग झाल्याविना राहणार नाहीं.

हें पुस्तक रायगडावर यंदा ( शके १८५१ ) होणाऱ्या उत्सव प्रसिद्ध व्हावें म्हणून थोडे घाईनें छापिलें. त्यामुळें मुद्रितें कसोशीनें सतां आलीं नाहींत. दुसरें असें कीं माझें राहणें दूर खेडेगांवीं अर मुळें पुस्तक स्वतःच्या देखरेखीखालीं छापितां आलें नाहीं म्हणून दोषस्थळें राहिलीं आहेत.

रायगडचा साधार, संपूर्ण व सत्य असा सर्वांग परिपूर्ण इतिहास ि वयाचा असला तर रायगडच्या आसमंतात् हिंडून बरेंच संशोधन-व्हावयास पाहिजे; मीं थोडासा तसा प्रयत्न केला आहे. परंतु अद्याप पु ळच अस्सल आधार उपलब्ध व्हावयास पाहिजेत. पुढील आवृत्तीचा आल्यास तसा प्रयत्न करून पुस्तकाची उपयुक्तता वाढविण्याचा माझा नस आहे.

पुस्तक लिहितांना भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या ग्रंथालयाचा उपयोग करून घेण्याची परवानगी मंडळाच्या चालकांनीं दिली; व ि पुस्तक पुरस्कृत ग्रंथमालेतर्फे पुरस्कृत केलें; याबद्दल मी मंडळाचा व ि णिसांचा आभारी आहे.

आचार्य भागवत यांच्या समर्थ–ग्रंथ संग्रहालयाचाही मला प्रामुख उपयोग झाला. या संग्रहानें माझी आधारग्रंथ मिळण्याची अडचण केली.

माझें पुस्तक "राजगुरु आणि कंपनी" यांनीं प्रसिद्ध करण्य ठरवून वेळच्यावेळीं व सुंदर असें छापून प्रसिद्ध केलें याबद्दल मी त्या कं नीच्या चालकांचा ऋणी आहे.

हा ग्रंथ लिहिण्याचे कामीं मला ज्या कित्येक विद्वान् ग्रंथकारांच्या ग्रं चा व लेखांचा उपयोग झाला त्या सर्व ग्रंथकारांचे मी अत्यंत नम्रत पूर्वक आभार मानतों.

माझ्या कित्येक विद्वान् आणि प्रेमळ मित्रांनीं मला सर्वतोपरी साह्य के त्यांचा मी सदैव ऋणी आहे.

मु० बिरवाडी
मकरसंक्रांत
शके १८५१

आपला नम्र,

**विष्णु वासुदेव जोशी.**



# राजधानी रायगड.

## अनुक्रमणिका.


**प्रकरण १ लें:--विषयोपक्रम.** [ १ ] गुलामगिरीचें मोहपटल [ २ ] मानसिक उत्क्रांति. [ ३ ] स्वातंत्र्यात्मा सह्याद्री. [ ४ ] सह्याद्रीचें स्थान. [ ५ ] शिखरें [ ६ ] ऐतिहासिककालीं किल्ल्यांचें महत्त्व. [ ७ ] तुलना. [ ८ ] रायगडचें स्थान. [ ९ ] पुढील प्रकरणाचा उपोद्घात.

**प्रकरण २ रें:--शिवपूर्वकालीन रायगड.** [ १ ] दख्खनची प्रादेशिक स्थीरता. [ २ ] श्री. दिक्षीत यांच्या निबंधांतील उतारा. [ ३ ] राजगिरी [ ४ ] आणखी उतारे.

**प्रकरण ३ रें:—शिवकालीन रायगड.** [ १ ] जहागिरदार शिवाजी. [ २ ] शहाजीची कैद. [ ३ ] पुत्रवात्सल्य व पितृभक्ति [ ४ ] चंद्रराव मोऱ्याला मदत. [ ५ ] चंद्ररावाशीं बिघाड. [ ६ ] राजगडचा ताबा. [ ७ ] राजगड राजधानी. [ ८ ] रायगडचा कबजा. [ ९ ] शकासंबंधी भिन्न मतें. [ १० ] निश्चित अनुमान. [ ११ ] राजकारणाचें पर्यालोचन. [ १२ ] विजापुरकर व मोंगल यांचें भांडण. [ १३ ] औरंगजेबाचा राग. [ १४ ] विश्वासघाताचा सूड. [ १५ ] राजगडावरील हालचाली. [ १६ ] सुरक्षित राजधानीची आवश्यकता. [ १७ ] रायगडचा सुरक्षितपणा [ १८ ] दुर्गम रायगड. [ १९ ] युद्ध साहित्याला

अडथळा. [ २० ] राजधानी हीच राष्ट्राची इभ्रत. [ २१ ] आरमाराची उत्पत्ति. [ २२ ] यशाची गुरु-किल्ली [ २३ ] जंजिरा व रायगड [ २४ ] सुवर्णमध्य रायगड. [ २५ ] राज्याभिषेक महोत्सव ( २६ ) उत्सव समयींचे पाहुणे. [ २७ ] राज्याभिषेक महोत्सवाची फलश्रुति. [ २८ ] जिजाईचा मृत्यु. [ २९ ] राजधानीची बांधणी. [ ३० ] महाराजांचा मृत्यु-
१६–५५,

**प्रकरण ४ थें:--रायगडावरील दुर्घटना** [ १ ] राजारामाचें मंचकारोहण. [ २ ] संभाजीची सुटका व रायगडावरील नरमेध. [ ३ ] बिरवाडी येथील दरबार. [ ४ ] ,, संभाजीच्या रायगडवरील हालचाली. ५०–६१

**प्रकरण ५ वें: --रायगडचा वेढा.** [ १ ] संभाजीचा वध. [ २ ] येसूबाईचें धीरोदात्त वर्तन. [ ३ ] रायगडावरील ऐक्य परिषद [ ४ ] वेढ्याची हकिगत [ ५ ] पाडाव व लूट [६] पुन्हां रायगड घेण्याचा प्रयत्न. ६२–६८

**प्रकरण ६ वें:--पेशवाईतील रायगड.** [ १ ] दोन उपमा [ २ ] राजकारणाचा दुवा. [ ३ ] सातारा राजधानी [४] जंजिऱ्यावरील स्वारीचा पूर्वेतिहास [ ५ ] बाजीरावाची जंजिऱ्यावरील स्वारी. [ ६ ] रायगड ताब्यांत आला. [ ७ ] शिद्दीशीं तह. [ ८ ] किल्लेदाराची बंडखोरी. [ ९ ] रायगडास उपद्रव [ १० ] तोतयाचें बंड व रायगडाचा बंदोबस्त [ ११ ] शत्रूपासून बचाव. ६९–८०

**प्रकरण ७ वें:--रायगडच्या स्वातंत्र्याचा शेवट.** [ १ ] रायगडची मजबुती. [ २ ] कॅ. प्रॉथर वेढा देतो. [ ३ ] दारु कोठाराचा भडका. [ ४ ] अखेरचा तह. [५] [ कै. शि. म. परांजपे यांच्या मराठ्यांच्या लढाया

या ग्रंथांतील उतारे. ] वाराणसी बाईचा बाणेदारपणा [ ६ ] कांगोरी व प्रतापगड यांची मदत [ ७ ] किल्ल्यांची सभा. ८१-८९

**प्रकरण ८ वें:--इंग्रजी अमलांतील रायगड** [ १ ] उत्सव व राष्ट्र जागृति. [ २ ] शिवाजी उत्सवाचें विरोधी वर्णन. [ ३ ] रायगडची दुर्दशा. [ ४ ] सरकारचें लक्ष वेधलें [ ५ ] लो० टिळकांचे प्रयत्न. [ ६ ] हिराबागेंतील सभा व स्मारक फंडाचा इतिहास. [ ७ ] पहिल्या महोत्सवाची पूर्व तयारी. [ ८ ] पहिला उत्सव. [ ९ ] पुढचे प्रयत्न. [ १० ] एक जुना प्रयत्न. [ ११ ] दुसरा उत्सव. [ १२ ] तिसरा उत्सव. [ १३ ] चवथा उत्सव [ १४ ] रायगड शिवस्मारक कमेटी. [ १५ ] रायगड व कुलाबा जिल्हाबोर्ड. ९०-११०

**प्रकरण ९ वें:- रायगडावर जाण्याचे नवे व जुने मार्ग.** [ १ ] मार्गांचा अनिश्चितपणा. [ २ ] मुख्य केंद्रें [ ३ ] मुंबई ते महाड. [ ४ ] पुणें ते महाड. [ ५ ] कोल्हापुर ते महाड. [ ६ ] गोवें ते महाड. [ ७ ] कल्याण ते महाड. [ ८ ] महाडचें वर्णन [ ९ ] महाड ते रायगड. [ १० ] माणगांव ते रायगड. [ ११ ] निजामपूर ते रायगड. [ १२ ] बिरवाडी ते रायगड [ १३ ] प्रवासांत सूचना [ १४ ] आसपास [ १५ ] छत्री-निजामपूर [ १६ ] शिवतर घळ [ १७ ] ऐतिहासिक माहिती. [ १८ ] पाल्याचीं लेणी. [ १९ ] कांगोरी किल्ला. [२०] दोन जुने मार्ग. १११-१२३

**प्रकरण १० वें:- रायगडचें आजचें दर्शन.** [ १ ] रायगडचा पायथा [ २ ] नाना दरवाजा [ ३ ] महा दरवाजा [ ४ ] गंगासागर तलाव [ ५ ] मनोरे [ ६ ] राजसभा

[ ७ ] नगारखाना [ ८ ] बाजार पेठ [ ९ ] जगदीश्वराचें मंदीर [ १० ] महाराजांची समाधि व छत्री [ ११ ] बारा टाकीं [ १२ ] भवानी टोंक [ १३ ] [ १४ ] किरकोळ माहिती. १२४–१३५

**प्रकरण ११ वें:–उपसंहार** [ १ ] तरुणांच्या आकांक्षा [ २ ] तुलसीदल [ ३ ] ग्रंथाचें समालोचन [ ४ ] अभिवादन. १३६ –१३९

**परिशिष्टः–** [ १ ] दिलचंगा [ २ ] अनुचर [ ३ ] हिरकणी. १४०–१४५

[ २ ] रायगडावरील इंग्रज कैदी–( शं. ना. जोशी ) शिवकाल. १४७. ,,

[ ३ ] रायगड शकावली १५० ,,

[ ४ ] कांहीं खुलासा. १५३ ,,

[ ५ ] शुद्धीपत्र १५६ ,,

---




# रायगडचा घेरा,

------ पायवाट

═══ गाडीरस्ता




# किल्लेरायगड.

तयार करणार: य. वि. जोशी, शिक्षक, चिखली.

# राजधानी रायगड

## प्रकरण १ लें.

### विषयोपक्रम.




त्रियकुलावतंस छत्रपती शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याची पहिला राजधानी रायगडीं स्थापन झाली, म्हणून रायगडास महाराष्ट्राचें किंबहुना अखिल भारताचें राजकीय पुण्यक्षेत्र म्हणण्यास हरकत नाहीं. बाराव्या शतकाचे अखेरीस मुसलमानांचा हिरवा झेंडा दक्षिणेंत फडकल्यापासून सारी दख्खन त्यांच्या राजकीय आघातांनीं हादरून गेली. विजयनगरच्या बलिष्ठ हिंदू साम्राज्याचा मुसलमानांनीं पराभव केल्यापासून तर आसेतु दख्खन त्यांच्या राजकीय व धार्मिक अर्धचंद्राखालीं पिचली गेली. माने, घाटगे, चाळके, शिंदे, सावंत, शेलार इ. इ. पराक्रमी मराठे सरदार मुसलमानांच्या सत्तेचे भक्त बनले. आपल्या स्वातंत्र्याचा विसर त्यांना पडून मुसलमान बादशहांकडुन मिळणाऱ्या किताब-जहागिरींतच ते धन्यता मानूं लागले. पारतंत्र्यपंकांत लोळण्याची संवय झालेले हे पिढीजाद राजे त्या पंकांत पिचत पडण्यांतच अहमहमिकेनें भाग घेऊं लागले. बादशाही नोकरीच्या सोनेरी बेड्यांनीं बद्ध झालेले हे पराक्रमी हात आपलें शक्तिसर्वस्व खर्चून मायभूमीला पारतंत्र्यांत जखडून टाकणाऱ्या बादशाही सत्तेचे आधारस्तंभ बनले. पोपटाची अशी गोष्ट सांगतात कीं, तो फासेपारध्यानें लाविलेल्या नळीवर बसतांच स्वतःच्या भारानें नळी फिरून उलटा होतो व

आपण पडूं नये म्हणून नळीला जास्त जास्तच घट्ट धरून ठेवितो. आणि आश्चर्य हें कीं, सुटण्यासाठीं पंख सारखे फडफडवीत असतो. पारतंत्र्यांत सांपडलेल्या मनाची अशीच तिरचागडी पक्कड बसल्यागत स्थिति होते. तें धड त्या पारतंत्र्यांत रहात नाहीं पण पारतंत्र्याचा आधार तर सोडीत नाहीं. उलट जास्तजास्तच बळकट धरीत राहतें. तेराव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत महाराष्ट्राची हुबेहुब अशीच स्थिति झाली होती. लुकजी जाधवराव, शहाजी–मालोजी निंबाळकर यांसारखे मातबर व फौजबंद सरदार कोणत्या तरी बादशहाला कुंकवाचा धनी करून आपण राजकीय घडामोडींत अग्रपूजेचा मान मिळवीत. बादशहत ही मुसलमानांकरितां ईश्वरानें उत्पन्न केलेली आहे. तिचा ताम्रपट मुसलमानांच्या नांवें करून दिला आहे. ही गुलामी मनोवृत्ति तत्कालीन सर्व नाणावलेल्या सरदारांच्या ठायीं दिसून येते.

२. ह्या गुलामी वृत्तीच्या राखेच्या ढिगांतून क्रांतीच्या वावटळीनें असा एखादा स्फुलिंग उत्पन्न होतो कीं, तो सर्व राष्ट्रच्या राष्ट्र नव्या विचाराच्या अग्निज्वालेनें भडकवून टाकितो. तशा प्रकारचा पुरुष सतराव्या शतकाच्या प्रारंभींच महाराष्ट्रांत उदयास आला. क्रांतिकारक पुरुषाचें आयुष्य उपजल्यापासून क्रांतीचे आघात करीत सुटतें. मुसलमान बादशाह सिंहासनावर बसावा आणि आपण समोर हात बांधून " खाविंद ! आपके बंदे गुलाम " म्हणून कुर्निसात करावा ही तत्कालीन सरदारांची नित्याची गोष्ट सुद्धां तो क्रांतिकारक करावयास अगदीं अल्पवयांत धजेना. हा क्रांतिकारक " शिवाजी " होय, हें वाचकांनीं ओळखिलें असेल. "स्वराज्याची उत्कट इच्छा व परकीय सत्तेचा पुरा वीट " हेंच शिवाजी व त्याचे जोडीदार यांच्या कर्तबगारीच्या मुळाशीं असलेलें तत्त्व ! याच्या आड येणाऱ्या प्रत्येक गोष्टींत त्यांनीं परंपरा झुगारून क्रांतीच केली. मग दरबारांतून करावयाचा कुर्निसात असो अगर अफझुलखानाचा वध असो. शिवाजीनें केलेली ही क्रांती राष्ट्रास पारतंत्र्याच्या खोल गर्तेतून स्वातंत्र्याच्या देदीप्यमान सिंहासनाकडे नेणारी अशी झाली.

३. नगाधिराज हिमालयाचें विशाल भव्य सौंदर्य पाहून अनेक प्राचीन व अर्वाचीन कवींनीं त्याचें काव्यस्तोत्र गाइलें, हें हिमालयाचें पावित्र्य पाहून

त्याला ' देवतात्मा ' असें म्हटलें तर आमच्या सह्याद्रीला ' स्वातंत्र्यात्मा असें म्हटलें पाहिजे. सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत असलेलीं २४ मावळें म्हणजे स्वातंत्र्याचें मूर्तिमंत निवासस्थान होय. दक्षिणेंत जरी त्या मुसलमानी पादशहांचा अम्मल सर्वत्र नांदत होता तरी ह्या मावळ खोऱ्यांत राहणाऱ्या मावळ्यांच्या मनावर त्याचा गुलमी मुलामा कधींच चढला नाहीं. मावळचे देशमुख-देशपांडे आपापल्या मुलखांत पूर्ण स्वतंत्र असत. बादशाहाची ' पगडीबदल ' झाली तरी ह्यांच्या स्वातंत्र्यास त्यामुळें बाध येत नसे. सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांत वावरणारे मावळे दिसण्यांत जरी बावळे असले तरी त्यांच्या ठिकाणीं स्वातंत्र्याभिमान पूर्णपणें वावरत होता. खोऱ्यांतील एकाच जलप्रवाहाचें पाणी पिणारे, एकाच देशमुखाच्या ताब्यांत वावरणारे, मायभूमीची सेवा करून स्वकष्टानें उत्पन्न झालेलें अन्न खाणारे हे लोक, राजकीय आर्थिक व धार्मिक बाबतींत नेहमीं पूर्ण स्वावलंबी असत. पश्चिमसमुद्रावरून येणाऱ्या वाऱ्यानें पडणारा विपुल पर्जन्य, पर्वताच्या उतरणीवर उगवणाऱ्या विपुल वृक्षश्रेणींनीं नटलेला हरिततृणांकुराच्छादित रम्य भूप्रदेश, शुद्धोदकाचे असंख्य निर्झर, व अशा पवित्र व रम्य वातावरणांत वावरणारे सात्त्विक अंतःकरणाचे मावळे लोक, अशी परिस्थिति जेथें असेल तेथें पारतंत्र्याचे पाश कसे टिकून राहाणार ? म्हणूनच उंच डोंगरांच्या गिरिशिखरांवर आणि दऱ्याखोऱ्यांतून स्वातंत्र्य मूर्तिमंत वावरत असतें असें म्हटलें जातें. *

४. सह्याद्रीची रांग पश्चिमसमुद्राच्या (अरबी समुद्र) तटाशीं समांतर आहे. मुख्य पर्वताची ओळ व समुद्रकिनारा यांत सुमारें २५ मैलांची जमिनीची एक पट्टी आहे. या भूप्रदेशास कोंकण असें म्हणतात. सह्याद्रीचे समुद्राकडील अंग जास्त उंच आहे. व पूर्वेकडे तो क्रमाक्रमानें उतरता होत गेला आहे. सह्याद्री व समुद्र यांमधील कोंकणपट्टी जरी सखल आहे, तरी ती सपाट नाहीं. पर्वताचे कित्येक फाटे थेट समुद्रात सोंडेसारखे घुसले आहेत. सह्या-

*मावळ प्रांतांतील देशमुख, देशपांडे फारच स्वतंत्र वृत्तीनें वागत. मलिकंबरची राज्याच्या अंतर्व्यवस्थेसंबंधीं फार प्रसिद्धी आहे. पण त्याच्या वेळींहि हे मावळ प्रांतांतील देशमुख मुख्य सत्तेला जुमानून नसत, याचें कारण या प्रांताची विशिष्ट भूपृष्ठरचना हींच असावें.

द्रीच्या दक्षिणोत्तर रांगेशीं काटकोन करणारे हे फाटे कित्येक ठिकाणीं मुख्य ओळीशीं सलग आहेत तर कोठें तिच्याशीं विलग आहेत. कित्येक मुख्य रांगेपासून दूर समुद्रतीरीं आहेत, तर कित्येक मुख्य रांगेच्या नजीकच पण विलग आहेत. हिमालयाच्या क्रमाक्रमानें चढत्या अनेक रांगा असून त्या मुख्य रांगेशीं समांतर आहेत. त्यांत दोन समांतर रांगा मुख्य आहेत. सह्याद्रीची रचना अशी नाहीं. त्याची मुख्य एकच एक उंच रांग असून तिच्यापासून पूर्वेस व पश्चिमेस अनेक ' सोंडा ' काटकोन करून निघाल्या आहेत. सह्याद्रीचे जे फाटे पूर्वेस म्हणजे देशावर गेले आहेत त्यांत विलग किंवा सुटे डोंगर क्वचित् आढळून येतात. जे फाटे पश्चिमेस गेले आहेत त्यात विलग डोंगर बरेच आहेत. सह्याद्रीच्या मुख्य रांगेपासून विलग असलेल्या ह्या डोंगरावर शिवपूर्वकालीं व शिवकालीं कित्येक डोंगरी किल्ले बांधिले गेले. सह्याद्रीच्या ओळीची समुद्रसपाटीपासून सुमारें सरासरीं उंची ४००० फूट आहे. या ओळींत कित्येक शिखरें ह्यापेक्षां उंच आहेत. महाबळेश्वर, माथेरान, सप्तशृंग, अंजनेरी, मलयागिरी, कळसूबाई इत्यादि उंच शिखरें म्हणून सांगतां येतील. हीं शिखरें उंच असलीं तरी त्यांवर एकही डोंगरी किल्ला बांधिला गेला नाहीं. याचें कारण असें—शिखरांची उंची समुद्रसपाटीपासून बरीच उंच असली तरी मुख्य पर्वताच्या पठारावरून त्यांची उंची कमीच असते. पर्वताच्या पठारावर उभे राहणाऱ्याला शिखरें फारशीं उंच वाटत नाहींत. मुख्य ओळीच्या पठारावर येण्याची वाट रोखून धरणें जड जातें. पर्वताच्या लांबच लांब रांगेवर शत्रू कोठूनही येऊं शकेल व त्या पर्वतशृंगाला वेढा देऊं शकेल. दुसरें सह्याद्रीच्या पठारावर फारशी वस्ती नाहीं. मुख्य वस्ती वर सांगितलेल्या दोन सोंडांमधील दऱ्यांत किंवा मावळांत आहे. या मावळ मुलुखावर जरब बसण्यासाठीं बांधावयाचा किल्ला खोऱ्यापासून दूर व उंच अशा शिखरांवर असण्यापेक्षां त्या दऱ्याखोऱ्यांच्या आसपास असावा हेंच योग्य. हें झालें सह्याद्रीच्या उंच उंच शिखरांवर डोंगरी किल्ले कां नाहींत याचें सामान्य विवेचन. आतां एक दोन विशिष्ट परिस्थितिमुळें उपस्थित झालेल्या कारणांचा विचार करूं.

सह्याद्रीवर आढळणारा काळा कातळ ( खडक ) हा ज्वालामुखीच्या

उद्रेकामुळें वर आलेल्या लाव्हारसापासून बनला असावा. उंच शिखरांवरील माती शेंकडों वर्षांच्या पर्जन्यानें धुपून धुपून निवळ काळ्या कातळाचे उंच सुळकेच शिल्लक उरले आहेत. ही गोष्ट महाबळेश्वरावरील एखाद्या टोका-वर उभें राहिलें असतां अगर रिव्हर्सिंगवर उभें राहिलें असतां प्रतीत होते. अशा कातळी सुळक्यांवर जिवंत पाणी लागणें अशक्य. किल्ल्यांत राहणाऱ्या लोकांसाठीं पाण्याची योजना प्रथम करावी लागते. शक्य तों पाण्याचा जिवंत झरा असणें ही किल्ल्याच्या सुस्थितीची महत्त्वाची बाब आहे. किल्ल्यावर राहणाऱ्या लोकांच्या अन्नपाण्याची तरतूद भरपूर असणें इष्ट. ऐतिहासिककाळीं जमीन महसूल हल्लींप्रमाणें नक्त रुपये न घेतां ऐनजिनसी-धान्य, गवत, कडबा इत्यादिकांत घेत. रायगड तालुक्यांत असलेल्या कित्येक गांवांतून ऐतिहासिक काळीं धारा भाताच्या रूपानें रायगडावर नेऊन घात-ल्याचा जमाखर्च अद्याप पहावयास मिळतो. * ऐनजिनसी धारा कुळानें मामलतदाराच्या राहत्या गांवीं नेऊन भरण्याची चाल होती. हे मामलत-दार बहुधा एखाद्या डोंगरी किल्ल्यावर राहात. तेथें कुळांना धारा म्हणजे ‘ धान्य ’ नेऊन पोहोंचवावें लागे. म्हणून हे किल्ले पर्वताच्या उंच पठारा-वरील शिखरांवर न बांधितां लोकवस्तीच्या नजीक बांधण्याची योजना योग्य ठरली.

सह्याद्रीच्या मुख्य रांगेशीं काटकोन करणाऱ्या डोंगराच्या सगल व विलग ओळींत बांधिलेल्या महाराष्ट्रांतील किल्ल्यांचें प्रयोजन काय ? ऐतिहासिक कालीं महाराष्ट्राच्या राजकीय घडामोडींत किल्ल्यांचें महत्त्व फार असल्याचें दिसून येतें. यादवांची राजधानी दौलताबाद ऊर्फ देवगिरी हें नगर. तें देखील एका मजबूत डोंगरी किल्ल्याच्या आश्रयाला आहे. शत्रूंपासून आपला बचाव करण्याचें एकच साधन म्हणजे किल्ला होय। पाण्यांतील किल्ल्यानें किनाऱ्याचें रक्षण व नाकेबंदी होते. डोंगरी किल्ल्यानें चौफेर मुलखाचें रक्षण व नाके-बंदी होते. भुईकोट किल्ला फक्त नगराचें रक्षण करण्यास समर्थ असतो. ऐतिहासिक कालीं या तिन्हीही किल्ल्यांचें महत्त्व राजकारणी पुरुषांस किती वाटत असे याचें प्रत्यंतर रामचंद्रपंत अमात्यकृत आज्ञापत्रांत

* परवांपर्यंत जंजिरासंस्थानांत जमीन महसूल भाताच्या रूपानें घेत.

आढळून येईल.* प्रस्तुत स्थळीं आपणांस महाराष्ट्रांत आढळून येणाऱ्या डोंगरी किल्ल्याच्या स्थलविशेषाचा विचार कर्तव्य आहे. ह्या विचार करतांना शिवकालीं महाराष्ट्रांत प्रांतोप्रांतीं असलेल्या किल्ल्यांची संख्या जरूर विचारांत घेतली पाहिजे.

| प्रांत | | | गडांची संख्या |
|---|---|---|---|
| वाई ( सातारा ) | ... | ... | ११ |
| कोंकण | ... | ... | ५८ |
| कऱ्हाड | ... | ... | ४ |
| मावळ | ... | ... | १८ |
| पन्हाळा | ... | ... | १३ |
| बागलाण | ... | ... | ७ |
| त्रिंबक | ... | ... | २५ |
| फोंडे बिदनूर | ... | ... | १२ |
| कर्नाटक | ... | ... | १८ |
| श्रीरंगपट्टण | ... | ... | २२ |
| येलूर ( वेलोर ) | ... | ... | २५ |
| बनगड | ... | ... | २२ |
| कोल्हापूर-बाळापूर | ... | ... | २७ |

*" गडकोटाचा आश्रय नसतां फौजेच्यानें परमुलखीं टिकाव धरून राहवत नाहीं. फौजेविरहित परमुलखी प्रवेश होणेंच नाहीं. इतक्याचें कारण तें गडकोट विरहित, जे राज्य त्या राज्याची स्थिति म्हणजे अभ्रपटलन्याय आहे. याकरितां ज्यांस राज्य पाहिजे त्यांनीं गडकोट हेंच राज्य गडकोट म्हणजे राज्याचें मूळ, गडकोट म्हणजे राज्याचा खजिना, गडकोट म्हणजे सैन्याचें बळ गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपलीं वसतिस्थळें, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार. किंबहुना गडकोट म्हणजे आपलें प्राणसंरक्षण असें पूर्ण चित्तांत आणून कोणाचें भरंवशावर न राहतां आहे त्याचें संरक्षण करणें व नूतन बांधण्याचा हव्यास स्वतःच करावा गडकोट संरक्षणाचें कार्य फार नाजूक "

[ रामचंद्रपंत अमात्यकृत आज्ञापत्र पृष्ठ ८।२८ ]

| प्रांत | | | गडांची संख्या |
|---|---|---|---|
| चंदी | ... | ... | ६ |
| एकूणसंख्या | ... | ... | २६८* |

हा किल्ल्यांचा प्रचंड प्रपंच पाहिला म्हणजे तत्कालीन राजकीय सुरक्षिततेचे किल्ले हेच मुख्य ' आधारस्तंभ ' होते, ही गोष्ट प्रत्ययास येईल. सोनोपंत डबीर ( युक्त्यभिज्ञ) यांनीं किल्ल्यांचें महत्त्व महाराजांना पटवून देतांना शिवभारतकारांनीं त्यांच्या तोंडी खालील उद्गार घातले आहेत.

॥ अतोऽतिदुर्गमस्थानमास्थाय जगतीपते ॥
॥ यतस्व जगतीं जेतुं किमजय्यं शिवस्य ते ॥ ५९ ॥
॥ कंठ कालेन कैलासः सुमेरुः शंबपाणिना ॥
॥ अभ्यंतरमपां पत्युः शिश्रिये दनुजारिणा ॥ ६० ॥
॥ न दुर्गं दुर्गमित्येव दुर्गम मन्यते जनः ॥
॥ तस्य दुर्गमता सैव यत्प्रभुस्तस्य दुर्गमः ॥ ६१ ॥
॥ प्रभुणा दुर्गमः दुर्गं प्रभुर्दुर्गेण दुर्गमः
॥ अदुर्गमत्वादुभयोर्विद्विषमेव दुर्गमः ॥ ६२ ॥

अर्थः——म्हणून महाराज अत्यंत दुर्गमस्थानीं राहून जग जिंकण्याचा यत्न करा; तुम्हां शिवाजी महाराजांना काय कमी आहे ? शंकरानें कैलासाचा, इंद्रानें मेरूचा, आणि विष्णूनें समुद्राचा आश्रय केला आहे.

दुर्गाला केवळ दुर्ग म्हणूनच लोक दुर्गम मानीत नाहींत तर त्याचा स्वामी दुर्गम असणें हीच त्याची दुर्गमता होय.

प्रभूमुळें दुर्ग दुर्गम होतो व दुर्गामुळें प्रभु दुर्गम होतो. दोघांच्याही अभावीं शत्रूच दुर्गम होतो.

सुधारलेल्या जगांत उत्तरोत्तर शस्त्रास्त्रांचा तिखट राक्षसीपणा वाढत चालल्यामुळें जगाच्या युद्धशास्त्रांत आतां या जुन्या गडांचा व भुईकोटांचा मुलाहिजा राहणार नाहीं असें दिसतें. हे गडकोट तोफा—बंदुकांच्या गोळ्यां-

* मल्हाररामरावकृत सप्त प्रकरणात्मक शिवचरित्रांत प्रांतवार किल्ल्याची नांवनिशीवार यादी दिली आहे. ही बखर शाहूकालीन आहे.

पासून फार तर सैन्याचें रक्षण करतील. पण विमानाच्या साह्यानें अंतरिक्षांत उडून होणारा बाँबचा वर्षाव, विषारी धूर, प्राणघातक औषधी यांच्यापासून बिचारे किल्ले कसें रक्षण करणार ? म्हणून आजकाल किल्लयांचें महत्त्व राजकर्त्यांना व विजिगिषु राष्ट्रांना फारसें वाटत नाहीं. तरी पण गेल्या महायुद्धांत अँटवर्पसारख्या एका किल्लयानें चतुरंगबलान्वित जर्मनीच्या सर्व सामर्थ्यास अनेक दिवस एकट्यानें तोंड दिलें ! जिब्राल्टरचा रुक्ष डोंगरी किल्ला ताब्यांत ठेवण्याबद्दल आमच्या ब्रिटिश साम्राज्यसत्तेचा केवढा अट्टाहास ! सारांश अद्याप देखील किल्लयाचें युध्दशास्त्रदृष्ट्या महत्त्व सर्वस्वीं नष्ट झालें नाहीं.

मग ज्या काळीं बाण, गोफणगुंडे, तरवारी, भाले, तोड्याच्या बंदुका व लहान लहान तोफा हीच काय तीं युद्धाचीं मुख्य साधनें होतीं, त्या काळीं किल्लयांचें महत्त्व किती असेल ? चवथ्या परिच्छेदाच्या शेवटीं सांगितल्या-प्रमाणें सह्याद्रीच्या पश्चिमेस व पूर्वेस पसरलेल्या डोंगरांमधील खोऱ्यात असणाऱ्या डोंगरी किल्लयांचें ऐतिहासिक कालीं फार महत्त्व असे. कोंकण हा प्रांत धान्याच्या दृष्टीनें जरी भिकार असला तरी तो पश्चिम समुद्रालगतचा प्रांत आहे. परदेशाचा सर्व व्यापार ह्या कोंकणी बंदरांतून चालू असे. व्यापारी जकातीचें फार मोठें उत्पन्न या प्रांतांतून राज्यकर्त्यांस होत असे. शिवाय मीठ, मासळी वगैरे अत्यंत उपयोगी वस्तूंचा पुरवठा देशावरील लोकांस कोंकणांतूनच होई ! म्हणून इतक्या डोंगराळ नापीक प्रदेशावर ताबा ठेवण्याची क्षत्रिय व नंतरच्या मुसलमान राज्यकर्त्यांची महत्त्वाकांक्षा असे. देशावरून कोंकणांत जाण्यास सह्याद्रीच्या खिंडींमधून ठिकठिकाणीं वाटा आहेत. या वाटा रोखून धरल्या कीं, देश व कोंकण यांमधील ' ये जा ' बंद पडत असे. या वाटा रोखून धरण्यासाठीं उंच जागीं सैन्य असलें पाहिजे. म्हणून अशा घाटांच्या तोंडाशीं दोन्ही बाजूला बहुधा डोंगरी किल्ले आढळून येतात. वरंध्या घाटाचे रक्षणास कांगोरी किल्ला, पार घाटाचे नाकेबंदीस प्रतापगड, अंबवली घाटाचे गेखानें रसाळगड, तिवराघाटाचे पहाऱ्यास प्रतीतगड, कुंभारली घाटानजीक जंगली जयगड इ० इ०

सह्याद्रीच्या पूर्व-पश्चिम उतारावर जीं खोरीं आहेत तींच २४ मावळें

होत. प्रादेशिक दृष्टया प्रत्येक मावळ हें नैसर्गिक परिसीमांनीं अलग म्हणजे स्वतंत्र आहे. ऐतिहासिक काळीं प्रत्येक मावळखोर हें जणूं काय एक स्वतंत्र राज्यच होतें. या डोंगरी राज्यांतील राजाला—देशमुखाला आपलें राज्य सुरक्षितपणें चालविण्यासाठीं डोंगरी किल्ल्यावरच आपलें अधिष्ठान ठेवावें लागे. हे डोंगरीकिल्ले सह्याद्रीच्या मुख्य रांगेशीं काटकोन करणाऱ्या डोंगरावर बांधलेले आढळतात. किल्ला ज्या डोंगरावर बांधिलेला असतो तो डोंगर रांगेपासून अलग म्हणजे सुटा असून इतर डोंगरांच्या ओळींपेक्षां उंच असावा लागतो. तो खोऱ्याच्या मध्यवर्ती असला तर उत्तम. तसेंच मुख्य किल्ल्यांच्या घेऱ्यांत टेहळणीसाठीं लहान लहान गढयांची सोय करीत असत. त्यावेळीं हल्लींसारखी बातमी जलद पोहोंचविण्यास बिनतारी संदेशवाहक अगर तारायंत्र हीं साधनें नव्हतीं. एका मुख्य किल्ल्याच्या ताब्यांत समाविष्ट असणाऱ्या भूप्रदेशांत वार्ता प्रसारांचीं बावटा उभारणें, कर्णा फुंकणें, आगटी पेटविणें, तोफांचे आवाज काढणें इत्यादि साधनें होतीं. सरहद्दीच्या प्रदेशांत शत्रूचा प्रवेश झाल्यास त्याची बातमी मुख्य किल्लेदाराला देतां यावी अशी योजना प्रदेशाच्या सीमाप्रांतीं करून ठेविलेली अद्याप आढळून येते. महाराष्ट्रांतील किल्ल्यांच्या परस्परवार्ताहारी संबंधाचा यापेक्षां जास्त प्रपंच येथें करणें अप्रस्तुत होईल, म्हणून हें विवेचन येथेंच संपवून पुढील विषयाकडे वळूं.

कांहीं किल्ले खाडीच्या अगर पश्चिमसमुद्रावरील बंदराच्या रक्षणार्थ बांधले गेले आहेत. इ० स० च्या ५व्या शतकांपासून हिंदुस्तानच्या पश्चिम-किनाऱ्यावरून व्यापारी गलबतें निघून तीं अरबस्तान, आफ्रिका, यूरोप, जावा, सुमात्रा इ० परद्वीपांत जात असत. हा व्यापार फारच किफायतशीर असल्यामुळें व्यापारी दृष्टया पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांना फारच महत्त्व आलें होतें. या बंदरांचा राजकीय ताबा ज्याच्या हातीं असे त्या राजकर्त्याला द्रव्यलाभही बराच होई. हीं संपन्न व्यापारी शहरें द्रव्यलोभानें शत्रूकडून लुटलीं जाणें फार संभवनीय असे. समुद्रकाठीं अगर खाडीकाठीं असलेल्या शहराच्या संरक्षणास डोंगरी किल्ला अवश्य असला पाहिजे, तसेंच एखाद्या खाडींतून शत्रूचीं गलबतें आंत येऊन

त्यांनीं मुलखास उपद्रव देऊं नये म्हणून खाडीच्या तोंडाशीं व तीरावर किल्ले बांधिले आहेत. चिपळूण बंदराच्या रक्षणास ' गोवळकोट, ' बाणकोटच्या खाडीच्या तोंडाशीं 'बाणकोट', तीरावर 'मदनगड', जंजिऱ्याच्या खाडीच्या तीरावर 'तळगड', 'घोसाळगड' रेवदंड्याच्या खाडीकाठीं 'बिरवाडीचा किल्ला' ( ता. रोहें ) हीं उदाहरणें वरील विवेचनाचें सत्यत्व लक्षांत आणून देतील. जलयुद्धांत ( आरमारी लढाई ) जलदुर्गांचा ( जंजिरे किल्ले ) जसा उपयोग होतो, तसाच ह्या तीरावरील प्रदेशांत असणाऱ्या किल्ल्यांचा उपयोग होतो. म्हणून कोंकण प्रांतांत सह्याद्रीच्या मुख्य रांगेच्या सन्निध जसे डोंगरी किल्ले विपुल आढळतात तसेंच समुद्रासन्निध अनेक किल्ले आढळतात. देशावरील प्रदेशांत आढळणाऱ्या किल्ल्यांच्या संख्येपेक्षां कोंकणांत किल्ल्यांची संख्या तुलनात्मक दृष्टीनें जास्त ठरेल. याचें कारण वरील विवेचनावरून लक्षांत येईल. गड, कोट व जंजिरे यांचा युद्धशास्त्रदृष्ट्या स्वतंत्र विचार करावयाला युध्दशास्त्रविशारद असा संशोधक पाहिजे. वरील विवेचन सामान्यतः पुढील विषयाच्या उपन्यासादाखल केलें आहे.

७ कोंकणांतील किल्ले समुद्रसपाटीपासून जितके उंच आहेत, त्यापेक्षां देशावरील किल्ल्यांची उंची जास्त आढळून येतें. याचेंही कारण पाहिलें पाहिजे. सह्याद्रीच्या पूर्वउतरणीवर जे डोंगरांचे फाटे आहेत त्यावर देशावरील किल्ले बांधिले आहेत. तर कोंकणचे किल्ले समुद्रसपाटीपासून फारशा उंच नसलेल्या पातळीवर उभारिले आहेत. देशावरील किल्ल्यांच्या उंचीला तेथील स्वाभाविक उंच भूप्रदेशाची जोड मिळते. बापाच्या खांद्यावर उभा राहिलेला मुलगा बापापेक्षा उंच ठिकाणची वस्तु काढूं शकतो. तसाच हा प्रकार आहे. सिंहगडाची समुद्रसपाटीपासून उंची ४३१६ फूट आहे. व रायगडची उंची २८५१ फूट आहे. दोन्ही किल्ल्यावर स्वतः जाऊन आलेल्या माणसाला विचारिलें कीं,पायथ्यापासून कोणत्या किल्ल्याचा चढाव जास्त वाटतो ? तर तो "रायगड किल्ल्याचा" असेंच उत्तर देईल. सारांश कोंकणांतील किल्ले " मूर्ति लहान पण कीर्ती मोठी " या म्हणीचे सार्थक करणारे आहेत. म्हणून निवळ समुद्रसपाटीपासून उंचीचे आंकडे

पाहून तुलना करणारास कोंकणांतील किल्ले ठेंगणे—कमी उंच—वाटतील. पण आजिंक्यपणा, बचाव नाकेबंदी इत्यादि गुणांत ते सरस आहेत.

८ येथपर्यंत महाराष्ट्रांतील किल्ल्यांचें सामान्य उद्घाटन केलें. ऐतिहासिक-कालीं किल्ल्याचें महत्त्व इतकें कां मानिले गेलें हें यावरून वाचकांच्या नजरेस येईल. आतां प्रश्न असा कीं स्वराज्याची पहिली राजधानी शिवाजी महाराजांनीं 'रायगडींच' कां स्थापन केली? या प्रश्नाचा सांगोपांग विचार पुढें एका प्रकरणांत विस्तरशः करणार असल्यामुळें येथें प्रादेशिक दृष्ट्याच विचार करावयाचा आहे.

इंग्रजी अमलांतील राजकीय विभागाप्रमाणें रायगड किल्ला कुलाबा जिल्ह्यांतील महाड तालुक्यांत मोडतो. त्याचें स्थान [ उत्तर अक्षांश १८।१४ व पूर्व रेखांश ७३।२० महाडाच्या उत्तरेच्या पूर्वेस सुमारें १० अंशावर व १६ मैल अंतरावर आहे. कुलाबा जिल्ह्याच्या पूर्व हद्दीवर सह्याद्रीची ओळ आहे. महाड तालुक्याच्या पूर्व हद्दीवरही सह्याद्रीची ओळच आहे या ओळीशीं समांतर असा एक डोंगर छत्री निजामपूर पासून तों चांभारगडापर्यंत पसरला आहे. ही रांग व सह्याद्रीची ओळ यांत काळनदीचें प्रचंड खोरें पसरलें आहे. अशा रीतीनें मुख्य रांगेपासून अलग व शिवळ्या घाटांच्या उतारानजीक रायगड किल्ला आहे. रायगड व सह्याद्री ह्यांचेमधील दरीची पायथ्याशीं रुंदी १ मैल व पृष्ठभागामधील अंतर २ मैल आहे. वर जी अलग अशी समांतर रांग सांगितली त्या रांगेची उंची फारशी नाहीं. त्या रांगेच्या पठारावर उत्तरटोंकाशीं पूर्वेकडे चोहोंकडून अलग असा एक बहुश्रृंगी डोंगर आहे. तोच रायगड उर्फ रायरीचा किल्ला. याची समुद्रसपाटी पासून उंची २८५१ फूट आहे. कोणत्याही दिशेनें रायगडावर चढण्याचा प्रयत्न करणारास एक खोरें उतरावें लागतें. पुन्हां चढावें तेव्हां रायगड ज्या डोंगरी रांगेच्या पठारावर आहे, तेथें पोहोंचतां येतें.* तेथून पुन्हां गडाची चढण स्वतंत्र चढावयाची असते. उत्तर पूर्व व दक्षिण या तीन बाजूंनीं काळ-

* या पठाराची उंची समुद्रसपाटीपासून सरासरी ५०० फूट आहे. रायगडच्या पायथ्याशीं असलेल्या पाचाडची समुद्रसपाटीपासून उंची ६०० फूट आहे. येथून फक्त रायगड किल्ला २२५१ फूट चढावा लागतो.

नदीनें (महाड तालुक्यांतील) रायगडास वेढिलें आहे. पश्चिम बाजूला नात्याच्या गांधारी नदीचें खोरें पसरलें आहे. अशा प्रकारें चोहोंकडून खोऱ्यांनीं परिवेष्टित असा रायगड किल्ला "रायगड पाहाडी किल्ला चांगला आजूबाजूस शत्रूची फौज बसावयास जागा नाहीं, घोडें माणूस जाण्यास महत्संकट वरकड किल्ले पन्हाळे वगैरे बहूत पण खुलासेवार व मैदान मुलखांत यास्तव आजच्या प्रसंगास हीच जागा बरी. येथें लवकर उपद्रव होऊं न शकेल." ( म. रियासद भा. १ पृ. ३६२ ) या अवतरणावरून स्वराज्याची पहिली सुरक्षित राजधानी होण्यास भूपृष्ठ रचनेनें देखील कसा लायक होता हें दिसून येईल.

९ इतक्या विवेचनानंतर विषयोपक्रमाची समाप्ती करून रायगडावरील राजकीय पुण्यपंढरीच्या प्रवाश्यांना निरनिराळ्या मार्गांनीं तिकडेच नेणें इष्ट आहे. वाचकहो पुढील प्रकरणीं आपण रायगडाची ऐतिहासिक माहिती मिळवूं.



# प्रकरण २ रें.



## शिवपूर्वकालीन रायगड.



रायगड किल्ला मूळ कोणत्या राजानें बांधिला अगर शिवपूर्व कालीं त्याची राजकीय व्यवस्था कशी काय होती याबद्दल प्रस्तुत प्रकरणीं ऊहापोह करावयाचा आहे. प्रथम हें कबूल करावें लागेल कीं, रायगडचा मध्ययुगीन इतिहास संगतवार लिहितां येईल अशी ऐतिहासिक विश्वसनीय साधनें आज उपलब्ध नाहींत. रायरीचा किल्ला मध्ययुगीन राज्यकर्त्यांनीं बांधला असला पाहिजे. पहिल्या प्रकरणांत सह्याद्रीला आम्ही “ स्वातंत्र्यात्मा ” म्हटलें आहे. त्याचें प्रत्यंतर पृथ्वी वसतिक्षम व्हावी म्हणून मनुष्याला पश्वादिकांशीं प्रथम प्रथम जीं युद्धें खेळावीं लागलीं त्यावरूनही दिसून येईल. ओबड धोबड दगडी आयुधांनीं दक्षिण द्वीपकल्पांत वावरणाऱ्या प्राण्यांबरोबर युद्ध खेळून, त्यांना नामशेष करून, ही भूमि स्वतंत्र केल्याचें प्रत्यंतर गोदावरी व नर्मदा यांच्या मधील डोंगराळ मुलखांत खालीलायक आढळतें. प्राकृतिक बाबतींत दक्षिण हिंदुस्थानची स्थिरता अत्यंत श्रेष्ठ प्रकारची आहे. या प्रदेशांत सृष्टिमाता भूकंपाचे धक्के, ज्वलत्पर्वताचे स्फोट, भूमिप्रपात, इ. इ. बालिश खेळ कधींच खेळत नाहीं. ही प्रादेशिक स्थिरता दक्षिण हिंदुस्थानच्या राजकारणांतही दिसून येते. इतिहासाचें सूक्ष्म अध्ययन करणारास दाक्षिणात्यांची ही निश्चलता प्रतीत होईल.

२. श्री. दीक्षित सुपरिंटेंडंट पुराणवस्तु संशोधन खातें, यांनीं सन १९२६ सालीं रायगडावर जो उत्सव झाला त्यावेळीं वाचण्यासाठीं एक निबंध धाडला होता, त्यांत ते म्हणतात, “ ऐतिहासिक युगाविषयीं पाहतां सह्याद्री व घाटमाथा यावर अनेक शतकें अंमल राखून महाराष्ट्राचें स्वातंत्र्य शातवाहननामें प्रसिद्ध असलेल्या राजवंशानें अढळ राखिलें. या शातवाहन अथवा आंध्र राजांनींच प्रथम सह्याद्रीच्या निरनिराळ्या घाटांतून वहातुकीची

उत्तम साये करून देण्याकडे लक्ष पुरविलें असावें. तसेंच कांहीं महत्त्वाच्या ठिकाणीं डोंगरपठारावर लेणी कोरून, हौद बांधून व मजबुती करून किल्ले बांधण्याच्या पद्धतीची मुहूर्तमेढ रचिली असावी. सुप्रसिद्ध शिवनेरी किल्यावर पाण्याचीं टाकीं आहेत, तीं या आंध्र राजांच्या वेळचीं असावीं. त्यानंतर चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, ब्राह्मणी राज्य निजामशाही या सर्व अमदानींत किल्यांवर वस्ती होण्याची पूर्वतयारी त्या प्राचीन काळींच झाली असें दिसतें."

३. रायगडचें जुनें नांव रायरी. रायरी हा 'राजगिरी' या संस्कृत नांवाचा अपभ्रंश आहे. शिवपूर्वनांव ज्या अर्थी संस्कृतोत्पन्न आहे, त्या अर्थी तें कोणा हिंदू राजकर्त्यानें दिलें असलें पाहिजे. या किल्ल्यावर एखादा जुना शिलालेख वगैरे नसल्यामुळें त्याची प्राचीन माहिती मिळविण्याचीं साधनें लुप्त झालीं आहेत. तेराव्या शतकाचे अखेरीपर्यंत दक्षिणहिंदुस्थानांत यादवांचें राज्य होतें. दक्षिणेंत मुसलमानांचा प्रवेश झाला. त्यापूर्वी रायगड हा किल्ला एका मराठे पाळेगाराच्या ताब्यांत होता. बाराव्या शतकांत रायरी डोंगराचे भोंवतालील मुलूख एका मराठे पाळेगाराच्या ताब्यांत होता. रायरी हें त्या पाळेगाराचें राहण्याचें मुख्य ठिकाण होतें. चौदाव्या शतकांत हा मराठा पाळेगार विजयानगरच्या राजाचा मांडलिक झाला. शके १३५८ च्या सुमारास दुसरा अल्लाउद्दीनशहा बहामनी यानें त्याला आपल्या अमलाखालीं आणिला. शके १४०० च्या सुमारास हा रायरी मामला निजामशहाकडे आला.तो त्यांचेकडेच निजामशाहीचा नाश होईपर्यंत होता. पुढें हा मामला तहानें विजापुरकरांकडे गेला. तेव्हां एका ब्राह्मण सरदाराच्या ताब्यांत रायरी मामला व किल्ला होता. ह्या ब्राह्मण सरदाराचें नांव उपलब्ध नाहीं. मध्य कोकणांत निजामशहाचे प्रबळ सरदार शिर्के हे नांदत होते. वर ज्या मराठा पाळेगाराच्या ताब्यांत रायरीगड होता असें म्हटलें आहे; तो मराठा पाळेगार शिर्क्यांच्या वंशापैकींच कोणी पूर्वज असावा. हा किल्ला ताब्यांत आल्यावर शिर्क्यांनींच आपली कुलदेवता जी शिरकाई देवी तिची स्थापना केली. विजापुरकरांच्या अमदानींत शिर्क्यांचा किल्यावरील ताबा नष्ट झाल्यामुळें त्यांनीं माजी राज्यापासून असलेला आपला वतनी हक्क मिळविण्यासाठीं खटपट चालविली. शके १५७७ शिर्केराजे रायरी मामल्याच्या

हक्काबद्दल लिहितात. " आपलें कदीम वतन सरदेशमुखीचे मामले रायरी शिरकाण येथील आले. त्यास वडिलांनीं दलपतराव पाताणे *प्रभु मुतालिकीस ठेविला होता. तो कितीका दिवसांनीं बळकाऊन आपण वतनदारच म्हणून बळेंच वतन खाऊं लागला. " [ व. नि. पत्रें वाडकृत ७७ ] शिर्के घराण्याचें एक महजर व दुसरें निवाडा पत्र उपलब्ध आहे. त्यांत पुढील मजकूर आहे. " रायरी मामला महालबरा येथील सरदेशमुखी शिर्के यांची पुरातन निजामशहा पादशहांनीं दिली होती ती बहुत दिवस भोगवटा चालिला त्याजवर आपले वडिलांनीं वतनावर मुतालिक दलपतराव म्हणून पाताणा परभु ठेऊन आपण बादशाही मनसब करूं लागले. "

४. रायरीगडाला युरोपीयन लोक पूर्वेकडील जिब्राल्टर या नावानें ओळखीत. मुसलमान राजकर्ते इसलामगड असें त्यास म्हणत.

" १ किल्ले रायगड हा किल्ला पेशजी डोंगर होता. त्याचे नाव 'जंबुद्वीप' तणस म्हणत. घलकीचा पाहरा व अंधारी येथें निजामशाही पीर दर्गा मदार आहेत तेथे ठाणें काहींक दिवस होते.नंतर कोली घडसी याची वस्ती होती. उपरात शिवाजी महाराज याही किल्ला बांधिला किल्याचे नांव रायेगड ठेविले " [ महा० सा. प. वर्ष २ रें अंक २ ]

" १२ व्या शतकांत लहान लहान मराठे सरदारांच्या कुटुंबांचें हें निवासस्थान होतें. यांनीं १४ व्या शतकांत दुसरा अल्लाउद्दीन शाहावली यानें किल्ल्यांतील लोकांना खंडणी देणें भाग पाडिलें. त्यानंतर १४७९ [इ.स.] हा रायरी किल्ला अहमद नगरच्या निजामशाही सुलतानाच्या ताब्यांत जाऊन सन १६३६ पावेतों तो त्यांच्या हातीं होता. अहमद नगर जिंकल्यावर मोंगल लोकांनीं तो विजापुरच्या आदिलशाही सुलतानाच्या हवालीं केला. " [ ज्ञानकोश भाग १९ पृ. १०१ ]

१. कविलवाहाळ बु॥ [ ता. माणगांव ] या गांवीं या पाताणे प्रभु घराण्याची वसती १० वर्षापूर्वी होती. त्यांचा चौसोपी वाडा तेथें आहे. घराण्याचें आडनांव ' दलपतराव सरदेशमुख ' असें लागतें. यावरून वरील दलपतरावाचाच हा वंश असावा असें वाटतें. या घराण्यांतील शेवटचा पुरुष। ' आनंदराव पुतळाजी दलपतराव सरदेशमुख ' हे नुकतेच मयत झाले. हे गृहस्थ चांगलेच सुशिक्षित होते. त्यांच्या जवळील कागदपत्र नष्ट झाले आहेत.

# प्रकरण ३ रें.



## शिवकालीन रायगड.

॥ तहाँ राजधानी करी जीति सकल तरकान ॥
॥ शिव सरजा रुचि दानमें किनो सुजसुजहॉन ॥

शिवराजभूषण काव्य.

करी रायगड रायरिचा तो जिजाइचा तान्हा ॥

कै० गोविंदाग्रज.

रायगड किल्ल्याला सोन्याच्या सात पायऱ्या ॥

लोकगीत [ फोक्लोर ]



शहाजी राजांनीं विजापुराहून बालशिवाजीस पुण्याकडील जहागिरीच्या बंदोवस्तासाठीं जिजाबाईसह पाठविलें. राजांना ह्या मुसलमान पादशहांच्या विश्वासघातकीपणाचा पुरा अनुभव आला होता. या बादशाही नौकरीचा दुरून डोंगर साजरा असलेला बरा. खुद्द शहाजी राजांना तीनदां बादशाही नौकरीची पालटापालट करावी लागली. निजामशाहींतून दुसऱ्यांदा निवृत्त झाल्यावर राजांना सुमारें तीन वर्षें आपल्या पुणें जहागिरीवर रहावें लागलें. तसेंच पुन्हां कधीं नोकरी सुटून बेलाग राहण्याचा प्रसंग आला तर पुणें जहागिरीचा सवता सुभा मुक्त्यारीनें चालवितां यावा अशी तजवीज करण्याचा शहाजीराजांनीं दूरदर्शीपणाचा डाव मांडिला. बंगलुराहून शिवाजी महाराजांना पुणें प्रांताकडे रवाना केलें. तेव्हां म्हणजे शके १५६३ मध्यें शहाजीनें शिवाजीस जहागिरदार या नात्यानें आपले सर्व अधिकार दिले व मोकासदार या नात्यानें असलेल्या अधिकारांपैकीं कर्यात मावळचा अधिकार

दिला. दादोजी कोंडदेव ह्यांस कारभारी या नात्यानें इकडे पाठविलें होतें. दादोजींच्या कारकीर्दीतच शिरवळ व पुणें परगण्यांत दंगेधोपे सुरु झाले होते. पुढें दादोजी मरण पावल्यावर कारकुनांनीं नव्या खुर्दखतांचा उजुर ( तगादा ) लाविला. दादोजींच्या मागें पुणें जहागिरीची वहिवाट विजापूर दरबाराकडून शिवाजीला मिळेलच, अशी खात्री नव्हती. म्हणून शिवाजी महाराजांनीं ' खेडें बारें ' येथें बांधकाम सुरू केलें. पुणें प्रांतीं असलेल्या जहागिरीच्या बंदोबस्तास आसपासचे डोंगरी किल्ले ताब्यांत हवेत. कोंडाणा किल्ला ताब्यांत आल्यास पुणें प्रांताचें संरक्षण ठीक होईल. या कल्पनेनें शिवाजी महाराजांनीं कोंडाणा किल्ला भेदानें घेतला.

२. दादोजीचा मृत्यु, कोंडाण्याचा ताबा, इतर स्वतंत्र उद्योग, मावळ प्रांतीच्या देशमुखांचे तंटे इ. अनेक भानगडी या वेळीं शिवाजी महाराजां-पुढें उभ्या राहिल्या. कृष्णाजी बांदल देशमुख तर मलिकंबरापासून मावळ प्रांतीं जबरदस्तीनें वागे. शहाजी राजांना ह्या मावळच्या देशमुखांची जबर-दस्ती पूर्णपणें माहीत होती; म्हणूनच त्यांनीं " कान्होजी नाईक जेधे यांस शफत देऊन, शिवबा राजांजवळ जमावानिशी राहण्यास सांगितलें. " एखादा कर्तव्यदक्ष बाप आपल्या परदेशांत जाणाऱ्या मुलाची जितकी काळजी घेतो तितकी काळजी शहाजी राजांनीं घेतली होती. मावळांत जे देशमुख देश-पांडे वतनदार होते, ते अंतर व्यवस्थेंत जरी पूर्ण स्वतंत्र होते, तरी विजा-पूरच्या बादशाही सत्तेचें दिखाऊ दडपण त्यांचेवर होतेंच. स्वराज्यस्थाप-नेच्या शिवाजी महाराजांच्या प्रयत्नांस कित्येक देशमुखांचाच विरोध होता. ज्यांच्या मनावर बादशाही अमलाचें गुलामी दडपण होतें ते तर उघड अगर प्रच्छन्न स्वराज्याचे वैरी बनले. शिवाजीनें एकही सैनिक खर्ची न घालतां मोठ्या युक्तीनें सिंहगड ताब्यांत घेऊन तेथें मजबुती चालविली. या शिवाजीच्या धाडसी प्रयत्नाबद्दल कित्येक देशमुखांस व वतनदारांस वैषम्य वाटून त्यांनीं शिवाजीबद्दल विजापूर दरबारीं कागाळी केली. विजापुर दरबार शिवाजीवर रुष्ट झाला. पण ह्या बंडखोरीचा जाब शिवाजीसारख्या भुरट्या धाडशी तरुणास विचारण्यापेक्षां त्याच्या नामजाद बापास विचारणें

१५५८ च्या सुमारास निजामशाही नष्ट झाली. तेव्हां तळ कोंकण प्रांत तहानें विजापुरकरांकडे गेला. चंद्रराव मोरे, आपण विजापुरकरांचे सरदार या जोरावर ह्या प्रांतावरही हक्क सांगू लागला. तेव्हां माजी राज्यांतील ( निजामशाहींतील ) हक्कदारांनीं विजापूर दरबारकडे तक्रारी केल्या. त्यांत रायरी किल्ल्याचे किल्लेदार शिर्के यांनीं रायरी मामला आपणास मिळावा म्हणून विजापुर दरबारीं खटपट चालविली. चंद्ररावानें शिर्क्यांचा रायरी गड तर बळकाविलाच पण तो मामलाही ताब्यांत घेऊन आपला अंमल चालू केला. ह्या तक्रारींचा बंदोबस्त करण्यासाठीं अफजलखानास चंद्रराव मोऱ्यावर ,पाठविण्याचें विजापुर दरबारनें ठरविलें. अफजलखान शके १५७० त चंद्रराव मोऱ्यावर आला. चंद्ररावाचा भाऊ हणमंतराव याचे ताब्यांत जोर खोरें होतें. तें घेण्याची परवानगी खानानें जेध्यांना दिली.

" जोहर खोरे हणमंतराऊ कावीज आहेत हाली कान्होजी जेधे यास दिधले आहे ते खासा येऊन कावीज करतील करु देणे. त्यास मुकासा मऱ्हामती केला आहे. दुमाले करणे " ( खंड १५ पृ. ३६५ ) अफजुलखानानें जावळीहून चंद्ररावाची उठावणी करतांच तो रायरी गडावर ( रायगडावर ) येऊन राहिला. त्याच वेळीं शिवाजी महाराज वडिलांच्या सुटकेच्या खटपटींत होतें. चंद्ररावाला शिवाजीसारख्या धाडसी तरुणाचें साह्य पाहिजे होते; व शिवाजी महाराजांना चंद्ररावासारख्या फौजबंद बड्या सरदाराची सहानुभूति संपादावयाची होती. म्हणून दोघांनीं परस्पर सहकार्य करून चंद्ररावाला जावळी मिळवून दिली.

**गृहिता महिता लोके जयवल्ली मयापुरा ।।**
**स्थापितश्चंद्रराजश्च तस्यां तदभिलाषुका ॥**

शि० भा० १३-४३.

[ लोकांमध्यें प्रसिद्ध असलेली जावळी ( जयवल्ली ) मी पूर्वी घेतली; आणि तिचा अभिलाष धरणाऱ्या चंद्ररावाची तेथें स्थापना केली ]

५. या हकिकतीवरून शके १५७०-७१ पर्यंत चंद्रराव मोरे व महाराज यांचा सलोख्याचा संबंध होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

थोड्याच दिवसांनीं अनेक कारणें उत्पन्न होऊन महाराज व चंद्रराव मोरे यांचें वांकडें आलें तीं कारणें अशीं:—

शके १५७३ च्या सुमारास बिरवाडीच्या पाटलाचें व चंद्ररावाचें वांकडें आलें. तेव्हां तो शिवाजीमहाराजांकडे आला व त्याला त्यांनीं आश्रय देऊन मिरासही दिली. (तृ. सं. वृ. पृ. १६७।८.)

मुसे खोऱ्यांतील शिवाजी महाराजांच्या मुलखांतील एक आरोपी पळून जावळीस चंद्ररावाच्या आश्रयास राहिला. (खं. १५ पृ. २७४).

विजापुरकरांकडून शिवाजी महाराजांस कपटानें अचानक धरण्यास आलेल्या बाजी शामराज या शिलेदारास चंद्ररावानें आश्रय व मदत दिली.

रायगड शिवाजी महाराजांनीं चंद्रराव मोऱ्यापासूनच घेतला असल्या-मुळें, प्रस्तुत स्थळीं चंद्रराव मोऱ्याच्या राजकारणासंबंधें सविस्तर वर्णन करणें इष्ट आहे. अफजुलखानाची स्वारी आली, त्यावेळीं शिवाजीची मदत घेणारा चंद्रराव लगेच शिवाजीच्या विरुद्ध कारस्थान करूं लागला. त्याला मूळ कारण बिरवाडीच्या पाटिलकीचें भांडण होय. बिरवाडीच्या पाटिलकी-वर चोरघे देशमुख सरखोत गुंजण मावळचे, चंद्रराव मोरे जावळीकर व कोंडे देशमुख असे तिघे हक्क सांगत होते. चंद्रराव मोरे व सिलीमकर देशमुख हे मामा भाचे. ह्या चंद्ररावाच्या भानगडींत सिलीमकर देशमुख शिवाजी महाराजांच्या बाजूचा होता. महाराजांनीं बिरवाडीची पाटिलकी आपल्या अधिकारांत सिलीमकर देशमुखांस दिली. यामुळें चंद्रराव चिडीस जाऊन, तो महाराजांचें उघड शत्रुत्व करूं लागला.

चंद्ररावाला जावळी प्रांतांत आश्रयास योग्य असा मजबूत डोंगरी किल्ला नव्हता. त्यामुळें तो रायरी किल्ला ताब्यांत ठेवण्याच्या आटोकाट प्रयत्नांत होता. रायरी ऊर्फ रायगड या किल्ल्याच्या घेऱ्यांत बिरवाडी गाव येतो. अर्थात् तेथील पाटिलकी आपल्या मार्फतीनें चालावी असा चंद्र-रावाचा मानस. रायगडच्या पूर्वेस सुमारें १२ मैलांवर असलेल्या शिव-तरच्या डोंगरावर चंद्ररावाचे वाडे असून तें ठिकाण बरेंच मजबूत व दुर्गम असावें, असें आज जे वाड्याचे अवशेष आहेत त्यावरून दिसून

येतें. [ या स्थलासंबंधाचें सविस्तर वर्णन पुढें प्रकरण मध्यें आहे. ] जावळी, शिवतर डोंगरावरील गढी व रायगड हीं तीन स्थानें जोरावारीनें ताब्यांत ठेवणारा चंद्रराव जवळच्या बिरवाडी गांवची पाटिलकी दुसऱ्या कोणास कशी पचूं देईल ? परंतु बिरवाडच्या पाटलास शिवाजीनें आश्रय किंवा अभय दिल्यामुळें खरें भांडण चंद्रराव व शिवाजी महाराज यांच्या-मध्यें उत्पन्न झालें.

६. कोंडाणा किल्ला ताब्यांतून गेल्यामुळें महाराजांस पुणें प्रांतीं सुर-क्षितता वाटत नाहींशीं झाली. म्हणून त्यांनीं आपले प्रयत्न रोहिडखोरें व वेळवंड खोरें यांत सुरू केले. त्याची ओरड विजापूर दरबारांत पोंचून, दादाजी नरस प्रभु देशपांडे कुलकर्णी रा. रोहिडखोरें व वेळवंड खोरें यांस आज्ञापत्र आहे. " शिवाजी राजे फरजंद शाहाजी राजे याणे शाहासी बेमानगी करून तुझे खोरियांत रोहिडेश्वर डोंगराचे आसराण पुंडावे याने मावले वगैरे लोक जमाव केला आणि तेथून जाऊन पेशजी किल्यावरी ठाणें उठवून आपण किल्यांत शिरला हाली राजगड किला नाव करून वलकावला. तोही वेळखंड खोऱ्यालगत त्यास लोकाचा वगैरे जमाव तूं सामील असून फिसाद करून रसिद राजे मजकूर निल्हेस देतोस. व ठाणे सिरवली आमिनासी रुजु राहत नाहींस व जमव वितरजुमा करीत नाहींस व तनखाहि हरदुतपियाचा दिवाणांत देत नाहींस मगरुरीचे जबाब ठाणगे व नाइकवाडी यासी देतोस हे जाहिरात आले...........

[ खं० १५ ले० २६७ शके १५६७ चैत्र शु० १३ ]

ले० २६७ शके १५६७* चैत्र शुा १३ ].

७. वरील लिहिण्यावरून लक्षांत येईल कीं, पुणें जहागिरीवर जहागिर-दार या नात्यानें जरी महाराज अंमल चालवीत असले, तरी त्यांच्या स्वतंत्र उद्योगाचें केंद्रस्थान सह्याद्रीच्या पश्चिमेकडील डोंगरखोऱ्यांत होतें. शके १५६८ सालीं तोरणा घेतला. व शके १५६९ंत तोरणा किल्याचे आग्नेयेस तीन कोसांवर दुरगा नांवाच्या डोंगराच्या शिखरावर राजगड

---

* वरील पत्राच्या अस्सलपणाबद्दल संशय आहे. परंतु त्यांतील मतलब खरा आहे असें कै. राजवाडे म्हणतात.

बांधिला. किल्ल्यास तीन माच्या करून सुवेळा, संजीवनी व पद्मावती अशीं नांवें दिलीं "राजधानीस राहण्यास योग्य अशी कल्पना करून बांधते झाले [ म. रा. सत. शि. च. पृ. ३०।३१ ]. घाटमाथ्यावर आपलें मुख्य ठाणें असण्यापेक्षां सह्याद्रीच्या पश्चिम उतरणीवरील एखाद्या डोंगरी किल्ल्यावर आपलें ठाणें असावें. अशा विचारानें किंबहुना 'राजगड' राजधानी करण्याचा हेतु धरूनच राजगड बांधण्यांत आला. राजगड, तोरणा हे दोन किल्ले ताब्यांत आल्यावर सहजच महाराजांचें लक्ष नजीकच पश्चिमेस असलेल्या रायरी ऊर्फ रायगड किल्ल्याकडे वेधलें. रायरीवर अंमल चंद्ररावाचा. तेव्हां तो अनुकूल होईल तर किंवा त्याचा पाडाव केला तर रायगड काबीज होणार. सारांश रायगडच्या राजकारणाशीं चंद्ररावाच्या भांडणाचा मुख्य संबंध येतो. चंद्ररावाचें व महाराजांचें शके १५७० पर्यंत सख्य होतें. शके १५७३ पासून तंट्याला सुरवात झाली. परंतु शिवाजी महाराजांस चंद्ररावासारख्या प्रबल सरदाराशीं एकदम शत्रुत्व करतां येईना. कारण शहाजी राजे कैदेतून सुटून विजापुर दरबारींच होते.

८. शके १५७५ मध्यें शहाजी राजे कर्नाटकांत गेल्यावर शिवाजी महाराजांनीं पुणें प्रांतीं आपल्या स्वातंत्र्य स्थापनेच्या धाडसी प्रयत्नास जोरानें सुरवात केली. शके १५७६ त पुरंधर किल्ला ताब्यांत घेतला. व सतत चार पांच वर्षें उपद्रव देणाऱ्या व स्वराज्यविरोधी चंद्रराव मोऱ्याच्या पारिपत्यास सुरवात केली.

चंद्रराव मोऱ्याचा भाऊ हणमंतराव हा जोर खोऱ्यांत अंमल गाजवीत होता. शके १५७१ मध्यें अफजलखानानें जोर खोरें घेण्याची जेध्यांना परवानगी दिली होती. परंतु जेध्यांच्या हातून हणमंतरावाचा पुरा मोड झाला नाहीं. म्हणून रघुनाथ बल्लाळ कोरडे यास हणमंतरावावर महाराजांनीं पाठविलें. त्यानें हणमंतरावाचा पराभव करून जोर खोरें घेतलें. तेव्हां हणमंतराव पळून विजापुरीं तक्रार सांगण्यासाठीं गेला.

चंद्ररावाचा मोड करण्यासाठीं शिवाजी महाराजांनीं शके १५७७ पौष शु॥ १४ रोजीं निसणीच्या घाटानें जावळीवर स्वारी केली. "महाबळेश्वरचा निसणीचा घाट दरियाचा उतरून जावळीस वेढा घातला. जावळी

अवघड वाट, जाळ्या कळकीच्या दाट, तेथें महिनाभर झुंज जाहलें. महिन्या एका महिन्यांनीं कृष्णाजी बाजी मोरे जावळी सोडून आपले हासमसुद्धां रायगडास गेले रायगड बलकाऊन राहिले तेथें शिवाजी महाराजे चढाई करून गेले रायगड तीन महिने चंद्ररावांहीं भांडविला. मग सला जाहला. " [ रा. य. रा. गुते यांचा निबंध ]. जावळी प्रांतांत त्यावेळीं किल्ला नव्हता. थोडे दिवस जावळी लढविल्यावर चंद्रराव पळून रायरीस गेला. जावळीहून सह्याद्रीच्या पश्चिम खोऱ्यांनीं शिवतरापर्यंत पायवाट आहे. शिवतरापासून रायगडावर सुमारें ३ तासांत जातां येतें. चंद्रराव पळून रायरी गडांत गेल्याचें महाराजास समजतांच त्यांनीं आपला मोर्चा रायरीकडे वळविला. शके १५७८ दुर्मुखीनाम संवत्सरे चैत्र व॥ ७ स जावळीहून स्वार होऊन रायरीस आले. [ शिवपूर दप्तरांतील यादी ] रायरीस वेढा दिला. या वेढ्यांत चंद्ररावाचे भाचे सिलीमकर देशमुख, कान्होजी जेधे देशमुख व बांदल हे महाराजांच्या वतीनें लढत होते. सिलीमकरांनीं महाराज व चंद्रराव मोरे यांच्यामध्यें सलोखा करण्यासाठीं उभयपक्षीं मध्यस्ती केली. महाराज व चंद्रराव मोरे यांची भेट होऊन रायगड महाराजांच्या ताब्यांत द्यावा असें ठरलें. या अटीच्या निश्चितीकरिता चंद्ररावाचे दोन मुलगे बाजिराव व कृष्णराव शिवाजी महाराजांच्या ताब्यांत ओलिस म्हणून दिले. असा प्रकार होऊन रायरीचा किल्ला महाराजांच्या ताब्यांत आला. [ शके १५७८× चैत्र व॥ ७ ] प्रस्तुतस्थळीं आपणांस मोरे प्रकरणाची यापेक्षां ज्यास्त पुढील माहिती देण्याचें प्रयोजन नाहीं. रायगड महाराजांच्या ताब्यांत कधीं कसा आणि कोणाकडून आला हें वरील इतिहासावरून ध्यानीं येईल.

९. रायगड घेतल्याचा वर दिलेला शक आजच्या नवीन आणि सर्वमान्य संशोधास अनुसरून दिला आहे. परंतु या शकाबाबत कांहीं भिन्न मतें आहेत त्यांचें उद्घाटन करूं.

[ अ ] कै० राजवाडे यांच्या ऐ० प्रस्तावना पृ. २६९ ते २७१ पर्यंत म. रा. कृत स. प्र. शि. चरित्राची चर्चा केली आहे. या चरित्रांत

× भाद्रपद वा॥ ११ [ शके १५७८ ] गडाचें नांव ठेविले [ शिवापूर द० ]

रायगड घेतल्याचा उल्लेख असा आहे.

" रायगडचें राजकारण आलें तेथें जाऊन भेदानें किला घेतला तो पूर्वी हबसी याजकडे होता. शके १५६८ किला बहुत नामी उंच बिकट पाहून फार संतोषी झाले त्याजपाशीं चांगला डोंगर होता तो किल्ला केला नांव लिंगाणा ठेविलें आणि राजगडास आले. " [ पृष्ठ ३४ ]

या शकाबद्दल राजवाड्यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

" बाजी मोहित्याचा सुपें महाल घेतल्यावर कांगोरी* वगैरे किल्ले घेतले......नंतर थोड्याच दिवसांनीं शके १५६८ त कोकणांत उतरून रायगड किल्ला घेतला व कल्याणवर अबाजी सोनदेवाकडून स्वारी करविली.........शके १५७० त राजापुर लुटलें व बाळाजी आवजीस चिटणिसी सांगितली. बाळाजी आवजीस चिटणिसी शके १५७० त मिळाली. हें बरेंच विश्वसनीय आहे. शके १५६८ त रायगड घेतला हेंही तितकेंच विश्वसनीय आहे. " रा. प्र. पृ. २७.

कै० राजवाड्यांनीं हा शक जरी बरोबर आहे असें म्हटलें आहे, तरी या विवेचनाच्या शेवटीं त्यांनीं जो शेरा मारला आहे तो विचार करण्यासारखा आहे. ते म्हणतात " सारांश अस्सल आधार कांहीं तरी असल्याशिवाय ह्या बखरींतील तपशिलांवर विश्वास ठेऊन चालणें उपयोगाचें नाहीं. " आज जेधे शकावली बरीच मान्य व अस्सल आधारभूत ठरूं पहात आहे. म्हणून तिच्या पुराव्यापुढें ही बखरीची मिति हिणकस ठरते. मल्हार रामराव याच्या बखरीवरून रायगड हबशी याचेपासून घेतला असें दिसते. त्याच बखरींतील चंद्रराव मोरे प्रकरण 'शके १५७७ त केव्हां तरी उत्पन्न होऊन, वरील माहितीशीं बरेंच जुळतें आहे.' यावरून असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं कीं, शके १५६८ मध्यें शिवाजीनें कोंडाणे किल्ला भेदानें घेतला. ही हकिकत व रायगडच्या कबजाची हकिकत यांची गल्लत झाली असावी.

[ आ ] शामजी आवजीस ( बाळाजी आवजीचा भाऊ ) कारखान-

* कांगोरी किल्ला रायगडचे आग्नेयेत व प्रतापगडचे उत्तरेस आहे. कांगोरी व प्रतापगड अंतर ६ मैल आहे.

निशी रायगडची सांगितली शके १५७० त पाठविलें.

म. रा. स. प्र. शि. च. पृ. ३५

राजापुरच्या लुटीच्या सफरीच्या वेळीं चिटणीस बंधूची प्राप्ती महाराजांस झाली. याबद्दल सर्वांचें ऐकमत्य आहे. शिवदिग्विजयकार राजापूर घेतल्याचा शक १५७० हा देतात. पण जेधे श० १५८२ हा दिला आहे. शृंगारपुरच्या सुर्व्यांशीं जेव्हां महाराजांनीं युद्ध केलें त्याच्या पूर्वी थोडे दिवस राजापुर लुटलें. बखरकारांस ह्या युद्धाची माहिती दिसत नाहीं. अर्थात् शिवभारतावरून अनुभविलेली राजापुरच्या लुटीची हकिगत जेधे शकावलीशीं बरोबर जुळत असल्यामुळें राजापुरच्या लुटीचा जेधे शकावलींतील शक बरोबर आहे असें समजणें रास्त दिसतें.

[ इ ] शेडगांवकर बखरींत शके १५७५ मध्यें रायगडावर देवीची स्थापना केल्याचा उल्लेख आहे.

हल्लीं रायगडावर भवानी नांवाच्या टोकाशीं भवानीचें एक लहानसें मंदिर असून, ते अत्यंत अडचणीच्या जागीं आहे. हेंच कदाचित् शेडगांवकर बखरींत उल्लेखिलेलें देवीचें मंदिर असावें. हें भवानीचें मंदिर इतक्या अवघड ठिकाणीं आहे, कीं त्या ठिकाणीं सामान्य प्रवाशाला जातां येणार नाहीं. देवी प्रतापगडच्या भवानीसारखी अष्ट–भुजा आहे. दुसरी शिरकाई* देवी. ही गंगासागरच्या उत्तरेस व धर्म–शाळेच्या पूर्वेस आहे. मूर्ति प्रतापगडच्या देवीप्रमाणें अष्टभुजा असून साध्या पाषाणाची आहे. येथें बरीच पडापड झाल्यामुळें शिलालेख अगर इतर कांहीं प्रमाणावरून

* ही शिरकाई देवी रायगडचे शिवपूर्व किल्लेदार शिर्के यांनीं स्थापलेली असावी. शिरकाई ही शिर्क्यांची कुलस्वामिनी होय. हे शिर्के निजामशाही अमलापासून मध्य कोंकणांत प्रबल असून त्यांच्या ताब्यांतील प्रांतास शिरकाण म्हणतात. प्रकरण २ मध्यें याबद्दल ज्यास्त माहिती आहेच. ह्या शिर्क्यांचे वंशज भोर संस्थानांत अद्याप मोठे मानकरी आहेत. रायगडच्या पायथ्याशीं असलेल्या शेल ऊर्फ बिरवाडी गांवचे ते अद्याप खोत आहेत. तसेंच नांदवी जवळील एका गांवचे ते वतनदार खोत आहेत. शिर्क्यांचा विजापुर दरबारी मोठा बोलबाला होता. त्याच शिर्क्यांच्या ताब्यांत रायगड असतां त्यांनीं आपल्या कुलदेवीची–शिर्काईची स्थापना केली.

निश्चित काल ठरवितां येईल असा कांहींच पुरावा सापडत नाहीं. असो. रायगड ताब्यांत घेतल्यावर तेथें खुद्द महाराजांनीं यशोदायिनी भवानीचें देऊळ बांधून तेथें तिची स्थापना केली असेल यांत तिळमात्र शंका नाहीं. मात्र कालनिर्णयाबद्दल शंका आहे.

[ ई ] ज्ञानकोशकारांनीं रायरी किल्ला शके १५७० ( १६४८ सन )त शिवाजीनें हस्तगत करून शके १५८४ ( सन १६६२ ) त तेथें राजधानी केली असें म्हटलें आहे. हे दोन्ही कालोल्लेख आजच्या नव्या माहितीशीं विसंगत दिसतात, हे कोणीही कबूल करील. [ रायगड राजधानी कधीं केली हें पुढें साधार देणार आहे. तेव्हां या शंकाचा विचार होईल. ]

[ उ ] शि. च. प्रदीप ग्रंथांत श्री. शं. ना. जोशी ( वांई ) यांनीं थोडक्यांत या सर्व सनांचा परामर्ष घेतला आहे. तोच उतारा देऊन हा भाग संपवूं.

" रायगड घेतोः—शके १५६८. मल्हार रामराव बखर. याखेरीज दुसऱ्या कोणत्याही बखरींत ह्या प्रसंगाचा शक दिलेला नाहीं. सुरत मारून कारंजें घेतल्यानंतर रायरी घेतली आणि राज्याभिषेकाचे वेळीं रायरीचा रायगड केला, असें सभासद व चित्रगुप्त लिहितात. शिवप्रतापांत रायगड अथवा रायरी घेतल्याचा उल्लेख नाहीं. ९१ कलमींत मोरे प्रकरणापूर्वीच रायगड घेतल्याचें सांगितलें आहे; व तसेंच म. सा. छोट्या बखरींतही आहे. शेडगांवकर बखरींत ह्याचा दोन ठिकाणीं उल्लेख असून पहिल्याचा दुसऱ्याशीं मेळ नाहीं. पृ. ३५ वर म्हटलें आहे कीं मुसल ( मुरुम ? ] देव डोंगरावर बांधकाम करून अफजल वधानंतर पहिल्यांदा कोंडाणा घेण्यापूर्वी रायगड बनविला. म्हणजे शके १५८१ च्या नंतर व १५६९ च्या पूर्वी ! बरें पुढें पृष्ठ ७४ व ८१ वर सभासदी बखरीप्रमाणें सुरत लुटून कारंजें घेतल्यानंतर रायरी घेतली आणि राज्याभिषेकाचे वेळीं ' रायरी सोन्याची पायरी ' हें नांव मोडून रायगड हें नांव ठेविलें, असें लिहिलें आहे. ह्यावरून विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं पृ. १९ वर मुसलदेव म्हणून डोंगर होता त्यास वसविला, राजगड नांव ठेविलें. (शके १५७०-७४) असें आलें आहे. एकंदरींत हें सगळें बिनमेळाचें लिहिणें आहे. शके १५७८

त रायरी घेतली ( व तिचाच पुढें रायगड केला ) हें जेधे वगैरे श.नी म्हणणें इतर बाबीशीं जुळतें व बरोबरही आहे. ”

१०. शके १५७८ त जावळीच्या चंद्रराव मोऱ्याकडून रायरी किल्ला महाराजांनीं हस्तगत केला; असें निश्चित अनुमान करण्यास हरकत नाहीं. त्या किल्ल्याचे माजी राज्यापासूनचे हक्कदार शिर्के. पण त्याचा हक्क दलपतराव नामें मुतालिकानें बळकाविल्याचें मागें आलेंच आहे. महाराजांनी रायरी घेतल्यावर नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें दलपतरावास मोईन करून देऊन त्याजवळील देशमुखीचा हक्क अनामत केला. अशा प्रकारें मध्य कोंकणांत सुरक्षित अशीं राजगड, *तोरणा व रायगड हीं तीन महत्वाचीं केंद्रस्थानें महाराजांच्या ताब्यांत आलीं.

मावळ प्रांतीं अंमल बसून तेथील देशमुख व देशपांडे दस्त व्हावे. या हेतूनें महाराज व त्यांचें मंत्रिमंडळ एक एक डोंगरी किल्ला सर करण्याच्या मार्गास लागले. कोंडाणा घेऊन पुणें प्रांतीं पुंडाई चालविली आहे, अशी शिवाजीची कागाळी विजापुर दरबारी पोंचताच, शिवाजी महाराजांवर विजापुरकरांचा सरदार फत्तेखान चालून आला. त्यानें बेलसरें, पुरंदर, शिरवळ हीं ठाणीं घेण्याचा प्रयत्न केला. महाराजांनीं मोठ्या हिंमतीनें त्याला हुसकून लाविलें. पुढें शहाजी राजांना कैद झाली. त्यांच्या सुटके-साठीं, छत्रपती शिवाजी महाराज यांचे ज्येष्ठ बंधू संभाजी राजे यांनीं बंग-लूर व शिवाजी महाराजांनीं कोंडाणा देऊन विजापूरकरांशीं तह केला. पुढें ४।५ वर्षे शहाजी राजे विजापुरींच असल्यामुळें, कांहीं विशेष हालचाल झाली नाहीं. चंद्ररावाचें प्रकरण उपस्थित होऊन जावळी प्रांत व रायगड किल्ला शके १५७८ त ताब्यांत आला. ही कागाळी प्रतापराव मोऱ्यानें विजापुर दरबारीं स्वतः जाऊन केली; पण त्याच वेळीं तेथें एक नवाच डाव रंगात आला होता.

११. आतां रायगड राधजानी कां केली याचें विवेचन करण्या-पूर्वी, ह्या वेळीं शिवाजी महाराजांच्या राजकारणाचें थोडक्यांत पर्या-लोचन करूं.

---

* तोरण्यालाच सुलतानगड हें नांव होतें.

१२. विजापुरचा बादशहा महमद आदिलशहा अर्धांग वातानें आसन्न-मरण झाल्यामुळें दरबारांत भावी वारसाबद्दल पक्षोपक्ष बोकाळले होते. दक्षिणेंतील मुसलमानी शाह्या बळकाविण्याचे मोंगलांचे प्रयत्न जारी चालू होते. शके १५७५ पासून मोंगल शहाजादा औरंगजेब औरंगाबादेस ठाण मांडून बसला होता. गोवळकोंडेकर, विजापुरकर व मोंगल या तीन हत्तींची झुंज दक्षिणेच्या पठारावर मोठ्या निकरानें चालू होती. या हत्तींच्या टकरींत आपलें चिमुकलें स्वराज्य टिकवून धरणें मोठ्या मुत्सद्देगिरीचें व मिनत-वारीचें काम होऊन बसलें होतें. शेवटीं शके १५७८ त महमदशहा मरण पावला. तेव्हां वारसाचें निमित्त पुढें करून औरंगजेब विजापुरच्या भानग-डींत शिरूं लागला. दोघांची कटकट सुरू झाली. महाराजांच्या पुणें जहा-गिरीच्या उत्तर–पूर्व बाजूला मोंगली मुलूख तर दक्षिण–पश्चिम बाजूला विजापुरकरांचा मुलूख. बरें हा जहागिरीचा प्रांत ३० वर्षांपूर्वी तहानें कागदोपत्रीं कां होईना विजापुरकरांकडे सुपूर्त केलेला* अर्थात् मोंगलांची पहिली धाड या प्रांतावर येणार. शिवाजी महाराजांनीं या वेळीं दुटप्पी किंवा दुगल राजकारण करून दोन्ही दरबारशीं पत्रव्यवहार चालविला. औरंगजेबाची इच्छा शिवाजीसारखा कर्तबगार तरुण आपल्या बाजूला असावा अशी होती. म्हणून तो बाह्यतः बादशाही तोऱ्यानें पण अंतस्थ नरमाईची भाषा बोलून महाराजांस आपणांकडे ओढून घेण्याचा प्रयत्न करीत होता. औरंगजेब आतां वाटेल तशीं अभिवचनें देईल व आपलें कार्य झाल्यावर निघून जाईल दिल्लीला. आपण मात्र शेजारच्या विजापुरकरांशीं वाकडे होऊन कायमचा शिवेशेजारी शत्रू उत्पन्न करून ठेऊं. म्हणून शिवाजी महाराज विजापुरकरांच्या पक्षाला मिळाले, व मोंगलांशीं त्यांनीं वैर सुरु केलें. इकडे विजापुरीं मुत्सद्यांनीं परभारें दिल्लीस शहाजहान बादशहाशीं

* भीमेच्या उत्तरेचा मुलुख मोंगलांना द्यावा, दक्षिणेचा विजापुरकरांना द्यावा व विजापुरकरांनीं तो जहागिरी म्हणून शहाजीकडे ठेवावा असा जेधे करीन्यांत उल्लेख आहे. तसेंच शहाजीनें आपला मुलुख ठेऊन बाकीचा निजामशाही मुलुख मोंगल व आदिलशाही बादशहा यांस वाटून दिल्याबद्दल शिवभारतकार लिहितात.

तहाचें बोलणें लावून; तिकडून औरंगजेबास युद्ध थांबविण्यास इशारा दे
विला. औरंगजेबानें हुकमाप्रमाणें युद्ध थांबविलें. व विजापुरदरबारशीं
केला. पण तो शिवाजी महाराजांवर मात्र बेसुमार चिडला. त्यानें पुणें ज
गिरी जाळून लुटून बेचिराग करण्याचे सक्तीचे हुकुम सरदारांस दिले.
विजापुरकरांनीं शिवाजी महाराजांना पकें तोंडघशीं पाडिलें, इतकेंच न
तर नहांत शहाजीच्या जहागिरीचा प्रांत मोंगलास देऊन हलवायाच्या घ
वर तुळसीपत्र ठेवण्याचा लटका उदारपणाही केला! मोंगली सैन्याचा
जोरदार शह महाराजाच्या स्वराज्याला बसल्यामुळें घाटमाथ्यावरील मु
खाची बरीच खराबी झाली. पण या संकटांतून एका अजब योगायोगा
मुक्तता झाली. तो योगायोग म्हणजे शहाजहानचें दुखणें व औरंगजेबा
उत्तरेस जाण्याची लागलेली निकड!

१३. शहाजहान बादशहाच्या आजारच्या बातम्यावर बातम्या दक्षिणें
थडकूं लागल्या. औरंगजेबाला उत्तरेंत जाण्याची निकड! ह्या धादलीं
शिवाजीचें पुरतें पारिपत्य करण्यास सवड कोठें होती? इतक्यांत महाराजां
कडून एक नरमाईचें पत्र आलें तेवढ्यावर खुप होऊन, मनांतून जरी
सूडाचा अग्नी धडधडत होता तरी शिवाजीचे सर्व अपराध क्षमा करून त्यास
कृपेंत घेतल्याचा देखावा औरंजेबाला दाखवावा लागला.

"यद्यपि तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसरावयाजोग्या नाहींत; तथापि तुम्ही आपल्या कृत्याचा पश्चाताप केला व हा दरबार उपेक्षेचा नाहीं हें जाणिलें. तुमचें लक्ष निभ्रांत इकडे आहे असें समजोन तुमचें पूर्वकृत्य मनास आणीत नाहीं." असें दरबारी थाटाचें पत्र लिहिलें. व विजापुरकरांस ही शिवाजीची ब्याद तिकडे कर्नाटकांत नेण्यास सुचविलें. इतकी तरतूद करून औरंगजेब उत्तरेंत निघून गेला. या प्रकरणापासून शिवाजी महाराजांसारख्या दूरदर्शी मुत्सद्यानें 'दोन मुसलमानी बादशहांच्या क्रुद्ध दृष्टीसमोर व त्यांच्या जाण्यायेण्याच्या वाटेवर स्वराज्य टिकविणें अशक्य—निदान जिकिरीचें—आहे' अशी खुणगांठ बांधिली असल्यास नवल काय?

१४. विजापुरकरांनीं महाराजांचा पुरा विश्वासघात केल्यामुळें,

त्यांच्याशीं उघड वेबनाव पत्करिला. शके १५७९।८० त विजापुर दरबारांत वारसाबद्दल लाथाळी सुरु होती. याचवेळीं औरंगजेब बापा–भावाच्या हाल-अपेष्टा करून दिल्लीचें तक्त बळकाविण्याच्या धांदलींत होता. दोन्ही दरबा-रच्या ह्या दुर्लक्षाचा फायदा घेऊन महाराजांनीं आपली सावधगिरीची मज-बुती चालविली. दोन्ही बादशहांच्या दृष्टीसमोर असणारी पुणें राजधानी सोडून, सह्याद्रीच्या भिंती आड बांधलेल्या राजगडास राजधानीचें स्वरूप दिलें. प्रबळगड वगैरे किल्ले घेऊन महाराजांनीं विजापुरकरांचा उत्तर कोंक-णांतील अंमल उठविला. जेधे करिन्यांत " स्वामींनीं किल्ले राजगड, तोरणा या किलियावर इमारतीचे काम लाविले किले तयार करविले त्यांवरी फत्ते-खानाची फौज विजापुराहून पुणें देशांत आली " असा एक उल्लेख आहे. फत्तेखानाची स्वारी शके १५७१ मध्यें झाली. त्या पूर्वी राजगड किल्ला बांधून झाला होता; असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. राजगड हा किल्ला सह्याद्रीच्या पश्चिम उतरणीवर आहे. घाटमाथ्यावरील सैन्यास या किल्ल्यावरही स्वारी करावयाची म्हणजे सह्याद्री ओलांडून यावें लागतें. या वेळीं हा किल्ला देशावरील शत्रूपासून बचाव करण्याच्या दृष्टीनें सोइस्कर वाटल्यामुळें शके १५७९ च्या सुमारास राजगड हें मुख्य ठाणें केलें.

१५. राजगड हें मुख्य ठिकाण केल्यावर, महाराजांच्या महत्त्वाच्या रायकीय हालचाली राजगडावरून झालेल्या आढळतात. त्यांतील महत्त्वाच्या उलाढाली सालवार खालीं देत आहे.

[ अ ] शके १५८१.* कान्होजी नाईक जेधे राजगडीं भेटले.

[ आ ] शके १५८१. पौषमासीं राजगडावर+राजनीतिविशारदांची परि-षद भरल्याचा शिवभारतांत उल्लेख आहे.

[ इ ] शके १५८३. सिद्दी जोहारानें पन्हाळ्यास वेढा घातला तेव्हां जिजाबाई राजगडास होती.

*माघ बहुल ११ मंदवासर बद्दल देणें रदकर्जनरसशेट उघापा बकाल पेठ पावाड कर्जजमा पेठाहाय नजीक रायगड बाा वखैर कारकून पेठ माा
शके १५८१ राजवाडे खंड १८ पा. ७९

**" जननी शिवराजस्य सा राजगिरीवर्तिनी ।**
**निजानां गिरिदुर्गाणामवनेऽवहिता भवत् ॥५॥**

शिवभारत अ. २६

[ ई ] शास्ताखानाचा पराभव करून शिवाजी महाराज शके १५८२ मध्यें राजगडीच आले.

वरील उल्लेखावरून शके १५७९ ते १५९१ पर्यंत महाराजांच्या कारभाराचें मुख्य ठाणें राजगडीच होतें दिसतें.

१६. जों पर्यंत जाहगिरीचा व मुलुखबंदोबस्तीचा व्याप घाटमाथ्यावर होता; तों पर्यंत राजगडासारखें घाटी मुलखाच्या नजीकचें ठिकाण राजधानीस योग्य होतें. पण मोंगलाशीं जेव्हां महाराजांचें युद्ध सुरू झालें, तेव्हां घाट माथ्यावरला मुलुख जयसिंगाबरोबर झालेल्या शके १५८७ च्या + तहांत मोंगलास देणें भाग पडलें. पुढें आग्र्याहून राजगडास आले. त्या वेळीं घाटमाथ्यावरील मुलखापेक्षां कोंकणांतील प्रदेशच शिवाजी महाराजांच्या

३१ पान + ॥ **तमुदंतं शिवनृपो निशम्य शिवपत्तने ।**
॥ **सर्व नीतिविदांवर्थः सचिवा निदमब्रवीत ॥२९॥**
॥ **कार्यांतर प्रसक्तत्वात् मयि सांतरमास्थिते ॥**
॥ **संग्रामदुर्गसहिता गता चक्रामती पुरी ॥३०॥**

ही बातमी राजगडावर ऐकून सर्व राजनीतिवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा तो शिवाजीराजा सचिवांस असें बोलला. दुसऱ्याकार्यांत गुंतल्यामुळें मी दूर असतां चाकणनगरी संग्रामदुर्गासह हातची गेली.

शिवभारत अ. २८

[ उ ] * राजगडावर पंचायती भरवून दिलेल्या निकालांचीं निवाडापत्रें कांहीं सांपडतात.

[ ऊ ] शके १५८८ पराभव नाम संवत्सरे श्रावण वा। १२ आगरियाहून पेटारियांत बैसोन पळाले. संभाजीसहे वर्तमान मार्गसीर्श शु॥ ५ राजगडास आले. १५८९ शहाजहानचा वकील राजगडीं भेटला.

[ ऋ ] शके १५९१ फाल्गुन शु॥ १५ राजगडीं राजाराम महाराज उपजले.

ताब्यांत ज्यास्त होता. या पूर्वीच पेण, दाभोळ, शृंगापूर इ० कोंकणांतील ठाण्यांवर स्वारी करून ती महाराजांच्या ताब्यांत आलीं होतीं. मोरोपंत पेशव्यास उत्तर कोंकण व अबाजी सोनदेव यांस दक्षिण कोंकणाच्या बंदोबस्तास पाठविलें. रायगड हा दक्षिण कोंकणांत मोडतो. तेव्हां कोंकणप्रांत हेंच ' स्वराज्य ' उरल्यावर त्यांतील केंद्रस्थान जो रायरीगड तोंच मुख्य ठाणें केलें असल्यास नवल काय?

शके १५९२ भाद्रपदमासीं रायगडाहून निघून जुन्नरास वेढा दिल्याचा उल्लेख आढळतो. याच सालीं केलेली सुरतेची दुसरी लूट रायगडीं आणिली.

बादशहानें दिल्लीस बोलवून विश्वासघात केल्यामुळें पुरंदरच्या तहाप्रमाणें वागण्याचें बंधन महाराजांस राहिलें नाहीं. पुढील तीन चार वर्षांत मोंगलाकडे दिलेले किल्ले परत मिळविण्याचा उद्योग जोरानें चालविला. घाटमाथ्यावरील प्रदेश ताब्यांत आला तरी, स्वराज्याचें मुख्य ठाणें तेथें मांडण्यापेक्षां तें कोंकण प्रांतीं मांडणें जास्त श्रेयस्कर; ही गोष्ट आतां महाराजांस चांगलीच पटली. स्वराज्याचा व्याप दिवसेंदिवस जास्त जास्त वाढत चालला असून, विजापुरकरांपेक्षांही प्रबळ असे जे मोंगल बादशहा त्यांच्याशीं आतां झगडा करण्याची पाळी आली असल्यामुळें, आपली राजधानी फारच सुरक्षित ठिकाणीं असली पाहिजे. राजगड हें ठिकाण कांहींसें सुरक्षित असलें

---

पान ३२ * पुरंदरचा तहः--चार लक्ष होनाचा तळ कोंकणपैकीं विजापुरकरांचे इलाख्यापैकीं हालीं तुह्मांकडे चालत आहे तो बंदोबस्ताकरतां इकडील सरकारांत आला. किल्याचा तपशील राजे जयसिंगाचे लिहिल्याप्रमाणें.........राजगड, भोरप, घोसाळा, उधेदुर्ग, तोरणा, तळेगड, अलवारी, रायरी, लिंगणगड, महाबगड पाल, कुंवरी-[ शिवाजीकडे राहिलेले किल्ले ] राजवाडे खं. ८ पृ. १२।१३ शके १५८७ भाद्रपद ७ ले. १४

८ राजवाडे ले. २७३ शके १५७५ ले. २७७ शके १५८९ माघ शु॥ १ निवाडा पत्र. यांत राजगड मु॥ पंचाईत भरवून निकाल दिल्याचा उल्लेख आहे.

तरी, घाटावरील मुलखाच्या नजीक असून त्याचें क्षेत्रफळ राजधानीच्या व्यापास अपुरें झालें. म्हणून राजगडापेक्षां विस्तीर्ण व दुर्लभ असा रायगड किल्ला राजधानी करण्याचें ठरविण्यांत आलें.

मोंगलाशीं झालेल्या युद्धांत देशावरील सपाट व मैदान मुलखाचा कबजा मोंगली सैन्यानें घेतला.परंतु सह्याद्रीच्या प्रचंड तटानें संरक्षिलेला हा डोंगराळ कोंकणी मुलुख तितक्या साहजिकपणें घेणें मोंगलांसही शक्य झालें नाहीं. अखेरीला सर्व शत्रूंपासून बचाऊन एक कोंकण प्रांतच स्वराज्याच्या छत्राखालीं टिकून राहिला. या प्रांतांतील मध्यवर्ती, मजबूत, विस्तीर्ण, दुर्लभ असें ठिकाण जो रायरीकिल्ला तोच राजधानीला योग्य ठरल्यास नवल काय ?

[ १७ ] रायगड पहाडी किल्ला चांगला शत्रूची फौज बसावयास जागा नाहीं. घोडे माणूस जाण्यास महत्संकट वरकड किल्ले पन्हाळे वगैरे बहुत पण खुलासेवार व मैदानांत यास्तव आजच्या प्रसंगाला हीच जागा बरी. येथें लवकर उपद्रव होऊं न शकेल [ सभासद बखर ]. सुरक्षित राजधानी असावी हीच प्रमुख कल्पना त्या वेळीं महाराजांच्या मनांत असावी. राजधानी ही राज्याची इभ्रत ! युद्धमान राष्ट्रं रणांगणावर युद्धाचे डाव खेळत असतां बेचिराख मुलुखाचें बाजारबुणगें काबीज करण्यापेक्षां राजधानीला शह देऊन, तेथील राजसिंहासन डळमळीत करण्याचा प्रयत्न करितात. मुसलमानी सत्तेच्या डोळ्यांत खुपणारी महाराष्ट्राच्या स्वराज्याची ही राजधानी रायगडासारख्या दूर अंतरावरील अत्यंत डोंगराळ मुलुखांत नसती तर बादशाही सत्तेपासून तिचें रक्षण करणें जिकिरीचें झालें असतें. स्वराज्याचें अधिष्ठान जी राजधानी तीच शत्रूच्या ताब्यांत जाती, तर स्वराज्याचें तारूं कोठें तरी संकटाच्या समुद्रांत भटक्या मारीत राहीलें असतें. शेवटचा प्रबळ मोंगल सम्राट औरंगजेब याचे ताकदवान् तक्त पुढील धामधुमीच्या काळांत कमकुवत झाल्यानंतर उत्तरेच्या राजकारणांत “ ज्याच्या हातीं दिल्ली त्याच्या हातीं राज्याची किल्ली ” असा प्रकार झाला होता. ५७ सालच्या क्रांतियुद्धांत ( बंडांत ) देशी शिपायांच्या हातीं गेलेली दिल्ली ताब्यात घेण्यासाठीं इंग्रज सेनापतींनीं इतकी प्रचंड खटपट कां केली हें ध्यानांत येईल. फार लांबचें उदाहरण नको. परवांच्या युरोपांतील महायुद्धाची गोष्ट युद्ध

सुरु झाल्यावर जर्मनीचा पहिला डाव काय होता ? बेल्जममधून सैन्य नेऊन फ्रान्सच्या काळजाला–पारिसला–काबीज करून तें राष्ट्र हतप्रभ करून सोडावयाचें. तो डाव फसला ती गोष्ट निराळी. स्वराज्यावरील संकटांत स्वराज्याचें भटकलेलें तारूं संकटाच्या तुफान दर्यांत भटकत असतां,त्या वेळच्या कुशल-कर्णधारांनीं स्वराज्याची पंढरी–राजधानी–भीमथडी तट्टावर घालून, जिंजीपासून साताऱ्यापर्यंत फिरती ठेविली होती. शत्रू राजधानीसाठीं इरेसच पडला, तर तिला डोक्यावर घेऊन नाचेन; पण राजधानी सर केल्याची बहादुरी त्याला मिरवूं देणार नाहीं. हा मुत्सद्दी लोकांचा डाव असतो. शिवाजी पुणें जहागिरीचा कारभार पाहूं लागल्यापासून त्यांनीं आपलीं मुख्य ठाणीं पुणें, खडेबारें, रायगड व राजगड अशीं क्रमानें बदललीं. शेवटीं रायगडावर राज्याभिषेक समारंभ करून स्वराज्याची पहिली सन्माननीय राजधानी होण्याचा अपूर्व मान रायगडास दिला.

१८. दोन बादशहांच्या क्रुद्ध दृष्टी समोर राजधानी घाट माथ्यावर न मांडतां, कोकणांतील पहाडी मुलखांत स्थापिली. ही गोष्ट तत्कालिन सुरक्षितपणास पोषकच झाली. कोंकणांतील मुलूख‘घोडं माणूस जाण्यास महत्संकट’ अर्थात् बादशाही बेताचे ‘बडे बापके बेटे’ खडकाळ व दरिद्रि कोंकणांत येतील कशाला?न जाणों बादशाही सैन्य आलें तरी या डोंगराळ मुलखांत हिंडतांना हें डोंगरी उंदीर कुठल्यातरी बिळांत बसून गोफण गुंड्यांनीं त्यास धुडकाऊन लावितील. त्यांचे ते मिजासीचे फर्मास पोषाख पेहरून होतात न होतात तोंच हे मराठे बहाद्दर त्यांस भाल्यांनीं भोसकून आंतील ‘ रु ’ बाहेर काढून पुन्हां अदृश्य होतील. या प्रदेशांचा हा अजिंक्यपणा पुढें चांगलाच प्रत्ययास आला. झुलफिकारखानासारखा नाणावलेला सेनापति कित्येक दिवस वेढा घालून बसला होता. औरंगजेब सर्वस्वासह लागेल ती मदत करीत होता. पण मराठ्यांनीं दाद दिली नाहीं. शेवटीं विश्वासघातकी सूर्याजी पिसाळानें किल्ल्यावरील मावळ्यांच्या शौर्यास विश्वासघाताचा सुरुंग लाविला. तेव्हां किल्ला हस्तगत झाला. भारताच्या पराक्रमाचा बुरुज तोफा, बंदुका व सुरुंगांनीं उध्वस्त न होतां स्वार्थाच्या फंद फितुरीनेंच तो बहुशः नामोहरम झालेला दिसतो.

१९ राजगड हा किल्ला सह्याद्रीच्या पश्चिमेस अलग आहे. देशावरून येणाऱ्या प्रत्येक शत्रूस सह्याद्री ओलांडून यावेंच लागतें. सह्याद्री ओलांडतांना बरेंच अवजड तोफादि युद्धसाहित्य आणणें अशक्य होतें. रायगडाजवळ यावें तों निसर्गनिर्मित उभे* कडे! सुरुंग लावून भगदाडें पाडावीं तरी किल्लयांत शिरकाव नाहीं. किल्लयावर जाण्यास एकच एक अवघड रस्ता.रस्त्याच्या एका बाजूला खडकाचा स्वाभा विक तट तर दुसऱ्या बाजूला शेंकडोंफूट खोलीची उभी दरड एक पाऊल चुकलें तर खालीं पाताळांत पडून स्वर्गवास. तळवटापासून शेकडों फूट उंच अशा डोंगराच्या पठारावरील एका टोकावर सुळक्यासारखा एक विस्तीर्ण उंच त्रिशिंगी डोंगर, तोच रायगड. पायथ्याशीं यावयालाच ६०० फूट डोंगर चढावा लागतो. माऱ्यासाठीं आजूबाजूला टेकड्या म्हणाव्या तर वाळ-डोंगर. वेढा द्यावा तर भोंवतालचा मुलूख डोंगराळ. घोडें उभें राहण्या-इतकी जागा सपाट नाहीं. किल्लयावरून येणाऱ्या एखाद्या धोंड्यानें चढाव करणाऱ्या शत्रूचे शेंकडो सैनिक जायबंदी व्हावयाचे. शत्रूचा लवकर उपद्रव न पोचे. अशास्थानीं स्वराज्याचें पहिलें सिंहासन स्थापणें महाराजांस कां इष्ट वाटलें हें लक्षात येईल.

२०. पुढें पेशव्यांचें वेळीं मराठी राज्यास शिवेशेजारी प्रबळ शत्रू उरला नाहीं. मराठी साम्राज्याचा व्यापही वाढला; म्हणून दळणवळणास सोईचें असें पुणें शहर राजधानीचें ठिकाण करण्यांत आलें. शत्रू आपल्या-पेक्षां प्रबळ असेल तर आपली राजधानी शीरसलामत बचावण्यासाठीं अड-चणीच्या जागीं नेण्याची राजनीति जुनीच आहे. जरासंधाच्या त्रासापासून राजधानीला पीडा पोचूं नये म्हणून प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णांनीं आपली राजधानी द्वारका समुद्रांत नेऊन बांधिली. इंग्रजांनीं आपली मुख्य वखार

*राजा खासा जाऊन पाहतां गड बहुतच चखोट चौतर्फा गडाचे कडे तासिल्याप्रमाणें दीड गांव उंच परजन्य काळीं कडियावर गवत उगवत नाहीं आणि धोंडा तासिव एकच अहे ......... आणि बोलिले तत्कार्म जागा गड हाच करावा. असें करारीं करून तेच गडीं घर वाडे मांडिया सदरा ......... थटी महाल चुनेगचीं बांधिले. [ सभासद पृ. ७१ ]

सुरतेहून मुंबईसारख्या भिकारड्या बेटांत आणिली. ह्याचें मुख्य कारण शत्रूचा होणारा वारंवार उपद्रव टळावा हेंच होय.

सामान्यतः एखाद्या राष्ट्राची राजधानीच शत्रूच्या ताब्यांत गेली कीं, त्या राष्ट्राच्या इभ्रतीचें नाकच कापल्यासारखें झालें. लष्करी सत्तेचा दणदणीत बादशहा नेपोलियन यानें १९ व्या शतकांत युरोपच्या नकाशावर मर्जीस वाटेल तशी फिरवाफिरव करितांना चार सम्राटांच्या राजधान्या टांचेखालीं चेंगरल्या होत्या; तेव्हांच त्या कॉर्सिकन शिपायाला पिढीजात बादशहांकडून सार्वभौम म्हणवून घेतां आले. असो. याप्रमाणें स्वतःच्या राजधानीस सुरक्षित केल्यानंतर कमजोर शत्रूंच्या कंबक्तीचा विचार पुढें येतो. स्वराज्याच्या तोरणापासून तों राज्यारोहणापर्यंत सर्वकाळ स्वकीयांचें संघटन, दक्षिणेकडील व उत्तरेकडील बादशाही शत्रूशीं भांडण यांत गेल्यामुळें जी कित्येक परकीय लोकांचीं उंटाचीं पिलें देशांत फिरकत होती, त्यांच्याकडे तितकेंसें लक्ष देतां आलें नाहीं. ज्याच्या हातीं तागडी त्याचेंच तक्त हें, अर्थशास्त्राचें तत्त्व शिवाजीच्या पूर्ण प्रत्ययास आलें असलें पाहिजे. पण तो काळ स्वास्थ्याचा नव्हता. तागडी हळुहळु तक्त निर्माण करिते. तिचें संक्रमण लोकांच्या नजरेंत भडकपणें भरत नाहीं. तरवार एक घाव नी दोन तुकडे करून तक्त ताब्यांत घेते. अशा तडकाफडकी तक्त ताब्यांत घेण्यानें जित लोकांची मनें परक्या विरुद्ध भडकून जातात. व ते पुनश्च स्वराज्य प्राप्त्यर्थ साहस कर्मे करण्यास प्रवृत्त होतात.

२१. शिवाजीच्या वेळीं पश्चिम किनाऱ्यावर नवीन व्यापारी धामधूम करूं लागले. स्वास्थ्याचा अवधि संपताच पश्चिम किनाऱ्याच्या बंदोबस्ताचा प्रश्न शिवाजीपुढें उभा राहिला. भावी काळ लष्करी व आरमारी अशा जोडसामर्थ्याचा आहे, ही गोष्ट जाणून लष्कराबरोबर आरमाराची करवेल तितकी तयारी करून पश्चिम किनारा ताब्यांत ठेवण्याचे कसोशीचे प्रयत्न सुरू झाले. राजापूर, दाभोळ, चौल, व दुसऱ्या कित्येक बंदरांतून त्या पश्चिम किनाऱ्यावरून बाहेर मोठा व्यापार चाले. त्यांची किफायत चांगली असे. सरहद्दीचा बंदोबस्त हें राज्यरक्षणाचें महत्त्वाचें अंग असल्यामुळें कारवार पासून सुरतेपावेतों आपणांस कोणी शत्रू नसावा अशी व्यवस्था शिवाजीस

ठेवावयाची होती. हा हेतू सिद्धीस नेण्यास सिद्दीचीच कायती प्रमुख अड-चण होती.

२२. सिद्दीचें राज्य लहानसें खरें. परंतु त्याच्या आरमारी सामर्थ्यामुळें व अजिंक्य, जणूंकाय लंका द्वीपच अशा जंजिऱ्या किल्यामुळें तो पश्चिम समुद्रावरील प्रबळ सत्ताधीश बनला होता. शिवाजीमहाराजांस बादशाही बलिष्ट सत्तेजवळ बराच काळ भांडावें लागलें. म्हणून ह्या शिवेशेजारील आरमारी शत्रूशीं आपलें शक्तिसर्वस्व एकवटून भांडण्यास लागणारें स्वास्थ्य लाभलें नाहीं. जंजिऱ्याचें शल्य शिवाजीच्या हृदयांत पूर्ण सलत होतें. तें काढून टाकण्याच्या अनेक खटपटी त्यानें केल्या. त्या पूर्ण यशस्वी होण्या-पूर्वीच अवतारसमाप्ति झाली. तरीपण शिवाजीमहाराजांनीं बनविलेल्यां आरमारी सैन्याच्या जोरावर संभाजीस शिद्दीचा चांगला खरपूस समाचार घेतां येऊन पित्याची इच्छा अंशतः तरी सिद्धीस नेल्याचें पुण्य संपादितां आलें. संभाजी व जंजिरेकर सिद्दी यांच्यामध्यें झालेल्या कटकटींची हकीकत इतिहासज्ञांस माहीत आहेच. संभाजीची ही धडाडी पाहून त्याचीं दुष्कृत्यें महाराष्ट्र विसरल्यासारखा होऊन पश्चिम किनाऱ्यावरील भावी वैभवाकडे सर्वांचें लक्ष वेधलें होतें. संभाजीच्या ह्या उज्वल पराक्रमाचें वर्णन प्रस्तुत स्थलीं अप्रासंगिक म्हणून देतां येत नाहीं. यूरोप खंडांत १५ व्या व १६ व्या शतकांत समुद्रावरील व्यापारासंबंधीं नवीन चळवळीस सुरवात होऊन व्यापारासाठीं द्विपांतराहून पुष्कळ लोक सुवर्णभूमीकडे धांव घेऊं लागले. हा पश्चिम किनाऱ्यावरील व्यापार फार किफायतशीर असल्यामुळें तो हातीं घेण्यासाठीं कित्येक युरोपियन राष्ट्रांनीं खटपट चालविली. विशेषतः पोर्तुगीज फ्रेंच व इंग्रज या राष्ट्रांची फार चढाओढ लागून राहिली होती. स्वतंत्र झालेल्या स्वराष्ट्राची भरभराट होण्याला हा सामुद्रिक व्यापार म्हणजे यशाची गुरु-किल्लीच होय, आणि तो ताब्यांत राहावा म्हणून शिवाजीनें अटोकाट प्रयत्न केला.

देशाच्या भरभराटीसाठीं व्यापार, व्यापारासाठीं पश्चिम किनारा ताब्यांत रहावा म्हणून आरमार, आरमाराच्या वर्चस्वासाठीं जंजिऱ्याच्या शिद्दीचा बंदोबस्त, शिद्दीचा मोड होऊन त्याच्यावर कदर रहावी अशी नजीकची

सुरक्षित राजधानी ही कारण, परंपरेची सांखळी लक्षांत घेतली असतां *रायगड राजधानी कां केली या प्रश्नाचें उत्तर समर्पक मिळेल.

२३. आतां जंजिरा व रायगड यांचा अन्योन्य संबंध पाहूं. कोंकण-प्रांतीं शिवाजीचा अंमल बसल्यापासून त्या प्रांताला जंजिऱ्याच्या शिद्दीकडून उपद्रव पोहोंचत असे. रातबेरात शिद्दीचीं जहाजें राजपुरीच्या खाडींतून येऊन मुलुखास उपद्रव देत. राजपुरीची खाडी ही दोघांच्या राज्याची सरहद्द होऊन बसली होती. जंजिऱ्याच्या शिद्दीस चांगली जरब बसावी म्हणून जंजिऱ्या किल्ल्याच्या पूर्वेस ३ मैलांवर असलेले दंडाराजपुरी हें ठिकाण शिवाजीनें १५८३ मध्यें काबीज केलें. पण शिद्दी फार प्रबल व रगेल असल्यामुळें, इतक्या जवळचें आपलें ठाणें तो सुरक्षित राहूं देईल अशी खात्री महाराजांस पटेना, म्हणून त्या ठाण्यापासून ४० मैल पूर्वेस आपली राजधानी वसवून तें ठाणें 'जोरी' केलें. तळगड व घोसाळगड हे कोकणच्या स्वारींत काबीज केलेले किल्ले दंडाराजपुरीच्या खाडीचें द्वार-रक्षकच होत. या दोन किल्ल्यावरून राजपुरीच्या खाडींतील शत्रूच्या हालचालीस टेहेळतां येतें इतकेंच नव्हे तर पायबंदही घालतां येतो. शत्रू तसाच जबरदस्त असला तर तेथून मध्यवर्ती केंद्राला—राजधानीला बातमी देतां येते. तळगडाच्याबरोबर पूर्वेस बोरवाडी ह्या गांवीं भानगड नांवाचा एक लहानसा टेहेळ्या किल्ला आहे. तेथें दिवसा खुणेनें अगर रात्रीं प्रकाशानें खुणवार्ता देतां येते. तेथून रायगडावर अशीच वार्ता कळविण्याची व्यवस्था आहे. महाराष्ट्रांतील किल्ल्यांचे अन्योन्य वार्ताविहारीसंबंध होते. तसे संबंध साभिप्राय राखले होते ही गोष्ट इतिहासज्ञास सांगणें नकोच. असाच वार्ताविहारी संबंध जंजिऱ्यापासून तो तहत रायगडापर्यंत आहे- जंजिरा किल्ल्याच्या राजकारणाचा रायगड राजधानी करण्यांत कशा प्रकारचा संबंध होता, हें ह्यावरून दिसून येईल. जंजिऱ्याचें शल्य महाराजांच्या मनास रात्रंदिवस कसें टोचीत होतें याचें एक उदाहरण देतें.

---

* तळें, घोसाळा व रायरी हीं ठिकाणें काबीज करून त्यानें ( शिवाजीनें ) रायगड किल्ला अत्यंत मजबूत असा बांधिला. हीं ठिकाणें सिद्दीला दडपून टाकण्यास फार उपयोगाचीं होतीं. ( म. रि. पान ३८४ )

सन १६७१ ( शके १५५२ ) च्या होळीच्या दिवसांत सिद्दीकासम व खैर्यत यांनीं दंडाराजपुरी येथील शिवाजीच्या ठाण्यावर हल्ला केला. मराठी शिबंदी सणामुळें बेसावधपणें ख्याली-खुशालींत निमग्न झाली होती. हल्ल्यांत मराठ्यांच्या दारूच्या कोठारास आग लाविली. त्यावेळीं जो धडाक्याचा आवाज झाला तो शिवाजीस ४० मैलांवर रायगडीं ऐकूं आला. त्याबरोबर राजपुरीस धोका आहे असें म्हणत शिवाजी दचकून झोपेंतून जागा झाला.*

२४. महाराष्ट्राच्या इतिहासाचें भावी भवितव्य कशावर अवलंबून आहे याचा विचार करून सुरक्षितपणा व सावधपणा यांचा जणुं सूवर्णमध्य असा जो रायगड त्याच्यावर स्वराज्याची मुहूर्तमेढ रोविणारा कल्पक शिल्पकार धन्य होय! पुढें स्वराज्यावर वज्राघात होऊन हें केंद्र जिंजी, सातारा, पुणें अशा निरनिराळ्या ठिकठिकाणीं नेणें प्राप्त झाल्यामुळें मूळच्या शिल्पकाराची धोरणी दृष्टीनें ठरविलेली आंखणी मोडली. पश्चिम समुद्राच्या बंदोबस्ताचें कार्य मध्यवर्ती सत्तेकडून दुय्यम दर्जाच्या आरमारी सत्तेकडे सोंपविलें गेलें. पुढें पेशवाईत तर मध्यवर्ती मुख्य सत्ता व आरमारी सरदार यांची सामर्थ्यें परस्परांस पूरक न होतां विरोधक

* पुढें राज्याभिषेक झाल्यावर जंजिऱ्याच्या राजकारणास पुन्हां सुरवात झाली. भेदानें किंवा अन्यमार्गानें जंजिरा काबीज करण्याची महाराजांची खटपट होती. नेपोलियननें आपल्या आरमारी सरदारांस इंग्लिश खाडीवर ६ तास मोकळीक दे म्हणजे इंग्लंड काबीज करितों असें सांगितलें. तशीच कांहींशी खटपट लाये पाटील यांचे मार्फतीनें करण्याचा महाराजांचा बेत होता, हें खालील हकीगतीवरून दिसून येईल.

" शके १५९८ त मोरोपंत पेशव्यानें जंजिऱ्यावर स्वारी केली त्या वेळेस लाये पाटील यानीं रात्रीं जंजिऱ्यावर शिड्या लावून मराठी शिपायास किल्ल्यांत जाऊं देण्याची तजवीज केली होती, अशा मजकुराचें पत्र अलिबागचे सर पाटील याजकडे पांदडते. महाराज रायगडावर होते ते पिंगळे यास योग्य वेळीं मदत गेली नाहीं म्हणून रागावले."

भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष २ रें पृ. १३२-१३२ ले. २

झाल्यामुळें इंग्रजादि परकीय लोक गोगलगाईच्या पायानें पण हिमालयाच्या स्थाणुत्वानें कसे प्रबल झाले, आंग्रे ह्या आपल्याच आरमारी सरदाराचा पराभव करण्यास नानासाहेबांनीं इंग्रजांची कशी मदत घेतली, पश्चिम किनाऱ्यावरील व्यापारी जकातीचें उत्पन्न लक्षांत न घेतल्यामुळें पेशवे द्रव्याच्या कसें अडचणींत सांपडले इ. इ. मुद्यांच्या विवेचनाचें स्थळ हें नव्हे !

## छत्रपति शिवाजी महाराज यांचा राज्याभिषेक महोत्सव.

महाराष्ट्र स्वातंत्र्य लक्ष्मीला यवनांच्या दास्यपंकांतून अविश्रांत आणि अविरत उद्योग करून ज्या महान् थोर देशभक्त स्वातंत्र्यवीरानें सोडविलें त्या छत्रपती शिवाजी महाराजांची धन्य होय ! महाराजांची थोर योग्यता तत्कालीन लोकांस पारतंत्र्याच्या रूढीनें अंध बनल्यामुळें कळेना. शके १५९४ च्या सुमारास महाराज रायगडावर असतां एका भोजनप्रसंगीं पुष्कळ सरदार मंडळीं * जुळली होती. स्वाभाविकच शिवाजीमहाराजांना उच्चासन मांडलें होतें. तें कित्येक मराठे सरदारांस खपलें नाहीं. आपण पिढीजाद राजे ( नांवाचे ? ) असतां हा पाटलाचा मुलगा आमच्यापेक्षां श्रेष्ठ आसनावर बसतो ! त्या सरदारांची ही क्षुद्र भावना पाहून महाराजास व इतर खास विश्वासांतील मंडळीस यथाविधि राज्याभिषेकाची आवश्यकता विशेषत्वानें जाणवू लागली.

मागें राज्याभिषेकाचें रहस्य वर्णन केलें आहेच. असो. राज्याभिषेकाची कल्पना पुढें येतांच चिंचवडचे मोरयादेव, श्री. सद्गुरु रामदास, मातोश्री येसूबाई यांनीं या कल्पनेस आनंदानें पुष्टी दिली. महाराजांचे बालपणापासून एकनिष्ठ सेवक मोरोपंत पिंगळे, बाळाजी आवजी चिटणीस यांनीं समारंभाच्या जुळवाजुळवीस सुरवात केली. राज्यभिषेक होण्यापूर्वी मौंजीबंधन व्हावें लागतें. मौंजीबंधन व्हावयास महाराजांचें क्षत्रियत्व सिद्ध झालें पाहिजे.

*रायगडावर मराठे मंडळाच्या एका बैठकीच्या प्रसंगी शिवाजीराजे उच्चासनावर बसल्याबद्दल मोहिते, माने, घाटगे, शिर्के, निंबाळकर या मराठे घराण्यांस राग आला. ( शिवदिग्विजय पान ४०३ )

स्वराष्ट्रास अतुल क्षात्रतेजानें स्वतंत्र करणारे महाराज क्षत्रिय होते हें सिद्ध करणें म्हणजे दिवटीच्या प्रकाशांत सूर्य पाहाण्यासारखेंच होय ! पण अंधळी रूढी एखादे वेळीं अग्नि देखील धुवून घेण्याचा अट्टाहास करते. गतानुगतिकतेच्या चक्रांत सांपडलेली महाराष्ट्रीय जनता महाराजांचें क्षत्रियत्त्व एकदम कबूल करीना. तेव्हां तिच्या डोळयांत अंजन घालणारा तसाच विद्वान् अधिकारी पुरुष हवा. विश्वेश्वर ऊर्फ गागाभट्ट ह्या अधिकारी थोर विद्वान् पुरुषानें या बाबतींत पुढाकार घेतला. बाळाजीपंत चिटणिसांनीं गागाभट्टास काशीहून ह्या समारंभास रायगडीं आणविलें. मनुष्याची योग्यता जन्मावरून न ठरवितां, त्याच्या शुद्ध व कर्तबगार चारित्र्यावरून ठरवावी हें मत गागाभट्टास मान्य होतें. शिवाजी महाराजांच्या क्षत्रियत्वास विरोध करणाऱ्या रूढींच्या दासांचीं तोंडें बंद करून महाराजांच्या क्षत्रियत्वाचा मोठा पुरस्कार केल्यामुळें राज्यभिषेकास राष्ट्रीय व धार्मिक उत्सव यथाविधि पार पडला. गागाभट्टानें केलेली ही सामजिक क्रांती फार महत्त्वाची व उपयुक्त होती. सामाजिक सुधारणेचा हा पाया पुढिलांच्या दोषांमुळें ढासळला त्याचीं फळें आजचा महाराष्ट्र भोगीत आहे.

भोसल्यांचें कुळ उदेपूरच्या शिसोदे ह्या रजपूत वंशापैकीं असून त्यास त्रिकर्मांचा अधिकार आहे असें ठरलें. नंतर राज्यभिषेकाची समारंभाची जुळवाजुळव सुरु झाली. मागें सांगितल्याप्रमाणें अनेक कारणांनीं रायगड हेंच राजधानीचें ठिकाण ठरलें. रायगड इतका विस्तीर्ण किल्ला दुसरा क्वचित्च आढळले. राजगड तर रायगडापेक्षां क्षेत्रफळानें बराच लहान.

शके १५९६ आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठ शु॥ १३ *शनिवार हा राज्याभिषेकाचा दिवस ठरला. महाराष्ट्राच्या भाग्याचा तो महन्मंगल दिवस. स्वातंत्र्य लक्ष्मीचा तो महोत्सव मराठ-मोळयांनीं न पाहिलेला, अदृष्टपूर्व-व न ऐकलेला-अश्रुतपूर्व-स्वराज्याच्या राज्यारोहणाचा प्रसंग शिवछत्राखालीं एकदिलानें लढून मिळविलेल्या स्वराज्याची संस्थापना पाहण्याचें भाग्य ज्या कष्टाळू नेकजात इमानी मराठे वीरांना लाधलें, धन्य त्यांच्या आईची कूस, धन्य ते मावळे व त्रिवार धन्य तो त्यांचा स्वराज्यसंस्थापक शिव—सम्राट !

* म. रामराव स. म. शि. च. मध्यें गुरुवार देतो.

राज्याभिषेक समारंभाचें सविस्तर वर्णन अस्सल पत्रांवरून मिळणें अशक्य झालें आहे. बखरींतून मात्र हीं वर्णनें विस्तृत खुलासेवार आहेत. ह्या पुस्तकांत राज्याभिषेकाचें सविस्तर वर्णन आम्ही मुद्दाम देणार आहों. कारण आतां येणाऱ्या लोकशाहीच्या काळांत असल्या समारंभांत धार्मिक पावित्र्य व मांगल्य आढळणार नाहीं ! स्वातंत्र्य, समता, बंधुत्व व न्याय या चतुः-सूत्रीवर आधारलेलें हिंदवी स्वराज्य स्थापन करणाऱ्या पुरुषाच्या प्रथम राज्यारोहणाचा वृत्तांत तरुणास मंगल, पवित्र व स्फूर्तीदायक वाटेल. म्हणून तो वृत्तांत मुद्दाम देण्याचें ठरविलें आहे. हिंदुस्थानला जरी यापुढें स्वराज्य मिळालें तरी या समारंभाची 'अद्वितीयता' अढळ राहील यांत संशय नाहीं. असो.

ज्येष्ठ शु॥ ४ स महाराजांचा व्रतबंध समारंभ झाला. महाराजांचें क्षत्रि-यत्व सिद्ध व सर्वमान्य झालें. व्रतबंधसंस्कार झाल्याशिवाय राज्यारोहण होऊं शकत नाहीं म्हणून हा समारंभ आधीं करण्यांत आला. तेव्हांपासून १० दिवस निरनिराळे विधी व समारंभ चालू होते. ज्येष्ठ शु॥ ६ स पट्ट-बंधन विधी करून ऋत्विजवर्णन पुण्याहवाचनपूर्वक यज्ञास आरंभ झाला. विनायकशांति केली. समारंभासाठीं सप्त समुद्र व पुण्य नद्यांचें पाणी आणविलें.

"मुख्य सिंहासन राजधानी करणें, त्यासी पुण्यदेश, पुण्यभूमि पाहून आसमद्भागीं पुण्यक्षेत्रें व महानदी व स्थानीं विपुल उदक कुत्रिम सरिता म्हणजे पाट नहर यांचीं उदकें सर्व धान्यें त्या देशी व्हावें ऐसें स्थान, व शत्रूस दुःसाध्य असावें यावरून रायगड ही जागा सर्व राज्यांत दुःसाध्य व श्रीकृष्णासमीप सर्व लक्षणें उत्तम आहेत पाहून योजिला" [म. ग. १६०]

ज्येष्ठ शु॥ १३ स सकाळीं समारंभास मुख्य सुरुवात झाली. अष्टप्रधान, पत्रलेखक, गणलेखक, ऋत्विज, छंदोगामात्य, कोशरक्षक, महालकरी, अठरा कारखान्यावरील कारखानीस, देशाधिकारी, व नगराधिकारी हे सर्व आपापल्या नेमणुकीप्रमाणें मंगलस्नानें व उत्तम पोषाक करून सिद्ध झाले. महाराज पट्ट-राणी सईबाईसाहेब व युवराज संभाजीसह विधियुक्त मृत्तिकास्नान, पंचगव्य-स्नान गंगादि पुण्य नद्यांच्या उदकाचें स्नान, पंचामृतस्नान व शुद्धोदक स्नान

करून शुभ्रवस्त्रें, अलंकार परिधान करून सिद्ध झाले. क्षीर वृक्षांचे (खैराचें) सव्वाहात उंचीचें सुवर्णानें मढविलेले सिंहासन* करून त्यावर महाराज बसले. पट्टबंधन करून सईबाई सिंहासनावर महाराजांच्या उजव्या बाजूस बसल्या, युवराज संभाजीही बसला. सिंहासनाचे पूर्वेस मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे घृतपूर्ण सुवर्ण कलश घेऊन उभे राहिले. दक्षिणेस सेनापती हंबीरराव मोहिते दुग्धपूर्ण रौप्य कलश घेऊन उभे राहिले. पश्चिमेस रामचंद्रपंत अमात्य दधिपूर्ण ताम्रकलश घेऊन उभे राहिले. उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडित मधुपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभे राहिले. उपदिशांना आग्नेयेस सचीव अण्णाजी दत्तो छत्र घेऊन उभे होते. नैर्ऋत्येस जनार्दनपंत हणमंते सुमंत व्यजन घेऊन उभे होते. सन्मुख सव्यभागीं पत्रलेखक बाळाजी आवजी लेखनपात्र घेऊन सिद्ध होते. इशान्य भागीं न्यायाधीश बाळाजी पंडीत दुसरे चामर घेऊन उभे होते. वामभागीं गण लेखक चिमणाजी आवजी लेखनपात्र घेऊन उभे होते. त्यांच्या सभोंवार सर्व कोशांचे व शालांचें अधिकारी होते. मुहूर्तघटी भरतांच ब्राह्मणांच्या वेद मंत्रोच्चाराबरोबर छत्रपतींवर मंगलाक्षतांचा वर्षाव आणि आम्रपल्लवांनीं तीर्थोदकाचें सिंचन करण्यांत आलें. त्यावेळीं मंगलवाद्यें दुंदुभि यांच्या ध्वनीनें आकाश दुमदुमून गेलें. ह्या अभिषेकानंतर मंगलस्नान होऊन सुवासिनींनीं आरती केली. कांस्य पात्रांत घृत घेऊन त्यांत व आरशांत मुखावलोकनाचा विधि झाला. शुभ्र वस्त्रें व अलंकार धारण करून सिंहासनावर आरूढ होण्याच्या समारंभास सुरुवात झाली. सिंहासनाची रचना अशी होती. क्षीर वृक्षाची वेदि करून ती सुवर्णानें मढविली होती. तळाशी १६ वृषभांची ओळ त्यावर मार्जाराची, त्यावर तरसाची, त्यावर सिंहाची, त्यावर व्याघ्रांचीं तोंडें सुवर्णाची करून बसविलीं होतीं. रत्नांचें हिऱ्यांचें व जडावाचें काम केलें होतें. त्यावर मृगचर्म पसरून सुवर्णाची नाणीं पसरलीं. त्यावर मृगचर्म पसरून मग वर गाद्या, लोड, तक्के मखमलीची अंथरली होती. सिंहासनावर छत्र व मेघ डंबरी उभारली होती,

* सिंहासन ३२ मण सोन्याचें होतें. [ सभासद ]

त्याचा चांदवा रत्नखचित सुवर्णाचा असून मोत्याची झालर व घोंस लाविले होते.

मुहूर्त होतांच श्रीविष्णूच्या सुवर्ण प्रतिमेची षोडशोपचारें पूजा व प्राण-प्रतिष्ठा केली. ती उजव्या हातीं घेऊन सिंहासनाला सव्य घालून उजवा गुडघा प्रथम ठेवून पाय न लावितां पूर्वाभिमुख करून महाराज सिंहासनावर बसले. मंगलवाद्यें, भेरी, तोफांची सरबत्ती, नृत्य, वाद्यजयध्वनी यांनीं आकाश भरून गेलें. रायगडावर तोफांचे आवाज निघतांच स्वराज्यांतील सर्व किल्ल्यांवर तोफांची सरबत्ती करण्यांत आली.

सिंहासनावर बसल्यावर रक्तवर्ण पोषाक, दिव्य अलंकार, व राजभूषणें धारण करण्यांत आलीं. नंतर विधिपूर्वक धनुष्यबाण खड्ग यांचीं पूजनें होऊन तीं धारण केलीं. तेव्हां सुवर्णपुष्पांची वृष्टि करण्यांत आली. पुन्हां सोळा सुवासिनींनी मंगल आरती ओवाळली त्यांस वस्त्रें,अलंकार दिले. ब्राह्मणांचे आशिर्वाद झाले. ऋत्विज, आचार्य व ब्राह्मणपूजन करून गागा-भट्टास १ लक्ष रुपये दक्षिणा दिली. ऋत्विजांस ५ हजार रुपये ह्याप्रमाणें इतर ब्राह्मण व याचक यांस द्रव्य देऊन तृप्त केलें.

यानंतर अष्टप्रधान व इतर अधिकारी यांस वस्त्रें देण्याचा समारंभ झाला. ज्यानें त्यानें आपापलीं पदें वस्त्रांसह स्वीकारून बहुमान पुरःसर महाराजांस नजराणा करून मुजरे केले. बाळाजी आवजी चिटणीस यांस चिटणीसीचीं वस्त्रें दिलीं. सर्वांचे मुतालिकही नेमून दिले. अष्टप्रधानाच्या गैरहजेरींत राजधानींत राहून त्यांचीं कामें मुखत्यारीनें चालविण्याचा त्यांचा अधिकार असे. शामजी नाईक पुंडे यांस पोतदारीचीं व बाळाजी रघुनाथ सबनीस यांस फौजेच्या बक्षिगिरीचीं वस्त्रें दिलीं. वरकड सुभेदार, महालदार,

* वस्त्रें देणें म्हणजे ज्याच्या त्याच्या पदाचा इतमाम ठरवणें, इतमामाप्रमाणेंच ठरलेला पोषाक अगर ऐश्वर्य त्याच्या अधिकाऱ्यानें मिरवावयाचें. उ० मोरे, पंतांच्या वस्त्रांचा तपशील. बादली वस्त्रें ५ सणगे व शिरपेंच, मोत्यांचे तुरे, कंठ्या, चौकडे, झगे, शिक्केकटार, ढालतलवार, चौघडे नौबती, जरीपटके, हत्ती-घोडे, व सोन्याच्या दांडीं चवऱ्या.

कारखानदार फौजेंतील सरदार, मानकरी, यांस त्यांच्या त्याच्या इतमामा-प्रमाणें वस्त्रें दिलीं. अशा प्रकारें स्वराज्याचा पहिला दरबार बरखास्त होऊन महाराजांची स्वारी देवदर्शनास निघाली.

सुलक्षणी सोन्याच्या साजानें शृंगारलेल्या व मोत्याची झूल घातलेल्या अश्वावर आरूढ होऊन महाराज महादरवाजासमोरील पटांगणांत आले. तेथें सोन्यामोत्याच्या अलंकारांनीं सजविलेल्या हत्तीच्या अंबारींत बसले. हत्तीचे गंडस्थळावर सेनापती हंबीरराव बसले होते, व मुख्य प्रधान मोरोपंत खवासखान्यांत मोरचेल घेऊन होते. राजवाड्यापासून जगदीश्वराचे देवळा-पर्यंत रस्ता कुंकुमाच्या सड्यांनीं रांगोळ्यांनीं व तोरणांनीं सुशोभित केला होता. मिरवणुकींत सर्वांपुढें जरीपटका व भगवें निशाण दोन हत्तीवर फड-कत होतें. त्यामागें प्रधानांच्या जरीपटक्याचे हत्ती व फौजेंतील निशाणें विराजत होतीं. खास हुजुर पागेचे घोडेस्वार, तोफखानें, पादाती, पटेकरी, विटेकरी, सांग-बर्चीवाले, कोतवाली हत्ती ५० सांडणीस्वार १०० बाजेकरी, कर्णेवाले, शिंगेवाले, भाटबंदीजन असे सळामिसळीनें चालले होते. महाराजांच्या खास अंबारीभोंवतीं मावळे सरदार चालले होते. प्रधा-नाच्या अंबाऱ्या सभोंवतीं अंतरानें चालल्या होत्या. त्यामागें लष्कराच्या निवडक तुकड्या अशी प्रचंड मिरवणूक राजवाड्यापासून निघाली. वाटेंत सुवा-सिनींनीं मंगलारत्या ओवाळल्या व लाह्या, पुष्पें, दुर्वा यांची वृष्टी करीत होत्या. अशा रीतीनें स्वारी जगदीश्वराचे मंदिरांत जाऊन यथाविधि पूजो-पचार झाल्यावर परतली. सभाद्वारीं पूर्णकलश लिंबलोण उतरून महारा-जांनीं ग्रहप्रवेश केला.

गृहांत येतांच महाराजांनीं कुलदेवता व मातोश्री जिजाबाई यांस वंदन केलें.

वाचक हो ! यथाविधि राज्यारोहण समारंभ पार पडून महाराज ज्यावेळीं मातोश्री जिजाबाईस वंदन करण्यास आले. त्यावेळीं त्या ‘ वीरसू ’ माऊ-लीला काय वाटलें असेल ? आपल्या पुत्राच्या महन्मंगल भाग्याचा अप्रतिम शुभ प्रसंग पाहून तिचें अंतःकरण भरून आलें असेल, गहिंवरानें कंठ दाटून आला असेल. त्रिलोकांत झेंडा फडकविणारा पुत्र आपल्या पोटीं जन्मास

येऊन गोब्राह्मणप्रतिपालक छत्रपति बनला! ही किती भाग्याची गोष्ट आहे. इंद्रादि देवतांचें ऐश्वर्य देखील यापुढें तुच्छ होय! मातोश्री जिजाबाईच्या आनंदाची परिसीमा झाली. माय–लेकराच्या ह्या रोमहर्षण भेटीस इतिहासांत दुसरी तोड सांपडणें मुष्कील. असो.

या दिवशीं सर्व आप्तेष्टांस मोठी मेजवानी झाली. समारंभ सुरु झाल्यापासून म्हणजे ज्येष्ठ शु॥ ४ पासुन ब्राह्मणभोजनें सारखीं चालू होतीं. रायगडाखालीं व रायगडावर अनेक ठिकाणीं मंडप वगैरे घालून ब्राह्मण भोजनांची उत्तम व्यवस्था ठेविली होती. समारभांत कोठेंही न्यून पडूं नये म्हणून निरनिराळ्या खात्यांवर निरनिराळे अधिकारी नेमून त्यांच्यावर जबाबदारी सोंपविली होती.

राज्यारोहण प्रसंगीं महाराजांनीं स्वराज्यांत महत्त्वाच्या सुधारणा केल्या.

१. महाराजांनीं सुवर्णतुला करून राजचिन्हें धारण केलीं. सुवर्णतुलेस १६००० हजार होन लागले (यावरून शिवाजीचें वजन १४० पौंड होतें)

२. रामदासस्वामीचा प्रसाद म्हणून भगवाझेंडा हें 'सेना चिन्ह' ठरविलें.

३. पूर्वीचा मुसलमानी शक बंद करून "राज्याभिषेक शक" सुरु केला. आणि "क्षत्रिय कुलावतांस शिव छत्रपती महाराज सिंहासनाधीश्वर" अशी बिरुदावली धारण केली. नवीन शकाचें नांव 'शिवशक' असें न ठेवितां 'राज्याभिषेक शक' असें ठेवण्यात महाराजांचा व्यक्ति गौरवापेक्षां स्वराज्य गौरवाच्या राष्ट्रीय बुद्धीचा प्रभाव दिसून येतो.

४. रायगड किल्ला राजधानी करण्यांत आली. राजधानीस अवश्य लागणाऱ्या तजविजी म्हणजे. वाडे, मंदिरें, सभागृहें, महादरवाजे, पागा, कोठ्या, पेठा, तलाव, भुयारें, मनोरे, रस्ते, वगैरे तयार करण्यांत आले.

५. राज्यकारभाराची व्यवस्था मुसलमानी बादशाही पद्धतीची न करितां महाभारत, स्मृति, कौटिल्यादि प्राचीन राजकारणी पुरुषांनी लिहिल्याप्रमाणें प्रधान–मंडळ–पद्धती सुरु केली. वास्तविक पधान मंडळाच्या नेमणुकी व राज–मुद्रा स्वराज्याच्या प्रथमोक्रमापासूनच सुरु केल्याचा इतिहासांत आधार

मिळतो. त्या राज्यारोहण प्रसंगीं प्रधान मंडळाच्या नेमणुकी वगैरे औपचारिक रित्या पुन्हां जाहीर करण्यांत आल्या,

**हिंदवी स्वराज्याचें पहिलें प्रधानमंडळ**

( मागें हुजुरे चवरी मोर्चेल, पंखे, पानदान घेऊन उभे. मध्यभागीं महाराजांचें सिंहासन. )

| उजवी बाजू | डावी बाजू |
|---|---|
| १ { मुख्य प्रधान ( पंत प्रधान ) फारशी नांव ( पेशवा ) } | १ ( सर नौबद ) सेनापति<br>२ ( डबीर ) सुमंत |
| २ ( मुजुमदार ) पंत आमात्य. | ३ न्यायाधीश. |
| ३ ( सुरनीस ) पंतसचिव. | ४ पंडितराव. |
| ४ ( वाकनीस ) मंत्री | |

हें मुख्य राजमंडळ झालें.

| | |
|---|---|
| ५ चिटणीस | ५ फडणीस. |
| ६ परराज्यांतील वकील | ६ सेनाधिकारी |

कचेरींत मुजुरे करविणें, योग्यते प्रमाणें उभे करणें, परकी परकी आल्यास वर्दी लावणें हीं कामें चोपदारांनीं दरबारांत पुढें राहून करावीं.

प्रधान मंडळाचीं नावें व वेतन.

| | |
|---|---|
| १ मुख्य प्रधान–मोरोपंत पिंगळे | १५००० होन |
| २ सेनापति–हंबीरराव मोहिते | १०००० ,, |
| ३ आमात्य–रामचंद्र निळकंठ बहुतकर | १२००० ,, |
| ४ सचिव–अण्णाजी दत्तो प्रभुणीकर | १९००० ,, |
| ५ सुमंत–जनार्धनपंत नारायण हणमंते | १०००० ,, |
| ६ न्यायाधीश–बाळाजीपंत पंडित | १०००० ,, |
| ७ मंत्री–सत्तोजीपंत त्रिमल | १०००० ,, |

* हंबीरराव मोहिते यास सेनापति द्यावी ऐसे नेमिले होते तेव्हां तो अडिल सिपाई जोहार करणार नाहीं ऐसे बोलला तें समई राघो मित्र याणें बहुत श्रम समागमें केला दिलीस बरोबर होता. ऐसे पाहून त्यास सेनापति देऊन उभा केला.
सभासद–विराचित शि. च. दुरुस्ती निबंध. कृ. वा. पुरंघरे.

प्रधानमंडळाचीं नांवें वेतन

पंडितराव–रघुनाथ भट्ट उपाध्ये, चंदावरकर १०००० होन

पाचाड व गव्यांवर सेटयेपणाचा हक्क गोपाळजी सेटीया* याचा होता. ( रा. ख. १८ पान ८० व ८२ )

शिवाजी महाराजांनीं राजकीय अधिकाऱ्यांचे पगार नक्त नेमणुकीनें बांधून टाकिले. कोणास वंशपरंपरा एखादें पद अगर जहागिरी–वतन दिलें नाहीं ही महत्त्वाची राज्यकारभारांतील सुधारणा महाराजांनींच प्रथम केली. + सरंजामी पद्धत नष्ट करण्यानें एक मोठी राजकीय सुधारणा घडून आली.

* गोपाळजी सेटियास हरकी होन प॥ १५० माथा ठेवले त्याचा वसूल द्यावयास, हिराजी इंदलकर सुभेदार माजी इमारती किल्ले रायगड याचें कर्ज घेतले. ( रा. खं. १८ पृ. ८२ )

+ सभासद विरचित शिव च. सा. खं. पृ. १०८ श्री. कृ. बा. पुरंधरे यांच्या लेखावरून. 'ते समई अवघे (अष्टप्रधान) उभे राहून विनंति केली जे महाराज आपण शाश्वत नरेंद्र सिंहासनारूढ जाहले. समस्त देव ब्राह्मण समक्ष तसेंच आम्हास तदाशत्व दिल्हे. परंतु या दतास शाश्वतवाभयें असावें ते समस्त ब्राह्मण मातबर लोकांचे व भटजींचे मुखे चित्त संतुष्ट जाहले नित्संदेह भासतो यैसी विनंति केली ते समयी गागाभट माहाराजास बोलिले ही गोष्ट प्रमाण आहे ब्राह्मण होत्साते क्षत्रीय अंश घरून व्हावें लागते तेव्हां त्यांचे समाधान आमचे समक्ष करावें हे उत्तम आहे. तेव्हां माहाराज बोलिले समाधान कोणते रीतीनें करावें तेव्हां भटजींनीं श्रीशंभु महादेव यावरील बेलभंडार, दवणा व आंबेच हाळद कुंकु व निर्माल्य आणून आपले हातीं घेऊनही राजाचे हातीं देऊन समस्त ब्राह्मण व आवघे सरदार जे मंडपी होते त्यांचे समस्त सिंहासनावरून बोलिले जे ही पदे तुम्हांस दिल्हीं यांत जो कोणी तुमचा यावत वंश आसल त्यावत खलेले करील त्याचा श्रीशंभु व तुळजाभवानी वंशक्षय करील हे समस्त ब्राह्मण आपण जगद्वंद्य यांचे समक्ष शिवाच्या सत्य, सत्य सत्य यैसे बोलून पूर्व युगवत येथा येथा स्थानी उभा राहावयास आज्ञा जाहली. तेव्हां भटजींनींही अतःपर निःसंदेह उभे राहावें यैसे सांगून प्रतिस्तंभीचे मंत्र उच्चारून येथा स्थानीं उभे केले आणि याज्ञिक संपूर्ण केलें.'

## उत्सव समयींचे पाहुणे.

२६. भूषण कवि रायगडावर उत्सव प्रसंगीं आला असून त्यानें 'शिवराज भूषण' हें काव्य निर्माण केलें. भूषण कवि आपल्या आगमनाबद्दल लिहितो.

॥ देसनि देसनि ते गुनी आवत जाचन ताही ॥
॥ तिनमें आयो एक कवि, भूषण कहियतु जाही ॥२५॥

शिवरायाच्या ह्या स्वतंत्र राज्याचा डंका उत्तरेपर्यंत पोंचून तिकडील पादशाही अमलाला कंटाळलेले गुणिजन महाराजांच्या आश्रयास येऊं लागले.

गागाभट्ट व त्याचे बरोबर कित्येक विद्वान् शास्त्री पुराणिक गुणिजन रायगडावर ह्या प्रसंगीं जमले होते. +

### वकील.

राज्याभिषेक समयीं शिवाजी महाराजांकडे निरनिराळ्या सत्ताधाऱ्यांकडून रायगडावर वकील आलें होते.

या समारंभास सुरतेच्या प्रेसिडंटचा मुलगा हेन्री ऑक्झेंडन हा हजर होता. त्याचे बरोबर दोन कंपनीचे व्यापारी व दुभाषा नारायण शेणवी असे होते. ही मंडळी एप्रीलच्या अखेरीस मुंबईहून जहाजांत बसून चौलास उतरली; तेथून रोह्यास दुसरें दिवशीं पोंचलें. रोह्याहून पालखी करून ते निजामपुरास ( कोस्ते ) गेले. मग पाचाडास पोचले. शिवाजी महाराज राज्याभिषेकाच्या धांदलींत असल्यामुळें १०।१५ दिवस त्यांची भेट झाली नाहीं. महाराजांस मोकळीक मिळाल्यावर ह्या वकिलांस गडावर बोलावून दुभाषा नारायण शेणवी यांचे मार्फत व्यापारी तहाचें बोलणें झालें. इंग्रज वकिलांनीं आणिलेला नजराणा मोरोपंत पेशव्यांमार्फत महाराजांस अर्पण करण्यांत आला. त्याचा तपशील, ६ मोतीं, ३ हिऱ्याच्या आंगठ्या, शिरपेंच पिसाचे आकाराचे किंमत ६८० रु., सलकडीं ४५० रु. किंमतीची. मुख्य दरबारला हे इंग्लिश वकील हजर असून त्यांनीं सिंहासनाधिष्ठित शिवछत्र-

---

+शुद्धिसमारंभः—नेताजी पालकर हा बाटून मुसलमान झाला होता. त्यास शके १५९८ (सन १६७६ जून १७) ला याच रायगडावर शुद्ध करून पुन्हां हिंदु धर्मांत घेतलें.

पतींना लवून मुजरा केला ! तो देखावा पुढें २०० वर्षांनीं उलटा दिसूं लागेल असें भविष्य कोणा भविष्यवाद्याला त्यावेळीं करतां आलें असतें काय ?

गोंवळकोंडेकरांनीं ( कुत्बशहानें ) हत्ती, घोडे, जवाहीर वगैरे नजराणा आपल्या वकिलाबरोबर पाठविला होता.

गोव्याच्या पोर्तुगिजांचें याच वर्षीं चौथाईबद्दल महाराजांशीं भांडण चाललें होतें त्या बाबत विचार करणेसाठीं त्यांचाहि वकील नजराणा घेऊन आला होता.

## राज्याभिषेक महोत्सवाची फलश्रुति

२७. हें पुस्तक जरी मुख्यतः रायगड विषयक आहे; तरी आम्हीं पर्यायानें रायगडशीं निगडित झालेल्या स्वराज्य–स्थापनेच्या कल्पनेचें सूत्र अखंडित राहील असेंच विवेचन ह्या प्रकरणांत केलें आहे. राज्याभिषेक महोत्सवांचें विस्तृत वर्णन दिल्यावर ओघानेंच त्याची फलश्रुति सांगावीशी वाटणार. म्हणून विषयांतर होत असल्यास तो दोष पतकरून थोडक्यांत फलश्रुति सांगावयाची आहे.

पनामा कालव्यांतून प्रवास करणारे प्रवासी सांगतात कीं " आम्हांला समुद्रांतून डोंगराच्या माथ्यावरील सरोवरांत जातांना आम्हीं पाणशिडीनें उंच उंच जात आहोंत असें वाटत नाहीं. मात्र जेव्हां डेकवर यावें व दूरवरचा समुद्र आपल्या कितीतरी खालीं आहे हें पहावें तेव्हां आपण उंच आल्याचें पाहून आश्चर्य वाटतें. उतरतांना हीच स्थिती होते. " स्वातंत्र्यांतून पारतंत्र्यांत जातांना किंवा पारतंत्र्यांतून सुटका होऊन स्वतंत्र होतांना अशीच स्थिती होते. शिवाजी महाराज आणि त्यांचें मित्र–मंडळ यांनीं सुमारें २५ वर्षें अविश्रांत उद्योग करून महाराष्ट्र स्वतंत्र केला. यवन बादशहांच्या गुलामगिरींतून लोकांची प्रत्यक्ष जरी सुटका झाली तरी मनानें घेतलेली पारतंत्र्याची ' हाय ' गेली नव्हती. मानसशास्त्र सांगतें कीं, रोगी जरी पूर्ण बरा झाला तरी मनानें घेतलेली " आपण रोगी आहों " ही त्याची भावना नष्ट झाल्याशिवाय तो पूर्ण रोगमुक्त होत नाहीं. हेंच तत्त्व राजकीय बाबतींत लागूं पडतें. मुसलमानी अमलाचा तीनशें वर्षांचा बाऊ महाराष्ट्राच्या

मनांतून काढून टाकण्यासाठीं व सर्व हिंदुस्थानला झालेली स्वातंत्र्याची स्मृति जागृत करण्यासाठीं एवढा प्रचंड राज्याभिषेक–महोत्सव करणेंच जरूर होतें. ह्या महोत्सवाचा पाया इतका भक्कम, हेतुपूर्ण व विस्तारसूचक कीं या पायावर उभारलेले, ' हिंदवी स्वराज्यानें ' इतिहासांत अनेक चमत्कार करून दाखविलें. आम्हीं मराठे स्वतंत्र आहों, आम्हीं कोणाचे ताबेदार होणार नाहीं, हें पहा आमचें स्वतंत्र सिंहासन आणि हा पहा आमचा स्वतंत्र राजा. आह्मांला मुसलमानी सुलतानशाही राज्य नको, आमच्याच राजानें आम्हांसाठीं चालविलेलें देवाब्राह्मणांचें रक्षण करणारें स्वराज्य पाहिजे. तुमच्या बादशहाचा नूर पौर्णिमेच्या चंद्रासारखा तर आमचा राजाचा नूर " प्रतिपच्चंद्र रेखे " सारखा वर्धिष्णु व विश्ववंदित आहे. ह्या भावना या समारंभानें जनतेच्या मनांत जागृत करावयाच्या होत्या. हिंदी जनतेच्या मनात राष्ट्रधर्माला थारा नव्हता असें कोणी इतिहासज्ञ म्हणत असेल तर म्हणो. पण स्वराज्य संस्थापनेच्या शिवाजीमहाराजांच्या कल्पनेंत राष्ट्र–धर्मच प्रमुख होता. ह्या राष्ट्र–धर्माची संस्थापना रायगडावर ह्या उत्सवानें जाहीर रीतीनें करून ह्या ' नवधर्माचा ' प्रसार महाराष्ट्रभर केला.

राज्यभिषेक महोत्सवानें मराठ्यांचा स्वतंत्र राजा स्वतंत्र बाण्यानें स्वराज्य चालवूं शकतो, इतकेंच काय तर तो सिंहासनाधीश्वर होऊन हिंदुपदपादशाहीचा दृढ पाया घालतो, हें मुसलमान पादशहांना व तसेंच त्यांच्या हिंदू प्रजेला विदित झालें. शिवाजी हा उपेक्षणीय किंवा दंडनीय कोणी भुरटा लुटारू आहे अशी जी स्वकीय व परकीय लोकांची वेडगळ समजूत होती, तिला यानें मोठाच धक्का दिला. दीडशें वर्षें मराठी राज्य टिकण्याला दुसरीं अनेक कारणें असतील; पण हें उच्च भावना जागृत करणारें कारण सर्वांत श्रेष्ठ होय !

२८. राज्यभिषेक महोत्सव झाल्यावर एक मोठी दुःखदायक पण जगाच्या रहाटीप्रमाणें पाहिलें असतां अपरिहार्य गोष्ट घडून आली ती म्हणजे राजमाता*

---

* राजमाता जिजाबाई यांचा मुक्काम रायगडाखालीं पाचाड गांवीं असे. तेथें त्यांचा राजवाडा व विहीर होती. वाड्याचें जोतें व विहीर अद्यापीं आहे.

जिजाबाईसाहेब यांचा मृत्यु ही होय. आपल्या भुवनश्रेष्ठ पुत्राच्या मस्तकावर ' याच देहीं याच डोळा ' छत्रचामरें विराजलेलीं पाहिल्यावर जणु आपलें इहलोकींचें इतिकर्तव्य संपलें असें जाणून ज्येष्ठ वा। ९ शके १५९६ रोजीं रायगडाखालीं पाचाडगांवीं जिजाबाईसाहेब मृत्यु पावल्या. [ १८ जून १६७४ ]

महाराज परम मातृभक्त. मातृवियोगदुःख त्यांना असह्य झालें. जिच्या श्रेष्ठ शिक्षणानें, उज्ज्वल उपदेशानें, उद्बोधक आज्ञेनें आपण हा प्रचंड उद्योग सिद्धीस नेला; ती परमप्रिय माता सोडून गेली. हें पाहून दुःखानें महाराज विषण्ण बनले ! चार महिने ते कोठेंच स्वारी शिकारीस गेले नाहींत; सिंहासनारोहण देखील महाराजांनीं केलें नाहीं. म्हणून अश्वीन शु॥ ५ च्या मुहूर्तावर पुन्हां * सिंहासनारोहण केलें. नंतर प्रतापगडच्या भवानी मातेचें दर्शन घेऊन सद्गुरु रामदासांचें, जेजुरीच्या खंडोबाचें व शिंगणापुरच्या महादेवाचें दर्शन घेतलें.

## राजधानीची बांधणी.

२९. रायगडचें मूळचें बांधकाम कोणी केलें हें जरी अज्ञात असलें तरी शिवाजी महाराजांनीं रायगड राजधानी करतांना त्याची बरीच उस्तवारी केली. वास्तविक मागील राजवटींत हा कांहीं कोणा राजाचा राहण्याचा किल्ला नव्हता. रायरी मामल्याच्या मामलतदारांचें हें ठिकाण. त्याची राजधानी करतांना त्यांस अनेक सुधारणा करणें जरूर होतें.

जिजाबाईची छत्री पाचाड गांवीं असून तिचा फोटो केसरी ता. १२।१०।२९ च्या अंकांत आला आहे.

जिजाबाईची ५ लाख होनांची खासगी मालमत्ता होती; ती त्यांनीं महाराजांच्या स्वाधीन केली.

* भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष १० शके १८५१ अंक १ ला

'श्री शिवराज्याभिषेक कल्पतरू' या ग्रंथांत निश्चलपुरीनें तांत्रिक पद्धतीनें ललिता पंचमी ( आश्विन शु॥ ५ ) स केलेल्या दुसऱ्या राज्याभिषेकाची माहिती दिली आहे.

'तस्य पर्वतराजस्य बलिदानं न चार्पितं। तत्र त्या शिरका देवी पुजिता नैव वेद्विज'॥

शके १५९२ च्या सुमारास राजगडावरील ठाणें उठवून रायगडावर नेल्याचें मागें आलेंच आहे. राजवाडे खंड ८ ले. १८ मध्यें शिवाजीनें केलेल्या रायगड दुरुस्तीची यादी दिली आहे. तींत तेथें तळीं व इमारती बांधण्याकरितां ५० हजार होन शके १५९४ सालीं खर्च झाल्याचें नोंदलें आहे.

रायगडाचा खर्चाचा तपशील.

३५००० दिवाणांची घरें
२०००० तळीं २
१०००० गच्ची
५००० बाले किल्ला
३५०००
१५००० तट
५०००० एकुण राजवाडे खंड ६ पृष्ठ १८

रायगडावर दुरुस्तीचें व इमारती बांधण्याचें काम आबाजी सोनदेव यांचेकडे महाराजांनीं सोपविलें होतें. राजधानीच्या सोईसाठीं खालीलप्रमाणें इमारती वगैरे बांधण्यांत आल्या.

खास महाराजासाठीं राजवाडा, अठरा कारखान्यांचीं स्थलें, प्रधान, त्यांचे सरकारकून यांचे वाडे, सिंहासनाची जागा व सभागृह ( दरबार हॉल ) पुढील महादरवाजा, मनोरे, + पेठ, दारुचीं कोठारें, तलाव. जगदीश्वराचें मंदीर *पागा इ. इ. स्थळें बांधविलीं. या शिवाय विवेकसभा ( पंडितांचें वादस्थळ ) न्यायसभा प्रगटसभा, ( गरिबांची भेट घेण्याचें ठिकाण ) प्रबोधसभा ( किर्तन, पुराण श्रवण करण्याचें स्थळ ), रत्नशाला नीतिसभा, आंतर्गृहें, देवगृहें, महाल, इ. इ., कित्येक बांधण्यांत आलीं. रायगडची चौफेर तटबंदी दुरुस्त करून जागजागीं बुरुज देऊन

+ पेठेची रचना सुंदर व व्यवस्थित आहे सर्व दुकानांचीं लांबी, रुंदी, उंची सारखी असून घोड्यावर बसून सामान घ्यावें. आज पेठेचें चिरेबदी जोतें फक्त शिल्लक आहे.

* जगदीश्वराचें मंदीर हिराजी इंदलकरच्या हातून बांधविलें त्याचें वर्णन पुढें येईल.

एकच वाट कायम करण्यांत आली. खाफीखान यानें अशी एक आख्यायिका दिली आहे:— सर्व बंदोबस्त झाल्यावर महाराजांनीं जाहीर केलें कीं जो राजमार्ग ठेविला आहे त्या शिवाय अन्य मार्गानें हातीं निशाण घेऊन गडावर येणारास १०० होन व एक सोन्याचें कडें बक्षिस मिळेल. एका धेडानें अवघड वाटेनें किल्यावर निशाण रोविलें. त्यास सदरहू बक्षिस मिळालें व ती अवघड वाट बुजवून टाकण्यांत आली.

## रायगडावरील शिवाजी महाराजांचा मृत्यु

३०. विजापूरच्या आदिलशाहीशीं कटकट उपस्थित झाल्यावर व दुसऱ्या अनेक कारणांनीं महाराज दक्षिण दिग्विजयांस शके १५९९ मध्यें गेले. तिकडे अनेक लढाया केल्या. अनेक राजकारस्थानें केलीं, व्यंकोजीची समजूत काढून त्यास मार्गावर आणिलें.

राज्याभिषेकानंतर लगेच राजमाता वियोगानें महाराज दुःखी झाले. पुढें संभाजी औरंगजेबास मिळाल्याचें दुर्वृत्त ऐकून तर महाराज विलक्षण विषण्ण झाले. अशा स्थितींत कर्नाटकच्या मोहिमेंत फार +दगदग पडली. त्याचा वाईट परिणाम महाराजांच्या प्रकृतीवर होऊन त्यास गुढगी नांवाचा रोग झाला. त्यांतच ७ दिवस ताप येऊन शके १६०२ चैत्र शु॥ १५ मेस ता. ३ एप्रिल स. १६८० हिंदवी स्वराज्य संस्थापक शिवाजी महाराज रायगडावर कैलासवासी झाले !

हिंददेवीचा स्वातंत्र्य–संपादक कंठमणी एकाएकीं गळून पडला. महाराष्ट्राचा पहिला छत्रपती त्याला सोडून गेला. स्वराज्याचा मुख्य आधार तुटला ! महाराष्ट्राच्या भाग्याकाशातील अत्यंत तेजस्वी तारा तुटला !

महाराजांच्या ह्या आकस्मिक मृत्यूनें रायगडावर सर्वत्र हलकल्लोळ उडाला. आप्तेष्ट, मंत्री व मुत्सद्दी किंकर्तव्य मूढ बनले. आबालवृद्ध शोक-

+ दिल्लीहून औरंगजेब खजिना घेऊन येत होता. त्यास लुटण्याकरितां घोड्यावरून अतिवेगानें स्वारी करून शत्रूचा अडथळा येण्याचें आंत रायगडावर दौडत आल्यामुळें अतिश्रमानें छातींत दुखूं लागलें. थुंकीतून रक्त पडूं लागलें व अंगांत मनस्वी ज्वर भरला. ( केळुसकर कृत शिवचरित्र )

सागरांत बुडाले.* प्रधानमंडळानें किल्ल्याचे दरवाजे बंद करून ही वार्ता बाहेर न पसरण्याची तजवीज केली.

महाराजांच्या शवाची सर्व राजचिन्हांनीं युक्त अशी मिरवणूक काढून जगदीश्वराचे देवालयासमोर चंदनकाष्ठें व बेलकाष्ठें यांची चिता रचून देहास यथाविधी अग्निसंस्कार दिला. सर्व उत्तरक्रिया साबाजी भोसले सिंगणापुरकर यानें राजारामास संनिध बसवून केली ! ( वडील पुत्र संभाजी पन्हाळ्यावर कैदेंत होते. ) महाराजांची तृतीय पत्नि पुतळाबाई हिनें सहगमन केलें.

महाराजांच्या चितेची रक्षा जगदीश्वराचे देवळासमोर पुरून त्यावर चिरेबंदी अष्टकोनी समाधी बांधण्यांत आली. त्यावर छत्री वगैरे उभारण्याचा राजमंडलाचा हेतु असणें उघड आहे; कारण त्या अष्टकोनी चौथऱ्याचें बांधकाम इतकें मजबूत आहे कीं, नुकतीच बांधलेली छत्री २५० वर्षें ऊन, पाऊस खाल्लेल्या त्यान चौथऱ्यावर उभारणें इंजिनियरना धोक्याचें वाटलें नाहीं. छत्रपतींच्या इतमामास साजेशी छत्री किंवा मंदीर बांधण्याची योजना पुढील बेबंदशाही राजकारणामुळें तडीस गेली नसण्याचा संभव आहे ! मराठेशाहीच्या भरभराटीच्या काळांतही महाराजांच्या समाधीकडे राजकर्त्यांचें लक्ष कां गेलें नाहीं हें एक त्रिकालज्ञ काळच जाणें !

महाराष्ट्राच्या पहिल्या छत्रपतीची छत्री स्वराज्य असतांना न बांधण्याची चूक परतंत्र महाराष्ट्रानें आता दुरुस्त करून महाराजांच्या समाधीवर छत्री उभारली. हा तरी एक शुभसूचक योगायोग म्हटला पाहिजे !

* राजियाचें देहावसान जालें, ते दिवशीं पृथ्वीकंप जाहला. गगनीं धूमकेत उदेला. उल्कापात आकाशाहून जाला. रात्रीं जोड इंद्र धनुष्यें निघालीं. अष्टदिशा दिग्दाह होऊन गेल्या. श्रीशंभु महादेवीं तळ्याचें उदक रक्तांबर जालें. ( सभासद बखर पृ. १०५ )

# प्रकरण ४ थें.



## रायगडावरील दुर्घटना.



शिवाजी महाराजांच्या आकस्मिक मरणामुळें रायगडावर चमत्कारिक दुर्घटना सुरू झाल्या. अण्णाजी दत्तो व सोयराबाई यांच्या कारस्थानाला मुत्सद्दीमंडळ बळी पडून महाराजांच्या मृत्यूची खबर पन्हाळयावर नजर कैदेंत असलेल्या संभाजीपासून गुप्त ठेवण्याचें ठरलें व त्यास ज्यास्त बंदोबस्तानें वागवावे अशाबद्दल सक्तीचे हुकूम पन्हाळयाचा किल्लेदार हिरोजी फर्जंद यास पाठविले. बाळाजीपंत चिटणीस ह्या कारस्थानास प्रथमपासून विरोधी होता. त्याच्या हस्ताक्षराचे हुकूम राज्यांत खामाखाय मानले जात; म्हणून मुत्सद्दी मंडळींनीं त्याला हुकूम लिहिण्याची विनंति केली. त्यांनीं ती गोष्ट नाकारली. तेव्हां त्याच्या मुलाच्या हस्ताक्षरानें हुकूम धाडण्यांत आला. असा बंदोबस्त करून वैशाख व॥ २ स राजाराम महाराजांकडून रायगडावर मंचकारोहण करविलें.

२. इकडे पत्रें घेऊन गेलेल्या जासुदास पन्हाळयावर संभाजीनें गांठून तीं पत्रें हस्तगत केलीं. अशा रीतीनें संभाजीस आपल्या विरुद्ध असलेल्या कटाचा सुगावा लागला. आधींच कैदेंत ठेवल्यामुळें चिडलेला संभाजी कटामुळें एकदम खवळला. हिरोजी संभाजीच्या रागापुढें भिऊन चिपळूणकडे आधींच पळाला होता. संभाजीनें एकदम पन्हाळा काबीज केला. तेथील थोड्याशा फौजेनें त्याला कटवाल्यांचा बंदोबस्त करतां येत नव्हता. म्हणून त्यानें जनार्दनपंत सुमंताच्या फौजेंत फिसाद करून एकेरात्रीं सुमंतास पकडून पन्हाळयांत कैद केलें. संभाजीच्या रोषाचा हा पहिला बळी ! अनायासें ती फौज संभाजीच्या छत्राखालीं आली. संभाजीच्या ह्या तडफेचा मराठी सैन्याच्या मनावर अनकूल परिणाम झाला. हुकमाचा चाकर ‘ अडेल

सिपाई ' हंबीरराव हा यानंतर ससैन्य संभाजीस मिळाला. अशाप्रकारें सैन्याची पुरेशी तयारी झाल्यावर संभाजी रायगडावर चालून आला. रायगडच्या पायथ्यास पाचाड येथें मालसांवत नांवाच्या मावळयांच्या सरदारास बंदोबस्तास ठेविलें होतें. संभाजीनें कैदेंतून सुटल्यापासून विद्युद्वेगानें ज्या हालचाली केल्या त्यांत त्याला जें यश आलें त्याचा परिणाम असा झाला कीं, संभाजी हा शिवाजी महाराजांचा जेष्ठपुत्र असून, राज्याचा खरा वारस आहे; व आपण समजत होतो तसा दुर्गुणी नालायख नाहीं, अशी जनतेची समजूत होऊन, लोकमताचा वारा संभाजीला अनुकूलतेनें वाहूं लागला. पाचाड येथें संभाजी आल्यावर त्याला कोणीच प्रतिकार केला नाहीं; उलट संभाजीचें येणें जणूं काय अभिप्रेत आहे अशा भावनेनें गडाच्या दरवाजाची दिंडी सुद्धां कोणी लावून घेतली नाहीं. आषाढ शु॥ २ शके १६०२ मध्यें संभाजी रायगडावर आला. गड पूर्ण ताब्यांत येतांच विरुद्ध कटवाल्या मंडळींस कैद करण्याचा सपाटा लाविला. कटाच्या आरोपांत शिवशाहींतील बहुमोल नररत्नें बळीं पडली. अण्णाजी दत्तो, सोयराबाई व तिचे आप्त शिर्के, चिटणीस बाळाजी आवजी, हिरोजी फर्जंद हे त्या * नरमेधांतील प्रसिद्ध नरबली होत. महाराष्ट्राच्या राजासकट सर्वांनीं देव समजून ज्या चिटणिसांची पूजा करावी त्या चिटणीस घराण्यावर संभाजीची इतकी इतराजी कां व्हावी हें ऐतिहासिक गूढ उलगडत नाहीं. शिर्क्यांवर संभाजी इतका खवळला कीं शिर्का जेथें सांपडेल तेथें त्याचा शिरच्छेद करण्याचा सपाटा

* कटवाल्या मंडळींचा हा अमानुष सूड संभाजीनें रायगडावर येतांच केला, कां पुढें वर्ष दोन वर्षांनीं सोयराबाईच्या मदतीनें संभाजीस पुन्हां विषप्रयोग करून मारल्याचा खरा पुरावा हातीं आल्यावर केला याबद्दल दुमत आहे. संभाजी अमानुष क्रूरकर्माच असता तर त्यानें कटवाल्यांचें जें मूळ अधिष्ठान राजाराम त्यासच जिवंत ठेवलें नसतें. यावरून तो राज्यासाठीं भावांचा वध करणाऱ्या औरंगजेब सारखा अभिजात क्रूरकर्मा नव्हता. मुत्सद्दी मंडळींनीं डिवचल्यामुळें तो खवळला, त्याच्या भरांत विवेक न राहातां त्याच्या हातून हें परिणामतः दुष्कर्म वाटण्यासारखें कृत्य झालें हें मात्र खरें. प्रस्तुत ग्रंथांत संभाजीवरलि आक्षेपांचें किंवा त्याच्या कृत्यांचें विवेचन अप्रस्तुत आहे; म्हणून अन्यमताचें फक्त दिग्दर्शन केलें आहे.

त्यानें चालविला. ( यावरूनच शिरकाण शब्द प्रचारांत आला असें सरदेसाई म्हणतात. परंतु निजामपूरकडील या भागास या पूर्वीच शिरकाण म्हणत हें मागील एका अस्सल पत्रांत नमूद आहे. ) राजारामाची आई सोयराबाई हिला राजांना विषप्रयोग केल्याच्या आरोपावरून रायगडीं भिंतींत चिणून मारिलें. राजाराम केवळ ११ वर्षांचें लेकरूं. त्यास फक्त कैद केलें. रायगडावरील हा अमानुष नरमेध पाहून व त्याच्या भयंकर वार्ता ऐकून शिव–शाहीच्या एक–निष्ट हितचिंतकांस परम दुःख झालें. राजगुरु रामदासस्वामी यांनीं संभाजीस एक पत्र लिहून ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला. जुन्या राजवटींतील थोरथोर माणसें संभाजीला• ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करूं लागलीं.

३. कर्नाटकांतील प्रसिद्ध शूर मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते हे मुद्दाम संभाजीच्या भेटीकरितां आले. त्यांनीं बरोबर ४० लक्ष• होन कर्नाटक प्रांताच्या वसुलाचा भरणा म्हणून व उत्तम नजराणा आणिला होता. रघुनाथपंत भेटीला येतांत असें कळल्यावरून संभाजीनें त्यांची भेट बिरवाडी नजीकच्या आंबराईंत मोठा व शोभिवंत शामियाना उभारून तेथें घेतली. त्या वेळीं तेथें बडा दरबार भरला. राज्यांतील शिल्लक असलेलीं थोर माणसें तेथें जमलीं होतीं. रघुनाथपंतानें मोठ्या इतमानानें नजराणा करून मुजरे केलें त्या गंभीरप्रसंगीं 'पुढें काय'? असा सूचक प्रश्न काढून संभाजीस पुष्कळ उपदेश केला. रात्रौ मोठी मेजवानी केली. नंतर रघुनाथपंत रायगडीं गेला. तेथें पाहतो तों संभाजीच्या वर्तनांत सुधारणा न दिसतां तो कलुषा कबजीच्या ज्यास्त ज्यास्त ताब्यांत जात चालला. तेव्हां रघुनाथपंत पुन्हां कर्नाटकांत निघून गेला.

४. वाचक हो! ज्या रायगडावर स्वराज्यलक्ष्मीची अद्भुत रम्यक्रीडा आपण अवलोकन केलीत त्याच रायगडावर दुहीच्या दुष्ट सैतानाचा नंगानाच पाहाण्याचें नशिबीं आलें आहे. चिटणीसांच्या घराण्यांतील तीन पुरुष हत्तीच्या पायीं तुडविले गेले ही दैवदुर्विलासाची परिसीमा नव्हे काय?

रायगडचा बंदोबस्त झाल्यावर संभाजीनें १६०२ च्या श्रावण शु॥ ५ स मंचकारोहण केलें. कार्तिक शु॥ ७ स केळशीवर स्वारी केली. तें ठिकाण

काबीज करून शु॥ १३ परत आले. याच वर्षी माघ शु॥ ७ संभाजीनें विधियुक्त सिंहासनारोहण करून यथापूर्व अष्ट प्रधानादि नेमून राज्यकारभार हांकण्यास सुरवात केली. संभाजी गादीवर बसतांच एक मोठें वज्रसंकट मराठेशाहीवर कोसळलें. तें म्हणजे औरंगजेबाची दक्षिणेंतील स्वारी हें होय. त्यामुळें राज्यावर बसल्यावर स्वकीयांचा विरोध व औरंगजेबासारख्या प्रबल शत्रूकडून होणारे आघात, या कात्रींत संभाजी सांपडला. पण त्याच्या अंगीं अभिजात शूरत्व व निर्भय धडाडी असल्यामुळें त्यानें रायगडावर स्वस्थ न बसतां महाराष्ट्रभर वायुवेगानें संचार करून सर्व शत्रूंना थोपवून धरलें. संभाजीच्या ह्या रणशूर कर्तबगारीवर फिदा होऊन औरंगजेबाचा पुत्र अकबर हा बापाजवळ भांडून रायगड येथें संभाजीच्या आश्रयास आला. सार्वभौम दिल्लीपतीचा पुत्र ज्याच्या आश्रयास येतो त्याच्या पराक्रमाची थोरवी काय वर्णावी ! रायगडावर शाहजादा आला तेव्हां संभाजी स्वारीवर होता. परंतु त्याचा इतमाम चांगल्या तऱ्हेनें राखला गेला.

संभाजी गादीवर बसतांच त्यानें क्षणाची फुरसुद न घेतां जंजिऱ्याच्या सिद्दी, पोर्तुगीज व मोंगल यांच्याबरोबर धडाडीचे युद्धप्रसंग केले. सिद्दी आरमारांत श्रेष्ठ होता; म्हणून आपल्या आरमाराची त्यानें वाढ केली. जंजिरा घेण्याची त्यानें एक अजब युक्ती योजिली. जंजिऱ्या किल्यापासून उत्तरेच्या डोंगरापर्यंतचा सर्व समुद्र भराव टाकून हटवावा आणि मग खुष्कीनें जंजिऱ्यावर हल्ला करावा असा विचार त्यानें केला. नेपोलियनची " डोव्हरच्या सामुद्रधुनीवर मला कोणी ६ तास प्रभुत्व दिलें तर मी इंग्लंडचें नांव उरविणार नाहीं " ही घोषणा व संभाजीची ही अजब कल्पना यांपैकीं श्रेष्ठ कोणती याचा वाचकांनींच विचार करावा. पुढें अनेक कारणामुळें हा बेत संभाजीस सिद्धीस नेतां आला नाहीं.

शके १६०६ * च्या सुमारास संभाजीनें १० हजार घोडेस्वार रायगडाहून अशा वेगानें मोगलांच्या मुलखांत धुमाकूळ घालण्यास पाठविलें कीं

* शके १६०६ माघ शु॥ १० हंबीरराव सेनापती यांचें रायगडाहून लिहिलेलें पत्र सांपडतें.

त्यांनीं ब-हाणपूर लुटून मोंगलास धूळ चारिली. हीं व अशीच अनेक धाडसीं कृत्यें केल्यामुळें संभाजीस जेर करणें बादशहास अशक्य वाटून तो गोवळकोंडे व विजापूर येथील बादशाहींशीं युद्ध करण्यास गेला.

राजवाडे लेखांक २८० शके १६०७ जेष्ठ शु॥ ७ चे एक पत्र येथें उधृत करतों, त्यावरून संभाजीच्या कारकीर्दींत मोगलांस नामोहरण करण्याचा कसा कसून प्रयत्न मराठ्यांकडून चालला होता तें दिसून येईल.

" राजमान्य राजश्री कृष्णाजी दादाजी प्रभु देशपांडे सबनीस व जामनीस नि॥ लोक हशम दि॥ हुजरात कौजे कारी वडतुंबी कोरळ चौकी कोरळ खिंड तां रोहिडखोरें गोसावी यांसी श्री शंकराजी नारायण आशिर्वाद उपरी मावळ प्रांत गनिमानी चाल केली आहे म्हणोन समजले त्यास कोरळ खिंड व ढवळा घाट व मांडरदेवचा सडा येथील जागा जागा-चौक्या घालून गनीमाची खबर ठेवून कमकसून खास बातमी पावती करणें + + + + " राजगडी " कळवितांच तुमची कुमक रोहिड वगैरे जागा-हून होईल तुम्ही सिखली मर्दमुकी चांगली केली हें खबर येथें समजली या वेळीं गनिम नामोहरम सर्वांनी करावा तुम्ही जमेदार व सस्वाकर माहाराजांचे वेळचे + + + + करोन दाखवतील हा भरवसा आहे; "

पुढें औरंगजेब संभाजीवर तुटून पडला. मराठयांचे किल्ल्यामागून किल्ले घेण्याचा त्यानें सपाटा लाविला. परंतु रायगडचा बंदोबस्त उत्तम असल्यामुळें त्या किल्ल्यावर स्वारी झाली नाहीं. संभाजीच्या धडाडीची ओळख मराठयांस पटून मराठे सैनिक त्याच्या निशाणाखालीं शत्रूंशीं चौफेर लढाईची बेहद्द करूं लागले. परंतु संभाजीच्या पराक्रमाला दुर्व्यसनाची किड लागली; आणि सद्गुणांना खलसंगतीनें ग्रासल्यामुळें त्याच्या कारकीर्दीची अखेर अत्यंत दुःखदायक होऊन, मराठी स्वराज्याच्या राजधानीला दुर्दिन प्राप्त झाले. तो शोकपर्यवसायी इतिहास पुढील प्रकरणीं वाचावयास मिळेल.

---

# प्रकरण ५ वें.

## रायगडचा वेढा.



विजापूर व गोंवळकोंडें येथील राज्यें नष्ट करून औरंगजेब पुन्हां मराठयांच्या राज्याकडे वळला. त्यानें निरनिराळे सरदार मोठें सैन्य देऊन मराठी मुलखावर चौफेर रवाना केले. पैकीं मुकर्रबखान हा कोंकण प्रांतीं पाठविला. संभाजी या वेळीं रत्नागिरी जिल्ह्यांतील संगमेश्वरीं होता. शके १६१० [सन १६८८ डिसेंबर ता। २८ मनूची यानें दिलेली तारीख) मध्यें संभाजीस मुकर्रबखानानें अवचित पकडलें. त्यांस हत्तीवर बांधून बादशहाच्या छावणींत तुळापूर येथें पाठवून दिलें. तेथें बादशहानें फाल्गुन व॥ ३० शके १६१० त संभाजीचा अमानुषपणें वध केला !

२. संभाजीच्या वधाची वार्ता रायगडावर आणि सर्व महाराष्ट्रभर पसरली. मोहोळाच्या लक्षावधी माशा खवळून व पिसाळून मध काढणाऱ्यावर तुटून पडाव्या तशींच गत संभाजीच्या वधानें औरंगजेबाची झाली. संभाजीला ठार केला कीं, मराठे विस्कळीत व नामोहरम होऊन आपल्यास शरण येतील ही त्याची कल्पना चुकीची ठरली. संभाजीच्या क्रूर वधाची वार्ता रायगडावर राणी येसूबाई व मराठा-मंत्रि-मंडळ यांस समजतांच त्यांनीं दुःख गिळून मोठ्या धीरानें बादशहाच्या प्रतिकाराची जंगी तयारी चालविली. या वेळीं रायगडावर राणी येसूबाई, युवराज शिवाजी ( शाहू ) राजाराम व इतर सर्व राजघराण्यांतील मंडळी होती. येसूबाईनें पतिनिधनाचें भयंकर दुःख गिळून पुढील संकटपरंपरेला तोंड देण्याचा निश्चय केला. धन्य त्या देवी येसूबाईची कीं जिच्या अलौकिक धीरशालित्वामुळें,

स्वार्थत्यागामुळें व हुशारीमुळें मराठी सैन्याला औरंगजेबास खडे चारण्यास अवकाश मिळाला.

जनार्दनपंत हणमंते, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, खंडोबल्लाळ, महादजी नाईक, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे इ. प्रमुख मंडळी रायगडावर जमा झाली. या संकटांतून मराठी राज्य सहीसलामत कसें बचावावयाचें याचा विचार सुरु झाला. येसूबाईनें उदार मनानें माझ्या मुलाचें वय लहान, त्याला गादीवर बसवून राज्य हांकणें धोक्याचें. राजाराम महाराज माझे दीर आहेत; त्यांनीं गादीवर बसणें उचित. त्यांनीं राज्यकारभार करून मराठी राज्य रक्षावें. सर्व राज–मंडळ एके ठिकाणीं राहिल्यास औरंगजेब आपली शक्ति एकवटून आपणास पाडाव करील. म्हणून राजाराम महाराजांनीं आपला कबिला घेऊन विशाळगड पन्हाळ्याकडे जावें. मी बालराजांना घेऊन रायगडावर राहतें. रायगड आम्हीं अनेक वर्षे भांडवूं" हा पोक्त, निस्वार्थ व मुत्सद्दी सल्ला सर्वांस आवडला. राजाराम महाराजही उदार मनाचा. त्याला राणी व बालराजे यांना रायगडावर सोडून जाणें जिवावर आलें. शेवटीं राजारामानें "राज्याचे अधिपति शिवाजीराजे पूर्वीचे तेच हे ऐसें लक्ष ठेऊन आम्ही कारभारी. आमचे आज्ञेंत राहून, पूर्वींहून विशेष पराक्रम करून, औरंगजेबास जिंकून राज्य रक्षावें येविशीं सर्वांची शपता प्रमाणें व्हावीं."

३. सर्वच उदार थोर मनाचीं माणसें. राज्याचा लोभ हा काय पदार्थ ? शिव–शाहीच्या शिकवणीचीं अमृत बचनेंच त्यांच्या तोंडून बाहेर पडावयाचीं. ही रायगडावरील ऐक्य परिषद, ह्या अभिजात ऐक्याच्या परिषदेला साऱ्या मराठ्यांच्या इतिहासांतच काय पण वर्तमान काळांतही तोड सांपडावयाची नाहीं. संभाजीच्या वधाला अत्यंतिक सूड व स्वराज्य संरक्षणाची जबर महत्त्वाकांक्षा या दोन प्रेरणांनीं पुढील १८ वर्षांचा इतिहास उज्ज्वल बनला ! ह्या पुढील १८ वर्षांचा इतिहास म्हणजे शिवशाहीच्या शिकवणींचें सार, मराठ्यांच्या इतिहासांतील सोन्याच्या पत्र्यावर विजेच्या चमकीनें लिहिलेलें पान, महाराष्ट्र धर्मांच्या तेजस्वितेचा प्रकाश. मराठ्यांच्या एकीच्या

सामर्थ्याचा प्रचंड प्रताप. अरे पण हें काय ! आपणांस त्या काळच्या इतिहासाबद्दल लिहावयाचें नाहीं. रायगडच्या वेढ्याचाच विचार करावयाचाच आहे.

वर सांगितलेल्या ऐक्य परिषदेनंतर राजाराम शके १६११ च्या प्रारंभाला रायगडचा उत्तम बंदोबस्त करून, डोंगरीं किल्याच्या आश्रयानें बादशहाशीं झुंजत राहण्यासाठीं निघून गेला. रायगडावर शिबंदी, धान्य सामुग्री दारुगोळा यांची भरगच्च तयारी ठेवल्यामुळें रायगडच्या पाडावाची फारशी धास्ती नव्हती. संभाजी जिवंत असतां राजगड किल्ला मोंगलांनी घेतला होता, अर्थात लवकरच रायगडला शह बसणार या भावनेनें त्या किल्ल्याची खंबिरी करण्यांची अगोदर पासूनच सुरवात असली पाहिजे.

४. शके १६११ चा * पावसाळा संपल्यावर आश्विनाच्या महिन्यांत इतिकदखान (भावी झुलफिकारखान) कोंकणांत रायगडच्या कोंकणच्या स्वारीसाठीं आला. मराठ्यांचा हाड वैरी जंजिऱ्याचा सिद्दी, त्यास मदत करण्यास सिद्ध होताच. राणी आणि युवराज रायगडावर आहेत ही बातमी औरंगजेबास लागतांच त्यानें मराठ्यांचे कलिजे कापून काढणारा आपला पोलादी पंजा जास्त बळकट होण्यासाठीं झुलफिकारखानास बेहद्द मदत दिली. औरंगजेबानें आपलें कपट विद्येचें इलीम देखील त्यास बरोबर पढवून ठेवलें होतें. झुलफिकारखानानेंही नव्या उमेदीनें किल्यास वेढा दिला. मुंगींचा रिघाव न होय ऐसी बंदिस्ती केली. परंतु याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. किल्ला पडण्याचें एकही चिन्ह दिसेना. वेढा घालून १० महिने होत आले. पुढें पावसाळा आला. पावसाळ्यांत कोंकणप्रांतीं छावणी देणें म्हणजे जिवावरचें संकट. रायगड युद्ध करून, छापे घालून पडेना. बरें मराठ्यांचे सरदार वेढा घालणाऱ्या मोंगल सैन्यावर चोर–हल्ले चढवीत ते निराळेच. रायगडच्या वेढ्यांस ढिलाई यावी म्हणून संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांचे जोराचे प्रयत्न चालू होते. संताजी तुळापुरीं बादश-

* सह्याद्रीच्या पश्चिम उतरणीवरील पावसाळ्याला मोंगली सैन्य भीत असे. कारण तेथें पावसाळ्यांत पक्षांच्या पंखावर देखील शेवाळ धरते, इतका पर्जन्य पडतो !

हाच्या छावणीवर छापा घालून त्याच्या डेऱ्याचे सोन्याचे कळस कापून जो निसटला तो सिंहगडच्या झाडींत येऊन दडला. तेथून घाटानें खालीं उतरून रायगडला वेढा देऊन बसलेल्या झुलफिकारखानावर त्यानें हल्ला चढविला. त्याचे पांच हत्ती काबीज करून मोठ्या त्वरेनें पन्हाळ्यावर राजाराम महाराजांकडे गेला. आंतून रायगडचा मारा व बाहेरून हे भुरटे हल्ले यानीं मोंगल अगदीं टेकीस आले. परंतु मराठ्यांच्या उज्ज्वल ऐक्याला गालबोट लावण्यासाठींच कीं काय, सूर्याजी पिसाळ हा सरदार मोंगलास वश झाला. याला वाईच्या देशमुखीचें वतन पाहिजे होतें. खानाला हा सुगावा लागतांच त्यानें वाइचीं देशमुखीच काय पण पाहिजे तें देतो अशी लांच दाखवून त्यास * वश करून घेतलें. सूर्याजी पिसाळानें निमकहरामपणा करून किल्याचे दरवाजे मोंगलांस उघडून दिले. अशा रीतीनें विश्वासघाताच्या सुरुंगानें रायगडचा अभेद्य बंदोबस्त शके × १६०२ त ढांसळून किल्ला शत्रूच्या स्वाधीन झाला.

रायगड काबीज होतांच झुलफिकारखानानें राणी येसूबाई व बालराजा शिवाजी यांस ताब्यांत घेतलें. स्वराज्य–संस्थापकाच्या सुनेला व धर्मसिंह संभाजीच्या पत्नीला खुद्द राजधानींत रायगडावर शत्रूच्या स्वाधीन होण्यांत काय क्लेश झाले असतील? पण त्या प्रसंगांतही तिनें आपला धोरणी मुत्सद्दी-

---

* अमात्यांच्या आज्ञापत्रांतील उतारा: “परचक्र आलें म्हणजे वतनाच्या आशेनें आगोदर सल्लख करतात. स्वतां भेटतात. तिकडील भेद इकडे इकडील भेद तिकडे करून राज्यांत शत्रूचा प्रवेश करितात. मग तेच राज्याचे आपायभूत होऊन दुःसाध्य होऊन जातात.”

× चैत्र शुद्ध १५ अवरंगजेब जुलपुकार खानास पाठवून रायेगडास वेढा घातला. चैत्र वद्य १० शुक्रवारी राजाराम पळोन प्रतापगडास गेले १ अस्वीन वद्य ८ गुरुवारी राजाराम पर्नालियाहून स्वार होऊन कार्तिक वद्य ११ वेसुराज आले तेथून चंदीस आले १ कार्तिक मासी रायगडा सला करून मार्गसीर्ष सुध(२) रविवारीं रायगड मोंगलास दिला. ( जेधे शकावली पान १९ शके १६११ शुक्र ) (३) नोव्हेंबर १६८९ ला मोगलांचे हवालीं झाला. ( बेंद्रे केसरी ४ मे, १९२६ )

पणा सोडला नाहीं. तिनें खानाकडून कुराणावर हात ठेवून तुमच्या जिवास अपाय करणार नाहीं अशी शपथ घेवविली. मोंगली सैन्यानें रायगड यथास्थितपणें + लुटला. स्वराज्याचें भांडार रितें केलें शिवाजीचें सिंहासन फोडून आपली राक्षसी महत्त्वाकांक्षा तृप्त केली ! त्यांना हें काय माहीत होतें कीं सोन्यामोत्यानें मढविलेलें दृश्य सिंहासन आपण फोडलें पण महाराष्ट्रजनतेच्या अंतःकरणांत अधिष्ठित झालेलें स्वराज्याचें अदृश्य दैवी सिंहासन अखंड आहे, आपण एक राजधानीचा रायगड काबीज केला पण प्रत्येक मराठ्याचें अंतःकरण हा प्रति रायगड आहे ! असो.

रायगडचा वेढा अशा रीतीनें पूर्ण होऊन झुलफिकारखान रायगडावरील अलौकिक (?) लूट घेऊन खाविंद चरणाशीं गेला ! रायगडावर संभाजीचे आप्त सोयरे वगैरे पुष्कळ राजघराण्यांतील मंडळी होती. ती सर्व पकडली गेली. सूर्याजीस बादशहानें तूं मुसलमान होशील तर वाईची *देशमुखी देतो ही अट घातली. देशद्रोह करणाऱ्या सैतानाला कसला आला आहे धर्माभिमान. स्वार्थासाठीं लालचावलेल्या त्या कुत्र्यानें शेवटीं मुसलमानी धर्म स्वीकारला !

+ रायगडच्या आसपासचा मुलुख मोगलांच्या हल्यामुळें बेचीराख जाहला साल गुदस्त रायगड कबजा जाला मुलुखांत मोगलाई अमल चालू जाहाली श्रीकृपेनें आपल्या राज्याचा मामला थाटत आहे.

( रा. खं. १६ पा. ४३ मि|| आश्विन शु|| ११ शके १६१२ )

* सनदा तयार व्हाव्या तो जुलपिकारखान रायगडाची मसलत सुरु करून लष्करास आले. त्याजपाशीं सूर्याजी पिसाळ बिराजर मोकदमी मौजे वोझर्ड हा गांव पूर्वी मोकदमी चालवीत असतां रायगडाहून वझाईची वरात आली. वसूल घ्यावयास अवसर नाहीं. याजकरितां गांव सोडून पलोन गेला. तो खान मशारनिल्हेजवळी राहिला. तेथें राजगडचे मसलतेमुळें मनसबा करून मावळीयाची सरदारी केली. गडास मोर्चे लाविले व दरामतींत पडोन खानास गड हस्तगत करून दिल्हा.

( वाडकृत सनदा पत्रें पृ. १९६ )

रायगडावरील ह्या दुःख पर्यवसायी प्रकरणाचा मराठ्यांचीं दोन नररत्नें शत्रूनें जिंकून शेवट केला ! झालें ! रायगडचें राजधानित्व ह्या वेळेपासून नष्ट झालें. स्वातंत्र्य लक्ष्मीचीं पावलें येसूबाईचा पावलांबरोबर रायगडची पायरी उतरूं लागलीं. शिव–सिंव्हासनाचे झालेले तुकडे या पुढें रायगडावर पुन्हां कधींच जुळले गेले नाहींत ! रायगडचें राजैश्वर्य बालराजाबरोबरच राय-गडला सोडून गेले. यापुढें रायगड हा एक सामान्य किल्ला होऊन बसला बा निर्विकार रायगडा ! ह्या विरोधी स्थित्यंतरानें तुझ्या अंतःकरणांत कोणते विचार उद्भवले असतील ?

६. राजाराम जिंजीस गेल्यावर इकडे मराठी सरदारांनीं रायगड घेण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यासंबंधींचें राजारामाच्या वेळचें आज्ञापत्र खालीं दिलें आहे. रामचंद्रपंत आमात्य विशाळगडीं राहून मोंगलास त्रास देण्याचा उपक्रम करीत होता. स्वराज्यांतील गेलेला प्रत्येक किल्ला मोंगलांच्या पाठो-पाठ मराठ्यांनीं घेण्याचा जणूंकाय विडाच उचलिला होता.

" स्वस्तीश्री राज्याभिषेक शक १८ अंगिरानाम संवतसरे ज्येष्ट शु॥ ७ गुरुवार क्षत्रीय कुलावतंस राजाराम छत्रपती याणी . जाऊळकर व दरेकर व मावळे लोक व कासुर्डे व गोळे व समस्त लोकांनीं पादाती यासी आज्ञा केली ऐसीजे......सांप्रत रायगड हस्तगत करून घेणें हें कार्य बहुतच थोर आहे. येविमी रामचंद्रपंत पंडित अमात्य याणी तुम्हांस सांगितले आहे. त्यावरून तुम्ही गड हस्तगत करून घ्यावयाच्या प्रयत्नांत आहां सांप्रत स्वामीनीं राज-गडास आबाजी सोनदेव यासी पाठविला आहे रायगड हस्तगत करून घ्यावयाची आज्ञा त्यास केली आहे हे जाऊन राजकारण जें करावयाचे तसे करतील तरी तुम्ही कुल लोकल अनुकुल होऊन रायगडचा हारी करणें सबत्ती करून ते स्थान हस्तगत करून फत्तेचे वर्तमान स्वामीस लिहिणें म्हणजे स्वामी तुमचे विशेष उर्जित करतील.

( रा. खं. ८ पृ. ४५ राजारामाचें आज्ञापत्र )

# प्रकरण ६ वें.

## पेशवाईतील रायगड.



अस्तमानीं सूर्य-विकासीं कमळें मिटल्यावर आंत अडकून पडलेल्या भुंग्यास सूर्योदयापर्यंत बाहेर पडतां येत नाहीं. एरव्हीं भुंगा वाटेल त्या कठीण लाकडास आपल्या दातांनीं छिद्र पाडतो. पण अत्यंत नाजूक अशा कमलदलास छिद्र पाडून बाहेर येण्यास तो असमर्थ असतो. हा कविसृष्टींतील एक चमत्कार आहे. कांहीं रोगांचें असें आहे कीं त्यांनीं एकदां शरिरांत ठाणें दिलें कीं ते निर्मूल म्हणून कधीं व्हावयाचेच नाहींत. हीं दोन उपमानें जंजिऱ्याच्या सिद्दीचें मराठी राज्यास बोचणारें शल्य व त्याला निर्मूलन करण्याचे मराठी राजांचे प्रयत्न, यांचा इतिहास वांचून कोणालाही सुचतील. दिल्लीच्या तक्तावर कोणास बसवावें व कोणास उतरावें हे डाव ज्यांना खेळतां येतात, तेच पेशवे शिवशेजारीं जंजिरेकर सिद्दीस नामशेष करण्यास असमर्थ व्हावे ? मराठेशाहीस लागलेला रोग इतक्या बुद्धिवान् धनमंत्र्यास कायमचें उठवितां येऊं नये ?

पेशवाईतील रायगडचा इतिहास सांगतांना जंजिऱ्याच्या राजकारणाचा पुन्हां एकदां वाचकांस परिचय करून द्यावा लागणार आहे. राजाराम वारल्यावर औरंगजेबास विशेष हुरूप चढून तो मराठ्यांच्या किल्ल्यांवर हल्ले करण्यासाठीं जातीनिशीं जाऊं लागला. औरंगजेब वाकिनखेड्याकडे गेला. तेव्हां मराठ्यांनीं मोंगलांच्या ताब्यांत गेलेले किल्ले घेण्याचा सपाटा चालविला. परशुराम त्रिंबकनें वसंतगड व सातारा हे किल्ले घेतले. संकराजी नारायणनें सिंहगड, रायगड व रोहिडा हे किल्ले काबीज केले. मोठ्या दिमा-

खानें मिळविलेली मराठ्यांची राजधानी–रायगड–त्यांच्या गेल्यांचें वृत ऐकून बादशहास परम दुःख झालें. अशा स्थितींत तो शके १६२८ च्या माघांत मरण पावला. औरंगजेबांच्या मरणानें मराठेशाहीचा एक प्राणघातक शत्रू नष्ट झाला. औरंगजेबाच्या मुलांत गादीबद्दल तंटे पडल्यामुळें मराठी राज्याकडे लक्ष देण्यास त्यांस फुरसत मिळाली नाहीं.

दक्षिणेंतील हें मराठ्यांचें मोहोळ कसें तरी स्वस्थ बसावें म्हणून झुल-फिकार खानाच्या सल्यावरून अजीमशहानें शाहूस कैदेंतून मुक्त केलें. त्या वेळीं अजीमशहा व शाहू यांत तह झाला, त्यांत तुमच्या आजोबानें विजा-पुरकरांपासून जो मुलुख जिंकून घेतला तो व भिमा व गोदावरी या नद्या-मधील कांही जहागिरी म्हणून तुम्हांस देतों. तुम्ही दक्षिणेंत जाऊन आपल्या मुलुखाचा बंदोबस्त करावा." या तहान्वयें कोंकणप्रांतीचे रायगड, राजगड इ. इ. किल्ले मराठ्यांच्या ताब्यांत असावयास मोंगलांची हरकत नव्हती. व हे किल्ले या वेळीं मराठ्यांच्या ताब्यांत होतेही. शके १६२९ मधील [ राज. ले. २८८ ] एक आज्ञापत्र उपलब्ध आहे.

"स्वस्तीश्री राज्याभिषेक शक ३४ सर्वजीत संवत्सरे मार्गसिर्ष शु॥ ७ सप्तमी गुरुवार क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिव छत्रपती याणी राजश्री शामजी हरी देशाधिकारी व कारकून वर्तमान भावी सुभा प्रांत मावल ता। राजगड यासी आज्ञा केली ऐसिजे प्रतापजी सिलीमकर याचे बाप मंताजी सिलीमकर हे किल्ले राजगडीं नामजाद होते त्यांस ताम्राचा वेढा " राज-गडास " पडला. त्याचे लेक प्रतापजी हाली स्वामीची सेवा करावी ऐसी उमेद धरून सेवा करीत आहे. परंतु मुला माणसाचे चाले ऐसा एक गांव ईनाम करून दिला पाहिजे."

पुढें शाहू दक्षिणेंत आला. ताराबाईस त्याचें येणें न आवडल्यामुळें तिनें शाहुवर फौज पाठविली. राज्यासाठीं शाहूलाही स्वकीयांबरोबर युद्ध करावें लागलें. शके १६२९ माघ शुद्धांत शाहूनें सातारा येथें एकदांचा राज्याभिषेक करून घेतला. राजाराम महाराजांनीं शके १६२०.मध्यें सातारा ही मराठी राज्याची दुसरी राजधानी केली.

३. इतउत्तर मराठ्यांस घाट माथ्यावर कोणी प्रबळ शत्रू उरला नाहीं. बहामनी राज्याच्या सर्व शाखा औरंगजेबानें नष्ट करून टाकिल्या. औरंगजेबही मेल्यामुळें मोंगली शहाजादे दिल्लीच्या तक्तासाठीं आपसांत कलह करूं लागले. त्यांचें लक्ष दक्षिणेच्या राजकारणाकडे नव्हते. सारांश साऱ्या दख्खनचे रान आतां मराठ्यांस मोकळें झालें. मराठे या वेळीं एकोप्यानें वागते तर स्वराज्याचा केवढातरी विस्तार त्यांना करितां आला असता. पण ताराबाई शाहूचा नवा कली मराठी राज्यांत थैमान घालूं लागला. राजारामानें व त्याच्या सहकारी मुत्सद्यांनीं घाट माथ्यावरील मुलखावर आक्रमण करतां यावें म्हणून सोइस्कर अशी सातारा राजधानी केली. हें ठिकाण कोंकणास फार लांब नाहीं. रायगड राजधानी वरघाटी मुलखावर ताबा ठेवण्यास गैरसोईची; म्हणून सातारा हें केंद्र—राजधानी—करण्यांत आलें. संभाजीनंतर जंजिरेकरांकडे मराठी राजकर्त्यांचें पुर्ण दुर्लक्ष झालें. मराठ्यांच्या फौजेच्या ढाली आतां उत्तरेकडे व दक्षिणेकडे वळल्या. राजाराम जिंजीहून महाराष्ट्रांत आल्यावर मराठी सत्तेचें केंद्र विशाळगड, रांगणा, कोल्हापूर, सातारा या भागीं अधिष्ठित झालें. कोंकण प्रांतीच्या 'रायगडावर' राजधानी करण्याची त्या वेळच्या राजकारणांत जरूरी भासली नाहीं. परंतु रायगड पासून दंडाराजपुरी पर्यंतचा प्रदेश व कुलाबा किल्ल्यापासून सिंधुदुर्गापर्यंतची कोंकणपट्टी ताब्यांत ठेवण्याचे पेशवाईतही जोराचें प्रयत्न झाले. तो इतिहास आपण ह्या प्रकरणीं पाहूं.

शाहू गादीवर बसला तेव्हां त्याची सत्ता सातारा व त्याच्या सभोंवतीचा फारच थोड्या मुलखावर प्रस्थापित झाली होती. शके १६३१ मध्यें शाहूनें रांगण्यावर स्वारी करतांच ताराबाई मालवणांत जाऊन बसली. त्या स्वारीहून परत येतांना सेनापती धनाजी जाधव मरण पावला. सेनापतीच्या मरणानें शाहूचा पक्ष अगदींच हतप्रभ झाला. ताराबाई व शाहू यांच्या कलागतीमुळें सिद्दी याकुतखान

यास वाव सांपडून त्यानें कोंकणांतील * मराठी राज्यावर चाल केली. दंडा-राजपुरी, तळगड, घोसाळगड, बिरवाडी, रायगड इत्यादि जंजिरा-किल्ल्याच्या लगतचीं ठाणीं त्यानें काबीज केलीं. मराठ्यांचा आरमारी सरदार कान्होजी आंग्रे याला हीं ठिकाणें ताब्यांत राखून सिद्दीस दाक्षिणेच्या बाजूनें पायबंद घालणें शक्य नव्हतें. प्रथम प्रथम तो शाहूच्या विरुद्ध ताराबाईच्या पक्षांत समाविष्ट झालेला होता. राज्याच्या मालकांतच कौरवी–पांडवी असल्यामुळें सरदारांतही दुही उत्पन्न झाली. मग सहजच कोणी कौरवाकडचे व कोणी पांडवाकडचे झाले. यापुढें मराठी राज्य दुहीच्या तडाक्यांतून सर्वस्वीं कधींच मुक्त झालें नाहीं. शाहूचे नवे कर्तबगार पेशवे बाळाजी विश्वनाथ, यांच्या साह्यानें शाहूचे मराठी राज्यावरील प्रभुत्व सर्वमान्य होऊन सर्वत्र स्थिरता आली. तेव्हां पुन्हां हें जंजिरेकराचें राजकारण व रायगडचा ताबा याबद्दल हालचाली सुरु झाल्या.

४. या प्रकरणाचा इतिहास फार मोठा आहे. कान्होजी आंग्रे हा सिद्दीशीं बरेच दिवस युद्ध करीत होता. कान्होजी आंग्रे शके १६५१ मध्यें मरण पावला. तेव्हां आंग्र्याच्या घराण्यांत गृहकलह माजून राहिला. ब्रह्मेंद्र स्वामी कर्नाटकांत भिक्षाटनार्थ हिंडत असतां सावनूरच्या नबाबाकडून सिद्दीस भेटीदाखल मिळालेला हत्ती जंजिऱ्यास नेण्याची कामगिरी स्वामींनीं आपणांवर घेतली. या हत्तीच्या पायानें सिद्दी व आंग्रे यांच्यांत कलह उत्पन्न केला. ब्रह्मेंद्रस्वामींस सिद्दीचा व आंग्र्याचा रुसवा सोसावा लागला. आंग्र्यानें स्वामींची समजूत केली. परंतु सिद्दीबद्दल मात्र स्वामींस फार राग

* शके १६२७ चे सालीं औरंगजेब बादशाहा भागानगरीं औरंगाबादेस येऊन मृत्यु पावले. त्याचे शाहाबाज बादशहाजादे होते. त्यास दिल्हीस राजकारण जलदीच पडल्यामुळें फौजासुद्धां दिल्लीस चालले. ते चमेली नदीपर्यंत गले. इकडे राजाराम यांची स्त्री व त्याचे पुत्र शिवाजी राजे व सर्व कारभारी अष्ट प्रधान हे एकत्र होऊन देशीचें राज्य सोडविलें. कोंकण आंग्रे यांनीं सोडविलें. विजयदुर्ग संस्थान केलें व सुवर्णदुर्ग, रत्नागिरी वगैरे किल्ले घेतले. रायगड किल्ला आणीक जंजिरा वगैरे जुजबी ठिकाणें हपसी यांजकडे व कांहीं जुजबी ठिकाणें कर्नाळा, राजकोट वगैरे मोंगलांकडे व रेवदंडा, वसई फिरंगी याजकडे असीं राहिलीं.

( वाडकृत दक्षिणेंतील सरदारांच्या कै० यादी. पृ. ४. )

आला. शेवटीं स्वामी धावडशीस जाऊन, त्यांनीं शाहूस व आपले शिष्य मराठीराज्याचे पेशवे बाजिराव यांस भर देऊन सिद्दीच्या सूडाचा वार भरला. त्यांतच कान्होजीच्या मृत्यूनंतर सिद्दीनें मराठी मुलखांत मांडलेल्या पुंडाव्याची भर पडली. शाहूनें × यशवंतराव महादेव पोतनीस या कोंकणप्रातांच्या माहितगार सरदारास जंजिरेकरावर मात करण्यास कोंकणांत रवाना केलें. [ शके १६५५ ]

याच सुमारास जंजिऱ्याचा पराक्रमी सरदार सिद्दी रसूल मरण पावला. तेव्हां गादीबद्दल तंटे उपस्थित झाले. शेख याकूब नांवाचा हबशाचा एक पराक्रमी सरदार असून तो मूळचा कोळी होता. तोच शेखोजी नावानें असून, मोठा +वजनदार होता. त्याला वश करून यशवंत महादेवानें आपलें कारस्थान रचिलें. त्याला "मराठी आरमाराचें आधिपत्य, हबशी मुलखाची सुभेदारी, पेणेपासून चिपळून पावेतों कोंकण प्रांताचा सरगोंडपणाचा हक्क व इतर इनाम गावें व किल्ले" देण्याचें कबूल केलें. व त्याच्या भावास 'रायगड' किल्ल्याची किल्लेदारी, व फौजेच्या खर्चास एक लक्ष रुपये देण्याचें

× आमचे वडील बाजी मुरार हे कै. शिवाजी महाराज यांजपाशीं मावळे लोकांचे जमावाची सरदारी करून होते. तेथें सेवा चाकरी बहुत केली. त्यांचे पुत्र महादाजी हे कै० संभाजी महाराज याजपाशीं सदरहू जमावाची सरदारी करोन सेवाचाकरी करीत होते. तेव्हां महाराजांनी पोतनीसीचा दस्त करून दिल्हा. महादाजी बाजी यांचे पुत्र यशवंतराव महादेव हे आमचे पणजे, कै. शाहू महाराज यांजपाशीं सरदारी व पोतनिशीचें काम करीत असतां महाराजांनीं दुसरा खासनिशीचा दरक करून दिल्हा." [द. सरदारांच्या कै० पृ. १०५ वाडकृत]
प्रतिनिधीनें रायगड घेतला. रायगड तो यशवंत महादेव पोतनीस याचे हवालीं केला. [ राजवाडे खंड. २] ह्या पोतनीस घराण्याचे वंशज अद्याप महाड येथें राहतात. महाडच्या विरेश्वराचा देवालयाचे तेच वतनी हक्कदार आहेत.

+ "श्रीयासह चि. रा. रा. दादास अंबाजी त्रिंबक आशिर्वाद उ० आम्हीं ता० ६ मोहरम मु॥ पाचाडमाची किल्ले रायगड सुखरुप असो वि॥ आम्ही मजल दरमजल येथे आलों. तों राजपुरीहून राजश्री येसाजी गायेकवाड आले. त्याणीं वर्तमान सांगितले कीं तेथील सर्व कामकाजे शेखोजीच्या स्वाधीन...[ शके १६५५ अधिक आषाढ शु॥ ७ ]

ठरविलें. रसूलचा वडील मुलगा अबदुल्ला हाही मराठ्यांस मिळाला. मराठ्यांची मदत आल्यावर इतरभावांची वाट लावूं; अशा समजुतीनें अबदुल्ला जंजिरा किल्ल्यांत राहिला. सिद्दी रहमान हा रसूलचा मुर्दा दफन करण्यासाठीं राजपुरीस आला. तेव्हां त्याला बाहेर ठेवून त्याच्या भावांनीं किल्ल्याचे दरवाजे लावून घेतले. म्हणून रहमान हाही मराठ्यांस मिळाला. यशवंत महादेव यानें या दुहीचा फायदा घेण्यासाठीं ताबडतोब जंजिऱ्यावर सैन्य रवाना करावें अशीं पत्रें शाहूस लिहिलीं. शाहूनें बाजीरावाला "आधीं पत्र न वाचणें, घोड्यावर बसणें, मग पत्र वाचणें," असे तांतडीचे हुकूम रवाना करून साताऱ्यास बोलाविलें. बाजीराव येतांच त्यास सर्व परिस्थिती समजाऊन देऊन ताबडतोब कोंकणांत रवाना केलें. ब्रह्मेंद्र स्वामीनींहीं बाजिरावास कोंकणच्या स्वारीसाठीं मुद्दाम पाचारिलें होतें.

५. बाजिराव शके १६५५ च्या वैशाखांत फत्तेसिंग भोंसल्यासह कोंकणांत उतरला [रा. खंड १६ वा. पा. १६]. त्या वेळीं पाचाडचा कोट राजेश्री सचीवपंत याजकडे आला. बाजिराव एकदम तळगड व घोसाळगड घेऊन दंडाराजपुरीवर चालून गेला. त्याच दिवशीं जंजिरा किल्ल्यांत अबदुल्लाचा खून झाला. राजपुरीस बाजिराव व सिद्दी *रहिमान याचें युद्ध झालें. युद्धांत रहिमानचा पराभव झाल्यामुळें त्यानें बाजिरावाशीं सलोख्याची इच्छा दर्शविली. मराठी सरदारांनीं अंतोणें, नागोठणें, अस्त्रधारा, अवचितगड, बिरवाडी, निजामपूर, हीं स्थळें सिद्दी पासून घेतली. परंतु अंजनवेल, गोवळकोट, विजय-

* पुरवणी रा. अंबाजीपंत स्वामी गोसावी विनंती उपरी खानजादा बाहेर आहे त्याचा मतलब जे राजश्री थोर आहेत हा एक अमिराचा लेक आहे आपण आपली स्थापना आपल्या जागेवरी केलियानें दिगंत कीर्ति होईल. तुमचा स्थापित होईन पुढें कितीका कामकाजास येईन आणि आपण येथे काइम जात्यावरी चहुं महिन्यांनीं रायगड तुम्हांस देईन ऐसे बोलतो. जंजिरेयात हबसी सिद्दी संबूळ व सिद्दी अंबर आहे. त्यांचा मतलब रायेगड न द्यावा किल्ले आरमार घेतले ते द्यावे तेव्हां खास ( स्वारी ) जंजिरीयांत घेऊन ऐसे ते म्हणतात......जंजिरियांतील हबसी यांसी रायेगडचा मजकूर करावा तरी ते मान्य करून यास आंत घेत नाहींत व याची स्थापना करावी याचा अमला फैला जालियावर मग हा रायेगड देईन म्हणतो." [रा. ले. १०६]

दुर्ग, जंजिरा, रायगड व उंदेरी हीं मजबूत ठिकाणें सिद्दीच्या ताब्यांत होतीं. बंकाजी नाईक महाडिक यानें बाणकोट व मंडणगड हे किल्ले हबशापासून घेतले. मंडणगडावर ता. २३ मे रोजीं मराठ्यांचा भगवा झेंडा फडकूं लागला. ब्रह्मेंद्र स्वामींच्या टोंचणीमुळें शाहूस जंजिऱ्याच्या कबजासाठीं इरेसच पडावें लागलें. त्यानें श्रीनिवासराव प्रतिनिधी यास ता. २७ मेच्या सुमारास पुष्कळ फौज देऊन कोंकणांत रवाना केलें. प्रतिनिधी व बाजिराव यांचें वैमनस्य असल्यामुळें, प्रतिनिधी महाडास आले; हें ऐकून बाजिरावास वैषम्य वाटलें. प्रतिनिधीनें अंजणवेलीस जाऊन तिकडे मोहीम करावी म्हणजे सिद्दीस दक्षिणेकडून पायबंद बसेल व रायगड देणेस तो तयार होईल असें बाजिरावाचें मत होतें. त्या अर्थाचें पुढील पत्र पहा.

"प्रतिनिधी रवाना केले ते महाडास येऊन छावणी करणार म्हणून लिहिलें. तरी महाडी छावणीचें प्रयोजन काये. तेथें काही उपयोग नाहीं. आजणवेळीस ( अंजनवेल ) जाऊन मोर्चे देऊन तिला बंद केलियानें याचे हतपाये बंद होतील हबशी शत्रू काही सामान्य नव्हे.........त्यास प्रतिनिधी अंजणवेलीस जातील तरी उत्तम आहे. उंदेरीस सरखेल खटपट करतील ते दोनी स्थळे हातास आलियावर याची हिमत कम होईल व आसाही तुटेल. रायेगड यावासा आहे तो न आला तरी तेथेंही दीड हजार दोन हजार पर्यंत माणूस ठेऊन बंद करणें लागेल..."

[ पुरंदरे द. पा. ७१ ज्येष्ठ वा॥. ९ शके १६५५ ]

६. यशवंत महादेव पोतनिसानें रायगडचा भेट वगैरे काढून तो किल्ला घेण्याचें सर्व कारस्थान शिजवून ठेविलें होतें. प्रतिनिधी येतांच त्यांनीं [ ८ जून सन १७३३ ] रायगड किल्ला घेतला. अशा रीतीनें मराठ्यांच्या ताब्यांत रायगड आला. रायगडच्या मोहिमेंत * मावळ खोऱ्यांतील झुंजा-

* राजपुरी व रायगड येथील स्वारीवर गेलेले मावळे सरदार.

१. प्रतापजी बिन संताजी हैबतराऊ सिलिमकर देशमूख.

१. शंकरराऊ बिन संताजी हैबतराऊ देशमूख.

१. पदाजी बिन विठोजी हैबतराऊ देशमूख.

१. सूर्याजी बिन म्हकोजी राऊ सिलिबकर देशमूख.

रराव, मरळ वगैरे देशमुखांनीं चांगलीच मर्दुमुकी गाजविली. त्यास या कामगिरीबद्दल इनामें मिळालीं. मावळ्यांनीं रायगड घेण्यास मदत केली त्याबद्दल त्यांस अभिनंदनपर पाठविलेलीं पत्रें भा. इ. सं. मं. त्रै. पू. ७ पृ, १५५ ( शके १६५५ भाद्रपद शु॥ ६ ) मध्यें दिलीं आहेत. केसरी ता. २८–३–१९०५ मध्यें रा. रा. देशपांडे यांनीं असें लिहिलें आहे " दुसरे दिवशीं फौजा घाट उतरून मजल दरमजल सिखऱ्यास आले. वैशास व॥ ३० रोजीं खाकरी हस्तगत केली.त्या उपरी राजमाची व राजपुरी हस्तगत झाली. त्या उपरी पुढे रायगड सहवर्तमान कोंकणप्रांतीचा देशदुर्ग हस्तगत झाली. ते समयीं मावळच्या कुल सरदारांनीं व जमेदारांनीं व गडकिल्याचे लोकांनीं बोली घातली कीं तक्ताचा जागा रायगड सुटला या उपरी मावळ प्रांतीची मोंगलाई चाकर लोकांस खासगत शेतावर ज्याचे त्यास बांधून द्यावी. ह्याप्रमाणें मनास आणून हे सनद सादर केली असे."

प्रतिनिधींनीं रायगड घेतला तेव्हां रा. शामराव रुद्र बेंदर यांच्या ताब्यांत दिला. पुढें पुन्हां हबशी यानें रायगडास कार्तिकांत वेढा दिला. त्यावेळीं बेंदर यांनीं किल्ला नऊ महिने झुंजविला. हबसी यांचे मोर्चे स्वतः खाली येऊन मारले. या त्याच्या मर्दगिरीबद्दल खुदलपूर गांव इनाम दिलें. प्रतिनिधींनीं शामराव रुद्र बेंदर यांस दिलेली सनद [ भा. इ. सं. त्रै. पु. ७. पृ. ५७ ] मध्यें आहे.

७. सारांश तक्ताची जागा रायगड मराठ्यांच्या ताब्यात आल्यावर सर्वांस बरें वाटलें. तेव्हांपासून रायगड किल्ला पेशवाईचे अखेरीस पर्यंत मराठ्यांच्याच ताब्यांत होता. ही स्वारी बाजिराव व प्रतिनिधी यांच्या दुहीमुळें व्हावी तितकी यशस्वी झाली नाहीं. " कोंकणांतून सिद्दीचें समूळ उच्चाटन करावें असा शाहूचा व ब्रह्मेंद्रस्वामींचा हेतु होता." पण तो साधला नाहीं अखेर बाजिराव

१. पुनाजी बिन दत्ताजी नाईक देशमूख.
१. रावजी राऊ बिन त्रिंबकराऊ सिलिमकर देशमूख.
राजवाडे खंड १७, ल, ३९ पृ. ४९ शके. १६५६

व सिद्दी यांच्यांत अलिबाग नजीक नवदरें येथें +तह झाला. "सीद्दी अब्दुल रहमान यास जंजिऱ्यांत तक्तावर बसवून किल्ले घेतले. त्या पैकीं रायगड व महाड हुजुर महाराजांनीं ठेऊन वरकड किल्ल्यांचा बंदोबस्त बाजिराव साहेब यांनीं केला. साडेपांच महाल हबशांस देऊन वरकड सरकारांत घेतलें." [ पे. ब. खं. ४ ]

८. शके १६९४ च्या सुमारास रायगडचा किल्लेदार पेशव्यांशीं जोरावारीनें वागूं लागला. त्यानें सिद्दीच्या मदतीनें पेशव्यांविरुद्ध बंड उभारलें. त्यावेळीं त्याचा बंदोबस्त करण्याकडे माधवरावांच्या दुखण्यामुळें मुत्सद्यांचें लक्ष गेलें नाहीं. पुढें माधवरावांच्या मृत्यूनंतर नारायणराव पेशवा होतांच रायगडावर स्वारी करण्यांत आली. शके १६९५ मध्यें रायगडच्या फितुरी किल्लेदाराचा मोड होऊन तो शरण आला. त्यावेळीं 'आपण साताऱ्च्या छत्रपती रामराजाच्या वतीनें पेशव्यांशीं लढत आहों. पेशवे छत्रपतीला कैदेंत ठेवल्यासारखे वागवतात" असें त्यानें आपल्या पुंडाव्याचें कारण सांगितलें. परंतु रामराजाचें आज्ञापत्रच त्या किल्लेदारास दाखविलें तेव्हां त्याचें बोलणें, फोल ठरून किल्ला पेशव्यांच्या ताब्यांत आला. व ४०००० रुपये दंड घेण्यांत आला.

९ पुढें नारायणराव पेशव्यांचा वध होऊन पुण्यांत नवीन भानगडी सुरु झाल्या. रायगडावर पेशव्यांचा पूर्ण बंदोबस्त होता तरी सिद्दीचा उपद्रव कमी झाला नव्हता. " ता। रायगड येथें शामळ जंजिरेकर यानें जमाव करून येऊन मुलकांत दंग केला आहे. त्याचे बंदोबस्ताविशी

१ रघुनाथ सदाशिव तो। रायगड यास सनद कीं रायगडकरी व महाडकरी लोक नामजादीस आम्हांकडून गेले आहेत त्यांपैकीं १०० तुम्ही तो मजकुरी आणून शामलांचा बंदोबस्त करणें. बंदोबस्त जाहालियावर सदरहू

+ प्रांत किल्ले यांचा तपशील [ रा. खं. ३, पृ. ७७ ] मामले, तळे घोसाळे, गोरेगाव, तो। बिरवाडी, निजामपूर तो गांवेल, चाणगांव हिमे महाल पेशव्यांनीं घ्यावे. रायगड, तळगड, घोसाळगड, अवचित गड, बिरवाडी असे किल्ले पेशव्यांनीं घ्यावे.

१०० असामी जेथील तेथें माघारे पाठविणें......पुढें हा तंटा शामला-कडील वकील बोलावून आणून त्याचे हरद्र मनास आणून पक्का तह होत असल्यास तो मजकूरचे चार पांच हजार रुपये पर्यंत अमल न करितां उचल्या हातें द्यावे. द्यावयाचे करार करून दरम्यान मातबर माणूस घेऊन तह करणें फिरोन रयतेस उपद्रव लागो न देणें. [ सवाई माधव० रोजनिशी पृ० ३१० । ११ ]

प्रस्तुत प्रकरणाच्या आरंभीं केलेल्या विधानाप्रमाणें पेशव्यास ही सिद्दीच्या उपद्रवाची व्याधी वारंवार कशी त्रास देत होती, तें वरील उताऱ्यावरून दिसून येईल. बारभाई व रघुनाथराव पेशवे यांचे मध्यें कटकट उपस्थित झालेली पाहून सिद्दी शामळानें रायगड लगतच्या पेशवाई मुलखास उपद्रव देणेची सुरवात केली. पेशवाई मुत्सद्यांस ह्यावेळीं सिद्दीची खोड मोडण्याइतका अवधी नसल्यामुळें त्यांनीं किल्लेदार रघुनाथ सदाशिव यास, ' उचल्या हातें चार पांच हजार रुपये देऊन ' सिद्दीस गप्प बसवा असें लिहिलें.

रघुनाथ सदाशिव ( रायगडचा किल्लेदार ) याच्या पश्चात् त्याचा पुत्र * सदाशिव रघुनाथ याजकडे तो रायगडचा कारभार आला. सिद्दीच्या घराण्यांतील कांहीं राजकीय कैदी यावेळीं रायगडावर होते. त्यांना पुण्यास चौकशी करितां पाठविण्याचा हुकूम या किल्लेदारास आला. " लूवामिया शामल जंजिरेकर याचे भाऊ छोटेमिया व सिद्दी इसूफ व त्याचे बरोबरची माणसे असामीं ७ तो. रायगड येथें अटकेंत ठेविले होते. त्यास हुजुर पाठविणे बद्दल हुकूम सदाशिव रघुनाथ यास जाला होता. त्याप्रमाणें ९ कैदी पोच-ल्याचें कळविण्यांत आलें " अशा अर्थाचा मजकूर [ सवाई माध० पे० रो० पृ० ३१७ ] मध्यें आहे.

## तोतयाचें बंड व रायगडचा बंदोबस्त.

१० पानपतच्या लढाईत नाहींसा झालेला भाऊसो पेशवा तो मी असें

* सदाशिव रघुनाथ तर्फ रायगड यास कीं ता. मजकुर येथील बेगमीस तर्फ गोरेगांव पैकीं नऊ गांव व तर्फ निजामपूर पैकीं तीन गांव दिलें आहेत. [ सवाई माध१० रोज० पृ. ३१४ ]

लटकेच सांगून, त्यानें कोंकणांत बंड उभारलें. तोतया रत्नागिरीच्या किल्ल्यांतून मोकळा होतांच कोंकणांत त्याला भराभर अनुयायी मिळाले. रत्नागिरी जिल्ह्यांतून तोतया कुलाबा जिल्ह्यांत आला. मराठी राज्यावरील संकटाचीं संधी साधून आपला अंमल वाढविण्यास टपून बसलेल्या जंजिरेकर सिद्दी शामळानें तळगड, घोसाळगड व रायगड काबीज करण्यास मदत देण्याचें कबूल केलें. तोतयाच्या लोकांनीं *तळगडास वेढा दिऊन सिद्दीच्या साह्यानें तो घेतला. तेथून तोतयाची फौज रायगड घेण्यास निघाली. वरंध्या घाटानें देशावर जाण्याचा त्याचा मानस होता. रायगडचा बंदोबस्त चांगला असल्यामुळें तो घेतां आला नाहीं. वरंध्या घाटाचाही बंदोबस्त झाल्यामुळें तोतयाची फौज बोरघाटानें पुण्याकडे चालून गेली.

" राजश्री रामचंद्र शिवदेव स्वामी गोसावी यांस.........तरी वरंधा घाटाखालीं तोतयाकडील हजार दीड हजार माणूस आले आहे. घाटावरी X X X X नी माणसें फाडविली जे आम्ही रायरेश्वराच्या डोंगरावरी येऊन राहणार तरि तुम्हीं वाट सोडून देणें इकडील चौकीदारांनीं त्यास सांगितले जे आमच्या धरायाची आज्ञा जाहल्यावरी जी आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं म्हणून करार करून आले. त्यास काय सांगावे पुढें दीड हजार आले. मागोन हजार दोन हजार माणूस येतच आहे. तिकडून घाटाचा बंदोबस्त करावा तरी किल्ल्याचा बंदोबस्तास लोक गुंतले तेव्हां पुढें विचार करावा.

[ भा० इ० सं. मं. पु. ४ पृ. ११५ शके १६९८ अश्वीन शु॥ ८ ]

११. पेशवाईच्या अखेरच्या कालांत रायगड देशावरील शत्रूपासून रक्षण करण्यास कसा उपयोगी पडला हें पुढील विवेचनावरून दिसून येईल. नाना फडणीस हे शेवटच्या बाजिरावाच्या संशयी वागणुकीमुळें पुणें सोडून निघाले. ते महाड येथें येऊन राहिले. त्यानीं रायगडचा बंदो-

* या वेढ्याच्या हकीगतीचा एक ऐतिहासिक कागद मु॥ तळें ता० माणगांव येथें प्रस्तुत लेखकाच्या मदतीनें सांपडला व तो. भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झाला आहे. खरवलीच्या माणकरानीं हा सिद्दीचा व तोतयाचा वेढा उठवून तळगड पुन्हां पेशवाई अमलाखालीं आणिला.

वस्त करून तेथेंच राहण्याचें ठरविलें [ राजवाडे खं. ७ ]. हेतू हा कीं धरणें वगैरे आलें तर तात्काळ रायगडचा आश्रय घेतां यावा. परंतु नानांवर हा प्रसंग आला नाहीं.

पुढें जेव्हां होळकरांनीं पुण्यावर हल्ला करून पेशव्यांचें अधिष्ठानच उठविलें तेव्हां सिंहगडाहून महाडास + व तेथून रायगडास पळून आला होता. तेथें कैदेंत असलेल्या माधवराव रास्त्यांस बंधमुक्त करून, आपल्या बचावासाठीं सैन्य गोळा करण्यास त्यास सांगितलें. इतक्यांत बाजिरावाचा पाठलाग करण्यासांठीं ५ हजार फौज घेऊन यशवंतराव होळकर रायगडचे रोखानें येत आहे असें बाजिरावास कळलें. तेव्हां शके १७२४ च्या कार्तिकांत बाजिराव रायगडावरून वसई येथें इंग्रजांच्या आश्रयास गेला. इकडे होळकरानें रायगड काबीज केला. पुढें बाजिराव व होळकर यांच्यामध्यें इंग्रजांच्या मध्यस्तीनें तह होऊन रायगड पेशव्यांच्या ताब्यांत आला. घाटावरील शत्रू पाठीस लागला म्हणजे सुरक्षितपणें राहण्यास रायगड उपयोगी पडत असे. शेवटच्या बाजिरावावर जेव्हां आपली पुणें राजधानी सोडण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यालासुद्धां रायगड हीच जागा सुरक्षित वाटली.

" श्रीमंत क्षत्रिय कुलावतंस महाराज राजश्री छत्रपतीचे शेवेशीं विनंति सेवक बाजिराव रघुनाथ प्रधान कृतानेक विज्ञापना ता. छ. २२ मोहरम सुरुसन इहिये अशर मयातेन व अलफ यशवंतराव होळकर यांचे बोलणें कीं पूर्वी जसे बखेडे झाले. कारण सातारा जागा नाजूक बाकी नव्हे बलकुबलीस रहावयाचे उपयोगी नाहीं सबब पूर्वी शिवाजी महाराज यांनीं रायगड सारख्या जागा बसवून दवलती केल्या. प्रसंगाचे दिवसांत सातारियास खासा स्वारी राहणें हें माझे विचारास येत नाहीं. रायगड जागा चांगली मजबूत कोणी म्हणे कीं फौजा पाठवून वस्त्रे आणू किंवा बखेडा करूं तरी होणार नाहींत. या करितां स्वामीची मर्जी मुकारकेंत आल्यास यशवंतराव होळकर दक्षिणेंत येऊन कोठें लढाईचा प्रसंग न करितां........." [ मिती आश्विन शु॥ १२ शके १७३२ चें बाजिरावाचें स्वदस्तुरचें पत्र ]

+फारसी मराठी पत्रव्यवहार. पत्रांक १२३. शके १७२४ पौष व॥ १० वेलस्लीचें पत्र. पेशव महाडाकडे गेल्याचा उल्लेख आहे.

हिंदवी स्वराज्याचें पाहिलें स्वतंत्र सिंहासन ज्या रायगडावर स्थापिलें, त्या रायगडचा स्वराज्यकालीन इतिहास आतांपर्यंत लिहिला आहे. शके १७२४ मध्यें वसईचा तह झाल्यापासून मराठी राज्याच्या पारतंत्र्यास प्रारंभ झाला. क्रमाक्रमानें सर्व मराठी साम्राज्य इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. त्यांतच आमचा रायगडही अखेरची धडपड करून इंग्रजांस मिळाला. तो इतिहास पुढील प्रकरणीं देण्यांत आला आहे.





रायगडवरील शिवाचें मंदीर.

# प्रकरण ७ वें.

## रायगडच्या स्वातंत्र्याचा शेवट.




सईच्या तहानें बाजीराव पुराच इंग्रजांच्या ताब्यांत गेला. तेव्हांपासून बाजिराव व इंग्रज यांच्या अनेक कटकटी झाल्या. गंगाधरशास्त्र्याच्या खुनाचें प्रकरण निस्तरतांना बाजीरावास पुरेसें झालें. शेवटीं पुणें येथें इंग्रज व पेशवे यांत तह झाला (शके १७३८.) " गायकवाडाकडून पेशव्यांनें यापुढें बाकी मागूं नये, व राहिलेल्या बाकीबद्दल वर्षास साडेचार लक्ष रुपये गायकवाडाकडून घेऊन पेशव्यानें स्वस्थ बसावें. इंग्रजांस पलटणीच्या खर्चाकरितां मागें २६ लक्षांचा मुलूख दिला होता. तो आतां ३४ लक्षांचा दिला. " या तहाची हमी म्हणून बाजिरावानें इंग्रजांस रायगड, सिंहगड, पुरंदर हे तीन किल्ले द्यावे असें ठरलें. रायगड देणें बाजिरावाच्या जिवावर आलें होतें. परंतु बऱ्याच वाटाघाटी नंतर दिला. शके १८३७ च्या पावसाळ्यांत बाजिराव पंढरपुराहून माहुलीस गेला. व त्यानें इंग्रजाबरोबर युद्धाची तयारी चालविली व याचवेळीं रायगडही*ताब्यांत घेतला. आपली पत्नी +वाराणसीबाई

---

* इंग्रज व पेशवे यांचें भांडण सुरू झालें तेव्हां बाजीरावाचे हुकुमानें रायगड, सिंहगड, पुरंदर, व त्रिंबकगड येथें लढाईचा बंदोबस्त सुरू झाला. ( रा. खं. ४ पृ. १२२ शके १७३८|३९ )

+ " त्यास श्रीमंताची स्वारी तर्फ मजकुरीं सन सलासमया तैनात ( शके १७२४ ) दाखल झाली. यावर यशवंतराव होळकर याचा दंगा जाहाला. ते समई श्रीमंत येशवदाबाईसाहेब किल्ले रायगडास होती. या करितां राजेश्री

हिला बरोबर बरीच मालमत्ता।। देऊन रायगडीं पाठविलें.

×बालोजी कुंजीर याणी श्रीमंताची आज्ञा महाडचे मुक्कामी घेऊन जमीनदार तर्फ मजकूर यास ताकीद केली. कीं तर्फ मजकूरचे रयतेस दिल दिलासा देऊन रयते नीं पळूं नये किले मजकुरी रसद भरणा दाणा वगैरे कारकारसाई पोहोचऊन द्यावी म्हणजे घर देणें असे ते पाल दिल्हे जाईल. त्या प्रमाणें रयेत सरकार कामास आली...... " म. सा. पत्रिका अं. २ वर्ष २ रें, पृ. ३८

|| श्रीमंतानीं किल्ले इंग्रजी सरकारांतून माघारा दिल्यावर जवाहीर व पैका वगैरे चीजवस्त सिंहगड व रायगड वगैरे किल्यांत रवाना केली व वाड्यांतील देव व थोरली स्त्री वाराणशीबाई रायगडास पाठविली. राजवाडे (खं. ४ पृ. १३९.)

× बालोजी कुंजीर या वेळीं रायगड मामल्यावर होता. त्याचें एक पत्र बिरवाडी येथें श्री. वि. अं. पटवर्धन यांचेकडे सांपडलें आहे. त्याचा शिक्का व आरंभीचा मजकूर असा आहे.

श्री.
मार्तंड
पंत प्रधान चरणी
तत्पर सुभानजी सुत
बाळोजी कुंजीर
नीरतर

शके १७२१ चैत्र शु।। ३ ( सन १७९९ एप्रील ८ ) " कौलनामा अजस्वारी राजश्री बालोजी कुंजीर सुभेदार तालुके रायगड वा। " शिवाय आणखी कांहीं कागद सांपडले आहेत त्यावरून पुढीलप्रमाणें रायगडचे किल्लेदार होते असें दिसतें.

श्री
श्री वेंकटेश चरणीतत्पर
परशराम केशव
नीरतर

हा शिक्का

[ शके १७३४ " राजश्री पराशराम केशव सुभेदार तो।। रायगड " सेवक रामचंद्र भिकाजी सुभेदार तो।। रायगड शके १७३८

२. इंग्रज व बाजिराव याच्यांत अनेक झटापटी होऊन अखेर बाजिरावाचा पूर्ण पराभव झाला. शके १७४० मध्यें मालकमला बाजिरावानें पेशवाईची सोडचिठी लिहून दिली. ह्या त्याग–पत्रावरून इंग्रज सर्व मराठी राज्याचे मालक बनले. ले. कर्नल प्रॉथर हा घाट माथ्यावरील सह्याद्रीच्या ओळी लगतचे किल्ले घेण्याच्या मोहिमेवर निघाला त्यानें इसापूर, लोहगड, कोअरी, हे किल्ले घेतले. नंतर कुलाबा जिह्यांतील ठिकाणे काबीज करण्याची मोहीम सुरू केली. रायगडच्या घेऱ्यांतील तळें, घोसाळें व मानगड हे किल्ले बिनविरोध इंग्रजांच्या ताब्यांत आले. प्रॉथरनें २३ एप्रीलपर्यंत आपलें ठाणें इंदापूर ( ता० माणगांव ) येथें ठेविलें होतें. तळगड १० शिपायांची तुकडी पाठवून घेतला. मानगडावर इंदापूराहून निजामपूर मार्गे एक तुकडी पाठवून तो घेतल्याचें जाहीर केलें. २३ एप्रील रोजीं त्यानें इंदापूर सोडलें. व तो महाडास आला. ८९ व्या तुकडीचा अधिकारी मेजर हॉल याचे हाताखालीं २०० गोरे व २०० काळे शिपाई देऊन त्यास रायगडावर पाठविलें. इंग्रजी सैन्य ता. २४ एप्रील रोजीं पहाटेस पाचाड येथें आले. रायगडावरील ३०० लोकांच्या एका तुकडीनें यास पाचाड येथेंच आडवून धरलें. या चकमकींत इंग्रजांचे ३ शिपाई जखमी झाले व मराठ्यांचे २० ठार झाले. तेव्हां मराठी सैन्यानें पाचाड सोडलें व तें किल्यावर निघून गेलें. इंग्रजानीं पाचाडची नाकेबंदी करून मुख्य छावणी पाण्याच्या आश्रयानें मागें ३ मैलांवर नेण्यांत आली. ता. २५ रोजीं निरनिराळ्या इंग्रजी टोळ्यांनीं किल्ल्याच्या पायथ्याच्या सर्व भागांची पाहाणी करून, तोफांचे मोर्चे बांधण्यांत आले. इंग्रजी सैन्य रायगडला वेढा देऊन बसलें. मराठी सैन्यानें किल्ला भांडविण्याचा कसोशीचा प्रयत्न केला. कोंकणांतील कांहीं किल्ले अल्पायासानें हातीं आल्यामुळें, कॅ. प्रॉथरला रायगडचा विरोध बराच जाणवला. त्यानें मुंबईस सैन्याची मदत मागितली. थोड्या दिवसांनीं पावसाळा सुरू होणार असल्यानें बरसाती पूर्वी रायगडचा वेढा पूर्ण करणें भाग होतें. मुंबई सरकारनें ६७ व्या पायदळी पलटणींतील सहा तुकड्या रायगड येथील सैन्याचे कुमकेस रवाना केल्या. दक्षिण कोंकणांत मोहिमेवर असलेल्या ८९ व्या पलटणीपैकीं एक तुकडी मालवणाहून रायगडावर आली.

इंग्रजी तोफांनीं शेजारच्या टेकड्यांवरून किल्ल्यावर मारगिरी चालविली. तटास सुरुंग लावण्यांत आले. किल्ल्यावरून इंग्रजी सैन्यावर तोफांचा भडिमार चालला होता. त्यापासून बचाव व्हावा म्हणून खंदकाचा आश्रय इंग्रजी सैन्यानें केला. रायगड नजीकच्या कांगोरी व प्रतापगड किल्ल्यावरून मराठ्यांच्या कांहीं टोळया रायगडास वेढा देणाऱ्या इंग्रजी सैन्यावर चालून आल्या. ले० क्रॉसवी हा महाडास तळ देऊन होता. त्यानें हे मराठी हल्ले परतविले. कांगोरी किल्ल्यावरून आलेल्या मराठ्यांचा व ले. क्रॉसवी याचा मोठा सामना काळनदीचे कांठीं झाला.

३. रायगड बरसात सुरु होण्यापूर्वी ताब्यांत येत नाहीं, असें पाहून कॅ. प्राथरनें बाजिरावाची पत्नी वाराणशीबाई हिला निरोप पाठवून किल्ला खालीं करून देण्यास सांगितले. तिनें किल्ला देण्याचें साफ नाकारलें. ता. ६ मे रोजीं दक्षिणेस असलेल्या गुयरीच्या डोंगरावर मारगिरी करणाऱ्या आठ इंची तोफेचा गोळा रायगडावरील दारूच्या* कोठींत पडला. ती सायंकाळची ४ वाजण्याची वेळ होती. दारूकोठारांत मोठा भडका उडाला. भूकंप व्हावा तसा सारा रायगड किल्ला हदरला. उघडच आहे ! स्वराज्याच्या पहिल्या राजधानीचा मान मिळालेला रायगड पारतंत्र्य-नरकांत पडतांना दगडा-मातीचा

* गुयरीच्या डोंगराचा पोटल्याचा डोंगर म्हणून एक फांटा आहे. त्यावरून ही तोफ सोडण्यांत आली. तिचे गोळे दारु कोठाराच्या आसपास पडत पण नेमके तेथें पडत नव्हते! तेव्हां रायनाक महारानें फितूर होऊन तोफेच्या गाड्याखालीं दोन शिवराई ढबू घालण्याची युक्ती सांगितली. लागलीच गोळा दारु कोठारांत पडून भडका उडाला. इंग्रजांनीं या फितुरी रायनाकाला कडेलोटाची शिक्षा दिली. व त्याच्या देशद्रोहाचें योग्य फळ त्याला मिळालें. अशी एक दंतकथा आहे.

रायनाक महाराबद्दल महाडच्या कारखाननिसांच्या घराण्याकडून अशी माहिती मिळते कीं,:- तो (रायनाक) इंग्रजांना फितूर झाला नाहीं, उलट किल्ला लढविण्यासाठीं अखेरपर्यंत लढत मेला. म्हणून त्याचा एक चांदीचा टांक करून तो पूजण्यास ठेविला आहे.

असला तरी शहारून जावा यांत नवल काय? इतके दिवस जवानमर्दीनें लढलेला रायगड, ह्या दारू-कोठारांच्या स्फोटामुळें प्राणहीन-शवासारखा-बनला. माणसांचें अन्न संपतें तर गडावरील झाडपाला खाऊन शिपायांनीं आपलीं पोटें भरलीं असतीं. पण तोफा, बंदुकांचें अन्न-दारू-खलास झाल्यामुळें तोफेच्या तोंडीं काय द्यायचे ? रायगडावरील माती ! त्या मातींतही आतां शिव–कालीन स्पोटपणा राहिला नव्हता. असो, त्याच दिवशीं सायंकाळीं वाराणसी-बाईसाहेबांच्या हुकमावरून किल्ला खालीं करून देण्याचें किल्लेदारानें कबूल केले. त्यादिवशींच्या सूर्यानें महाराष्ट्राच्या ह्या राजकीय पुण्यभूमीवरील सोनेरी किरण अखेरचेच आवरून पश्चिम समुद्रांत एकदांची उडी घेतली.

४. दुसऱ्या दिवशीं पाचाडजवळ वाडी येथें आठ वाजतां तहाची वाटाघाट सुरु झाली. इंग्रज सेनापतीनें अशक्य अटी घातल्या. सर्व किल्ला द्रव्य-सामानासह इंग्रजांस द्यावा. इ. इ. त्या अटी पाळून किल्ला ताब्यांत देण्याचें मराठ्यांनीं नाकबूल केलें. ह्या तहाला पांच तासांची मुदत दिली होती. मराठ्यानीं अद्याप बाणेदारपणा सोडला नव्हता. त्यांना कोठून तरी मदत येऊन किल्ल्याचा वेढा उठेल ही आशा होती. इंग्रजांनी पुन्हां तोफांचा भडिमार चालविला. तो दुसरे दिवशीं म्हणजे ८ तारखेस दुपारीं १० वाजेपर्यंत चालू होता. १० वाजतां मुख्य किल्लेदार शेख अबदुल हा स्वतः तहाची वाटाघाट करण्यास पायथ्याशीं आला. ही वाटाघाट ९ तारखेस दुपारीं ३ वाजेपर्यंत चालली होती. तहाच्या देखाव्यावर इंग्रजास झुलवीत ठेवण्याची ही किल्लेदाराची युक्ती होती. तो कोठून तरी दारूगोळ्याची व सैन्याची मदत येईल ह्या आशेवर होता. शेवटीं निरुपाय झाल्यावर तह ठरला. तो असा. १०० अरब ८० मराठे सैनिक यांनीं आपलीं शस्त्रें, कुटुंबांतील मंडळी व मालमत्ता घेऊन खालीं उतरावें. किल्लेदारानें आपल्या पांच अनुयायांसह पुण्यास रहावें. बाजीरावाचे बायकोबरोबर किल्लेदाराच्या मंडळींपैकी कोणी नसावा. किल्लेदारानें देखील आपल्या खाजगी मालमत्तेखेरीज कोणतीही चीजवस्त नेऊं नये. ह्या अटी पाळण्याची हमी म्हणून खुद्द किल्लेदारानें इंग्रजी छावणींत रहावें. १० मे

रोजीं दुपारीं* क. प्रॉथर वर गेला. तो वर जात असतां सैन्य मराठी खालीं उतरत होतें. इंग्रजाच्या१००सैनिकांनीं किल्ल्याच्या दरवाजा आपल्या ताब्यांत घेतला. क. प्रॉथर वर गेला, तों त्याला सर्व किल्ला बेचिराख झालेला आढळला. कित्येक इमारती अद्याप पेटत होत्या. मात्र धान्याचा संग्रह व काहीं इमारती शाबूत होत्या. इंग्रजांच्या माऱ्यानें किल्ल्याची अगदीं धुळधाण उडविली. क. प्राथर किल्यावर वाराणसीबाईचे भेटीस गेला. ती बाई निराशा, दुःख, उद्विग्नता यांनीं खिन्न झाली होती. तिच्याआजूबाजूला अग्नीनें सर्व हलकल्लोळ मांडला होता. नंतर तिला तिच्या खाजगी मालमत्तेसह पुण्यास जाण्याची परवानगी देण्यांत आली. तिच्याबरोबर १०० शिपायांची एक तुकडी बंदोबस्तासाठीं देण्यांत आली. ह्या बाईच्या पांवलांबरोबर रायगडला व अखिल महाराष्ट्राला स्वातंत्र्यलक्ष्मी सोडून गेली. इंग्रजांनीं आपलें बावटा–युनियन जॅक–रायगडावर फडकविला! किल्ल्यांत पांच लक्ष रोकड नाण्यांच्या रूपानें इंग्रजांच्या हातीं आली. संपला रायगडचा इतिहास!

वाचकहो, स्वराज्यात्मा निघून गेल्यावर आतां रायगडच्या इतिहासाचा समारोप कोणत्या शब्दांनीं करूं! स्वातंत्र्यचैतन्य नष्ट झालेल्या रायगडच्या दगडाधोंड्याच्या शवाकडे पाहून दुःखानें अपार अश्रू आल्यानें सारा समारोप धुपून निघाला!

१. " पण सुदैवानें वाराणशीबाई तशा नव्हत्या. त्यांनीं या मायावीपणाच्या पासपोर्टाच्या निरोपाला झिडकारून टाकलें आणि त्या किल्लेदाराला म्हणाल्या, " मी असल्या या फसवेगिरीच्या मोहाला कधींही बळी पडणार नाहीं. मी तुमच्या संरक्षणाखालीं इतके दिवस एथें येऊन राहिलें;

* क. प्रॉथरनें ता. १२ मे १८१८ रोजीं काढलेल्या जाहिरनाम्यांत त्यानें रायगडावर निशाण रोवणारे जॅप व डॅशवुडज् तोफांचे मोर्चे बांधणारे ले. रेमन यांचें अभिनंदन केलें आहे.

मेजर बॉड यानें केलेले हल्ले तोफांची अचूक मारगिरी होण्यासाठीं रायगड भोंवतालच्या डोंगरावर करण्यांत आलेली मोर्चेबंदी, व सुरुंग लावण्यांत दाखविलेलें कौशल्य ह्यांचा कौतुकानें उल्लेख केला आहे.

आणि आतां मी तुम्हांला संकटांत टाकून आपल्या देशाच्या शत्रूच्या संरक्षणाखालीं जाईन, असें तुम्हांला वाटतें? तुम्ही माझ्या संरक्षणाखालीं आपल्या जीवावर उदार झालां अहां अशा वेळीं माझ्या जीवाच्या संरक्षणासाठीं तुमचे जीव धोक्यांत घालून मी कशी जाईन? मनुष्यप्राण्याला इतकें कृतघ्न कसें होतां येईल? किल्लेदार, शेखअबदुल! मी आपल्या जीवाच्या बचावासाटीं येथून एक पाऊलभर देखील हालणार नाहीं! तिकडच्या जीवावर दररोज लढाईचीं हजारों संकटें कोसळत असतांना मी आपल्या या यःकश्चित् जीवाच्या बचावासाठीं त्यांच्या शत्रूच्या संरक्षणाखालीं कशी जाईन? किल्लेदार, येथील माझ्या सहवासानें माझ्या पोटच्या मुलांच्याप्रमाणें या तुमच्या सगळ्या शिपायांवर माझें मातृप्रेम जडलेलें आहे. या माझ्या मुलाबाळांना टाकून मी कोठें जाऊं? किल्लेदार, तें कांहीं नाहीं! आपण सगळेजण या किल्ल्याच्या तटावर उभे राहून शत्रूला मारूं किंवा मरूं! हा त्या शिवाजीमहाराजांचा किल्ला आहे! या पवित्र किल्ल्याला आपल्या कमकुवतपणानें आपण कोणत्याही प्रकारचा कलंक लावतां कामा नये!"

६. "या सर्व किल्ल्यांचा मिळून तो एक संघ होता त्या संघाच्या सभा नेहमीं भरत असत! व त्या सभांतून महाराष्ट्रांतील सर्व किल्ले हजर असत. या किल्ल्यांच्या संघाची सभा भरण्याची वेळ मध्यरात्रीची असे आणि त्यांचीं जागा आकाशमंडळांतील विस्तीर्ण मैदान ही असे! चंद्र आणि तारे यांच्याकडे त्या संघाच्या सभेंतील रोषणाईचें काम देण्यांत येत असे! आणि सभेंतील सभासदांना उष्णतेपासून त्रास होऊं नये म्हणून प्रत्यक्ष वायु हा तेथें पंखे ओढण्याचें काम करीत असे. अशा व्यवस्थेमध्यें या महाराष्ट्रांतील किल्ल्यांच्या संघाची सभा भरली असतां त्या सभेमध्यें काय भाषणें होत असत! रायगडचा किल्ला हा त्या किल्ल्यांच्या संघाचा कायमचा अध्यक्ष होता! तो अध्यक्ष स्थानापन्न झाल्यानंतर तेथें जीं भाषणें होत, तीं फक्त एक वीररसाचींच असत! प्रत्येक किल्यानंतर तेथें आपण सहन केलेल्या तोफेच्या गोळ्यांच्या जखमा आपल्या श्रोतृवृंदापुढें दाखवीत असे; आणि कोणत्याही उत्कृष्ट मानवी वक्त्यापेक्षां तो त्या योगानें

आपल्या श्रोत्यांच्या मनावर जास्त परिणाम उत्पन्न करीत असे ! कोणताही किल्ला बोलावयाला उठला, तरी त्याच्या सगळ्या बोलण्यांतील सार एकच असें; आणि तें हें कीं, आपल्याला कितीही संकटें सोसावीं लागलीं, तरी सगळीं मुकाट्यानें सहन करून आपण अखेरपर्यंत आपल्या देशाच्या स्वातंत्र्या-करितां लढत उभें राहिलें पाहिजे ! आतां हा लढण्याचा कार्यक्रम अयशस्वी झालेला आहे; तेव्हां आतां आपण सगळेजण शत्रूला शरण जाण्याचा कार्यक्रम स्वीकारूं या. अशा प्रकारचा अभद्रपणाचा एकही शब्द तेथें कोणाच्या तोंडून कधीं निघत नव्हता. लढण्याला किंवा शत्रूशीं तोंड दे-ण्याला थकला असा एकही किल्ला त्या संघामध्यें नव्हता. ते किल्ले म्हणत असत कीं, मनुष्यानें आमचे दरवाजे उघडून शत्रूला आंत घेतलें, तर तेथें आमचा नाइलाज आहे, पण आम्ही आपण होऊन आपले दरवाजे कोणत्याही परशत्रूच्या प्रवेशाकरितां प्राण गेला तरी उघडणार नाहीं व आम्ही कधीं कोणाला शरण जाणार नाहीं. त्या सर्व किल्ल्यांनीं आपलें सर्व प्राचीन इतिहास प्रत्यक्ष पाहिलेले होते, व परकीय लोकांनीं लिहिलेल्या खोट्या इतिहासाकडे ते कधीं ढुंकूनही पहात नसत. अशी स्थिति असल्यामुळें त्या सर्व किल्ल्यांच्या संघानें बाजीरावसाहेबांच्या वेळीं असा निश्चय ठरविला होता कीं, आपले धनी बाजीरावसाहेब यांनीं इंग्लिशांच्यापाशीं हल्लीं लढाई करण्याला सुरवात केली आहे, अशा वेळीं आपण सर्वांनीं इमानेंइतबारें त्यांच्या बाजूनें लढलें पाहिजे आणि शेवटपर्यंत टिकाव धरून राहिलें पाहिजे!"

७ " पण या वेळीं रायगडच्या किल्ल्यावर हल्ला करणाऱ्या इंग्लिश लोकांना पाठीमागून शह देण्याकरतां कोणीच पुढें सरसावले नाहींत, असें नाहीं. पूर्वी वायरलेस टेलिग्राफीचीं साधनें जरी अस्तित्वांत आलेलीं नव्हतीं, तरी एका किल्ल्यावरची बातमी आसपासच्या किल्ल्यावर कळविण्याचे कांहीं मार्ग त्या वेळच्या लोकांनींही योजिलेले होते. आणि तोफांच्या आवाजांनीं, किंवा मोठाले जाळ पेटवून, किंवा इतर कांहीं खुणांनीं ते लोक आपल्या बातम्या दुसऱ्यांना कळविण्याचा कार्यभाग साधून घेत असत. अशा कांहीं उपायांनीं अगर जासुदाच्या निरोपांनीं रायगडापासून कांहीं थोड्या अंतरा-

वर राहाणारे रायगडाचे दोन धाकटे भाऊ—कांगोरीचा किल्ला व प्रतापगडचा किल्ला–यांना आपल्या वडील भावावर गुदरलेल्या प्रसंगाची बातमी कळली; व ही बातमी कळतांक्षणींच त्या दोन्ही किल्लयांवरचे मिळून कांहीं लोक खालीं उतरले; व रायगडावरचा किल्लेदार इंग्लिशांच्या सैन्यावर गोळे फेकीत असतां, आपण पाठीमागून जाऊन त्या शत्रूच्या सैन्याला दोहोंकडच्या मारामध्यें गांठावें, असा त्यांचा विचार होता. आणि त्या उद्देशानें प्रतापगडच्या आणि कांगोरीच्या किल्लयाच्या पायथ्याशीं सावित्री नदीच्या कांठीं पोलादपूर म्हणून जें एक गांव आहे, तेथें हे लोक जमा झाले. परंतु हे लोक पाठीमागून आपल्या सैन्यावर छापा घालण्याकरिता येत आहेत, असें कळल्याबरोबर लेफ्टनंट क्रॉस्बी हा त्या लोकांवर चालून गेला. विजयश्रीच्या या लहरी पक्षपातामुळें मराठे शिपायांच्या त्या वेळच्या त्या प्रयत्नाला यश आलें नाहीं.

मराठ्यांचीं युद्धें.

---

# प्रकरण ८ वें.

## इंग्रजी अमलांतील रायगड.




ढ झोपेंतून एकाएकीं जागे व्हावें. आपण आपल्या घरीं असलों तरी आपण कोठें आहों, आपले पाय कोणत्या दिशेला आहेत, बाहेर पडण्याचा दरवाजा कोठें आहे, याचें कांहीं एक भान रहात नाहीं. इंग्रजी अमलाच्या सुरवातीस हिंदुस्थान असेंच कांहींसें भांबाऊन गेलें. मागील सर्व स्मृती नष्ट झाल्या. इंग्रजी अमलाच्या मोहमयीनें हिंदुस्तान दिङ्मूढ बनलें ! स्वातंत्र्याची स्मृती नष्ट झाली; स्वाभिमान गारठला, पराक्रम पारखा झाला, विचारांची उज्ज्वलता लोपली इतकेंच नव्हे तर पूर्वजांच्या उज्वल इतिहासाकडे व पूर्व संस्कृतीकडे पाहण्याची दृष्टीच दूषित बनली. ह्या मोहांधतेचें पटल इतर प्रांताप्रमाणें महाराष्ट्रावरही पसरलें. महाराष्ट्र आपली शेंकडों वर्षांची उज्ज्वल ऐतिहासिक परंपरा विसरून हिवाळ्यांतील वाढ खुंटलेल्या झाडाप्रमाणें स्तिमित झाला. ह्या अव्वल इंग्रजींत हिंदुस्तानची राष्ट्रीय-भावना अगदींच मलिन झाली. ह्या मालिन्याची राख ऐतिहासिक स्थलांवरही उडाल्यावांचून राहिली नाहीं. पण एकोणिसाव्या शतकाचे अखेरीस ह्या राखेंतूनच गणपति उत्सव, शिवाजी उत्सव इ. इ. अग्नि-स्फुलिंग बाहेर पडून त्यांच्या द्वारें साऱ्या महाराष्ट्रभर एका सामर्थ्यवान् विचारांची रसरसीत दीप्ति पसरली गेली. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर व लो. टिळक या दोन विभूतींनीं महाराष्ट्रांत राष्ट्रीय चैतन्य आणण्याचे अनेक प्रयत्न केले. पैकीं लो. टिळकांनीं गणपत्युत्सव व शिवाजी उत्सव सुरू करून धर्म व इतिहास यांच्या भूमिकेवरून राजकारणाचे पाट महाराष्ट्रास दिले. प्रस्तुत प्रकरणांत लो. टिळकांनीं रायगड फंड, शिवाजी उत्सव इ. इ. महत्त्वाच्या चळवळी कशा केल्या व त्या बीजाचा आज केवढा वृक्ष झाला आहे हें पहावयाचें आहे.

२ शिवाजी उत्सव संबंधी चिरोल साहेब आपल्या पुस्तकांत लिहितात:— ''मराठे मंडळीस आपल्या बाजूला आणण्याचें काम टिळकांस अद्यापी करावयाचें होतें. म्हणून ज्या शिवाजीनें मुसलमान लोकांचा पराभव करून महाराष्ट्रांत हिंदुपद-पादशाहीची स्थापना केली त्याचा जन्म एका मराठा सरदाराच्या कुलांत झाला असल्याकारणानें त्याच्या पराक्रमाचे पोवाडे गाऊन शिपाई बाण्याचे जे मराठे लोक त्यांच्या मनांत इंग्रजी राज्याविषयीं असलेले प्रेम नाहींसें करून त्यांना आपल्या बाजूला वळवून आणण्याच्या उद्योगास टिळक लागला. कांहीं लोकांचा असा तर्क आहे कीं, एका इंग्रज गृहस्थानें वर्णिलेल्या रायगडावरील शिवाजीच्या समाधीच्या शोचनीय स्थितीच्या हकीकतीवरून टिळकांच्या मनांत प्रथमत:कल्पना आली कीं,शिवाजी उत्सव सुरू करून त्याचा फायदा राजकीय चळवळीस करून घ्यावा...... कसेंही असो, टिळकनें शिवाजीला पुढें आणून मोठी ''राष्ट्रीय'' धामधूम सुरू केली. व सन १८९५ सालीं महाराष्ट्रांत सर्व मुख्य ठिकाणीं शिवाजीच्या जन्मदिवसानिमित्त उत्सव करण्यांत आले.''

विरोधी भावनेनें कां होईना, पण चिरोलनें राष्ट्रीय भावना जागृतीचें श्रेय टिळकांच्या व शिवाजी उत्सवाच्या गळयांत घातलें !

३ ह्या प्रकरणाच्या सुरवातीस सांगितल्याप्रमाणें अव्वल इंग्रजींत महाराष्ट्र अगदीं स्तिमीत झाला होता. एवढा स्वातंत्र्य–संस्थापक शिवाजी पण परकीय इतिहासकाराच्या डोळयांनीं त्याच्याकडे पाहिल्यामुळें तो चोर, दरवडेखोर व खुनी वाटूं लागला. त्याचें नांव घेणें, त्याचा जयजयकार करणें भीतिदायक वाटूं लागलें. शाळेंत मुलांना देखील परकीयांनीं विकृत केलेला शिवाजीचा इतिहास शिकवावा लागे.खुद्द शिवाजीमहाराजीसंबंधानें इतकी अनास्था! तर त्याच्या राजधानीची व समाधीची किती अनास्था असेल बरें? सन १८१८ सालानंतर रायगड किल्ला व समाधी ही सरकारच्या जंगल खात्याच्या ताब्यांत.जंगल खात्याचे धारे–कायदे काय विचारावे ? एक झाडाची फांदी तोडावयास अगर एक फूट खोल खड्डा खणावयास परवानगी नाहीं. सन १८१८ च्या रायगडच्या वेढ्यांत इंग्रजी तोफांनीं रायगडावरील सर्व इमारती जाळून, मोडून, तोडून टाकल्या होत्या. फक्त कांहीं भिंताडें व

एक दोन इमारती उभ्या होत्या. त्यांही ऊन, पाऊस, वारा यांच्या माऱ्यानें भूमीला शरण आल्या. जिकडे तिकडे उजाडपणा, उदासपणा व रखरखीतपणा पसरला. कित्येक तळीं,हौद तळांत फुटल्यामुळें जलशून्य—अतिशोकानें पाणी आटलेल्या डोळ्यांसारखीं—दिसूं लागलीं. नयनमनोहर गंगासागर चिखलानें ओहळून व तळाशीं फुटून मढ्याच्या खांचा झालेल्या डोळ्यासारखा दिसूं लागला. राजवाडा व इतर इमारती पारतंत्र्यानें चूर्ण झालेल्या राष्ट्राप्रमाणें सहस्रशः भग्न होऊन पडल्या. सारांश त्यावेळीं रायगडचें दर्शन घेणाऱ्या प्रवाशाला आपण ओसाड निर्मानुष प्रदेश पहात आहों असें वाटलें असतें. मुसलमानी अमलांत पददलित झालेल्या महाराष्ट्राला स्वातंत्र्याचा सौभाग्यतिलक लावणारा श्रीशिछत्रपती जेथें सिंहासनाधीश्वर झाला तें महाराष्ट्राच्या अभिमानाचें आश्रयस्थान राजधानी रायगड हें होय ! ह्या पुण्यभूमीचें दर्शन घेण्यासाठीं भाविक लोक कधींमधीं रायगडावर जात असत. त्यांना तेथें काय दिसत असे ? खडकाळ व उजाड मुलुख. रात्रभर निवाऱ्याची एखादी जागाही किल्ल्यावर नाहीं. शिवछत्रपतीचें स्मारक पहावें तों एक भग्न होऊं लागलेला लहानसा दगडी चौथरा. आत्मीयभावाचा अभिमान नसलेला इतिहासभक्त परदेशी प्रवासी जर हिंदुस्थानांतील ऐतिहासिक स्थळें पहात पहात रायगडावर आला असता तर तो जवळच्या वाटाड्याला म्हणता “ तूं वाट नाहींना चुकलास रायगड किल्ल्याची ? ज्या जगद्वंद्य पुण्य पुरुषानें आटोकाट प्रयत्न करून हिंदवी स्वराज्याची पहिली राजधानी ज्या गडावर स्थापली तेथें इतकी ओसाडी ? मी उत्तरेंत पहिलें तो प्रियानें प्रियेसाठीं बांधलेलें प्रेमाचें थडगें ( ताजमहाल ) जगाला ललामभूत झालें आहे ! निराकार परमेश्वराच्या प्रार्थनेसाठीं उत्तरेच्या बादशहांनीं बांधलेल्या साकार मंदिरांचें सौंदर्य जगप्रसिद्ध ठरलें आहे . तसें येथें कांहींच दिसत नाहीं ”! हे त्या प्रवाशाचे काल्पनिक उद्गार अगदीं सत्य आहेत. पण आत्मीय बुद्धीनें रायगडाकडे पाहणारास तेथील प्रत्येक धोंड्या दगडावरून शेंकडों ताजमहाल ओंवाळून टाकावेसे वाटतील. गगनस्पर्शी विजयस्तंभापेक्षां तेथील पडकी भिंताडें जास्त उत्तमोत्तम वाटतील. हा भावनेचा फरक मान्य केला तरी रायगडच्या उपेक्षेचें चित्र कमी भडक ठरत

नाहीं. रायगडची एतत्कालीन उपेक्षा जशी जनतेनें केली तशी सरकारनें केली. पुढें रायगड स्मारक व शिवाजी उत्सव ह्या परस्पर अनुयोगी चळवळींचा बनाव कसा बनत गेला हें आतां पहावयाचें आहे.

"सन १८८५ सालीं रायगड येथील शिवाजी महाराजांच्या समाधीच्या उपेक्षेचा उल्लेख वर्तमानपत्रद्वारें जनतेपुढें आला. कुलाबा जिल्ह्यांतील एका जंगल अधिकाऱ्यामुळें हा उल्लेख जाहीर झाला. रायगड किल्ला सरकारी जंगलखात्यांत मोडतो. या वेळीं कर्झन साहेबानें काढलेला ऐतिहासिक वस्तुसंरक्षणाचा कायदा झालेला नव्हता. तरी सर्व किल्ला जंगलची हद्द म्हणून सरकारच्या ताब्यांत गेला. अर्थात् समाधीही त्यांत आलीच. पेशवाईनंतर रायगडावर दोनचार धनगरांच्या पावसाळी वाड्यांपेक्षां ज्यास्त वस्ती नव्हतीच. नुसतें निगडीचें जंगल माजलेलें! तथापि हें जंगल तुडवीत कित्येक एतद्देशीय लोक तर येतच पण कित्येक वरिष्ठ युरोपिअन अंमलदारही येत. सर रिचर्ड टेंपल हे मुंबईचे गव्हर्नर असतां किल्ला पहावयास आले. ह्या प्रसंगाचें सुरस वर्णन पुढें २० वर्षांनीं " माझ्या टिपण वहींतील सुटीं पानें " ह्या शिर्षकाखालीं ए. टी. सी. या सहीनें टाइम्समध्यें प्रसिद्ध झालें आहे. टेंपल साहेब गव्हर्नर असतां सुप्रसिद्ध क्रॉफर्ड साहेब रेव्हेन्यु कमिशनर होते. रायगडावर टेंपल साहेबाबरोबर क्रॉफर्ड साहेब, डॉ. वाटर्स व कॅ. पिट हे गेले होते. क्रॉफर्ड लिहितात " रायगडावर गेल्यावर टेंपल साहेब समाधीवर चढले तेव्हां त्यांना इतकी स्फूर्ती झाली कीं, आपल्या कल्पनाशक्तीची भरारी दोनशें वर्षे मागें नेऊन शिवाजीच्या दरबारचें काव्यमय वर्णन त्यांनीं केलें. नंतर शिवाजीच्या मरणोत्तर रायगडावर झालेल्या अनन्वित प्रकाराचें वर्णन करून टेंपल साहेब म्हणाले ' वरील दोन देखाव्यांचीं चित्रें जगांतील इकडे येणाऱ्या चित्रकारांनीं अवश्य काढावीं. मात्र " गस्ताव दोरे " या चित्रकाराशिवाय इतर कोणास हीं चित्रें काढणें साधेल असें मला वाटत नाहीं. ह्या प्रसंगीं खुद्द टेंपल साहेबांनीं रायगडावरील देखाव्याचीं अनेक चित्रें पेन्सिलीनें काढून घेतलीं. जातांना रायगडच्या व समाधीच्या दुरुस्तीकडे पूर्णपणें लक्ष ठेवण्याविषयीं बजावून व तुमच्या जिल्ह्यांत असणाऱ्या ह्या इतिहास प्रसिद्ध स्थळाची

दुरुस्ती ठेवण्याकडे तुम्ही कां लक्ष पुरविलें नाहीं अशा अर्थाचें कुलाबाच्या कलेक्टरास एक कडक पत्र लिहिलें!

४. पुढें टेंपल साहेबांच्या हुकुमाचा आधार घेऊन कु. जि. जंगल अधिकाऱ्यानें मुंबई सरकारकडे समाधीच्या दुरुस्तीसाठीं कांहीं रक्कम मागितली; हें जाहीर झाल्यामुळें पुन्हां रायगडाबद्दल चर्चा सुरु झाली. डग्लस साहेबांनीं मुंबई इलाख्यासंबंधानें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत समाधीच्या दुःस्थितीचा उल्लेख होता. तसेंच गोविंद बाबाजी जोशी वसईकर, ग्रंथकार यांनीं स्वतः रायगडची स्थिती पाहून रायगडविषयक एक पुस्तक लिहिलें. डग्लस साहेबांनीं आपल्या पुस्तकांत शिवाजीची समाधी आजवर अशा दुःस्थितींत राहू दिल्याबद्दल महाराष्ट्रीयांना दोष दिला. जोशी यांच्या मनाला ही गोष्ट लागली. डग्लस साहेबांनीं कोल्हापूर व सातारा येथील छत्रपतीच्या वंशजांस व पेशव्यांच्या संस्थानिक सरदारांसही दोष दिला.

जोशी यांनीं के. जनार्दन नांवाच्या एका शिल्पज्ञ इंजिनियरास रायगडावर धाडून समाधीवर छत्री बांधण्यास लागणाऱ्या खर्चाचें अंदाजपत्रक तयार करविलें. या छत्री बांधण्यास लागणाऱ्या खर्चाचा अंदाजी आंकडा ४५०४६ रु. होता. रायगडावरून परत येतांच जोशी यांनीं मुंबईच्या 'नेटिव्ह ओपीनियन' वगैरे पत्रांतून याच सालीं लेख लिहिले. इतक्यांत "लॉर्ड रे यांनीं समाधीच्या जीर्णोद्धाराचें काम सरकारांतून व्हावें अशी शिफारस केली आहे" अशी बातमी प्रसिद्ध झाली. शिवाय दरसाल पांच रुपयांची समाधीच्या किरकोळ दुरुस्तीला मंजुरी मिळाली! पण पुढें सार्वजनिक प्रयत्न थांबल्यासारखा झाला. कांहीं किरकोळ वर्गण्यांचीं पोंच वर्तमानपत्रांतून क्वचित् आढळून येतें. या चळवळीला चांगलें स्वरूप येण्यास आणखीं दहा वर्षांचा काळ जावा लागला!

५. सन १८९५ च्या एप्रिल महिन्याच्या अखेरीस लोकमान्य टिळकांनीं शिवस्मारकाबद्दल लेख लिहिण्यास सुरुवात केली. लोकमान्य लिहितात "मराठ्यांचे हितशत्रु लॉर्ड हॅरिस साहेब हे देखील शिवाजीच्या पराक्रमाचें वर्णन करीत असतात. त्यांचे वंशज व सरदार हें स्मारकाची कांहींच खटपट करीत नाहीं. त्या अर्थी त्यांचें जिणें व्यर्थ होय" डग्लस

साहेबांनीं समाधीच्या दुस्थितीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें होतें. "समाधीचा अंतर्भाग झाडाझुडुपांनीं व्याप्त केला आहे. धर्मशाळेच्या फरसबंदींतून मोठाले वृक्ष उगवले आहेत. देवालयाची धाण झाली असून त्यांतील मूर्ति जमिनीवर फेकून दिली आहे." सिंक्लेअर साहेबांच्या शिफारशीवरून मुंबईसरकारनें सालीना ५ रुपये मंजूर केले. ते, इंग्रज परकीय हें लक्षांत घेतां पुष्कळच होत. पण संस्थानिकांनीं व सामान्य लोकांनीं ढिलाई सोडून जागोजाग सभा भरवून फंड जमा करण्याची तजवीज करून जगास आपली कृतज्ञता दाखविली पाहिजे"

पण या पूर्वीच स्मारकासाठीं वर्गणी जमविण्यास सुरवात झाली होती. महाड रायगड जवळच असल्यामुळें तेथील लोकांनीं पुढील सालापासून खुद्द रायगडावर जाऊन शिवाजी उत्सव साजरा करण्याचा बेत प्रसिद्ध केला. याच वेळीं लो. टिळकांनीं स्मारकासंबंधीं कमेटी नेमल्याचें केसरींत जाहीर केले. तारीख १४ मे च्या अंकांत एका प्रवाशानें रायगडावर काय काय सोई केल्या पाहिजेत याची माहिती दिली. दुसऱ्या एका गृहस्थानें श्री. बाबासाहेब इचलकरंजीकर यांचे जवळ गोष्ट काढतांच त्यांनीं सालिना १०० रुपये उत्पन्नाची व्यवस्था समाधीकरतां करून देण्याचें कबूल केलें. असें जाहीर केलें.

६. तारीख ३० मे रोजी सायंकाळीं हिराबागेच्या मैदानांत स्मारकाप्रीत्यर्थ टोलेजंग सभा भरली. सभेस सरदार, जहागिरदारही हजर होते. ती सभा म्हणजे दरबारच वांटला. सरकारी दरबारात न होणारी गोष्ट म्हणजे सरदार लोकांचीं सभेंत भाषणें झालीं. उच्चस्थानीं चाफळचे स्वामी बसले होते. प्रारंभी सेनापति दाभाडे यांनीं लो. टिळकांच्या व आपल्या सहीनें निघालेली निमंत्रणपत्रिका वाचून दाखविली. श्री पंतप्रतिनिधी यांस अध्यक्ष नेमलें. या सभेस न्या. रानडे यांचेकडून संमतिदर्शक तार आली होती तींत न्यायमूर्ती रानड्यांनीं कायमचा फंड उभारण्याची कल्पना सुचविली होती. ती बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं १८८५ ची व हल्लीची ही चळवळ एकच आहे असें सांगून सर्वांना मदत करण्यासंबंधींचा पहिला ठराव मांडला त्याला डॉ. विश्राम, वॅ. गाडगीळ, स. पोतनीस, जोगळेकर यांनीं

अनुमोदन दिले. पोतनीस यांनीं महत्त्वाची माहिती सांगितली कीं, "मराठेशाहींत समाधीच्या उत्सवासाठीं दरसाल मोठी रक्कम पडत असे, हें आमच्याकडील ऐतिहासिक कागदपत्रावरून सिद्ध होतें." ठराव दुसरा बाळासाहेब कुरुंदवाडकर यांनीं पुढें मांडला. तो कमिटी नेमण्यासंबंधींचा होता. कमिटींत ५०–५५ गृहस्थांचीं नांवें चाफळकर स्वामीपासून सामान्य व्यापाऱ्यांपर्यंत घातलीं होतीं. खजिनदार बाळासाहेब नातू व सेनापति दाभाडे, बाळासाहेब इचलकरंजीकर व लो. टिळक असें कार्यकारीमंडळ नेमण्यांत आलें. या सभेंतील विशेष महत्त्वाची गोष्ट अबदुल रझाक बिझली, वांईकर या सभेंतील गृहस्थांनीं कमिटीच्या ठरावास संमति दिली. नंतर लो. टिळकांनीं आपल्या भाषणांत सांगितलें कीं "कोल्हापुरच्या महाराजांनीं मनावर घेतल्यास ते एकटेच समाधीची दुरुस्ती करूं शकतील पण सर्व दर्ज्यांच्या व सर्व जातींच्या लोकांकडून पै पैशापासून वर्गणी गोळा होऊन त्या द्रव्यानें शिवरायाच्या समाधीचा जीर्णोद्धार व्हावा अशी सर्वांची इच्छा आहे." शेवटीं कोल्हापुरच्या छत्रपती महाराजांकडे या बाबतींत शिष्टमंडळ पाठविण्याचें ठरलें. इतक्यांत त्यांचेकडून सभेस सहानुभूतीचा संदेश आला. या सभेनंतर महाराष्ट्रांत रायगडावरील शिवस्मारकाबद्दल बरीच चळवळ सुरू झाली. समाधीवर छत्री बांधून उत्सव सुरू करण्यास चाळीस हजारावर रुपये लागतील आणि पुतळा उभारावयाचा असला तर १००००० रुपये लागतील म्हणून कमिटीनें ज्या मानानें वर्गणी जमेल त्या मानानें काम करावें असें ठरविलें. कोल्हापुरचे रीजंट आबासाहेब घाटगे यांनीं मुद्दाम रायगडावर मनुष्य पाठवून छत्रीस लागणाऱ्या खर्चाचा अंदाज केला. सुमारें २५००० रुपये खर्च लागेल असा अंदाज झाला. सयाजीराव महाराजांकडून १००० रुपये रोख वर्गणी आली.

७. शिवाजी स्मारकाची चळवळ लो. टिळकांनीं हातीं घेतांच टाइम्स वगैरे सरकारच्या कच्छपीं लागणाऱ्या पत्रांनीं त्याविरुद्ध कोल्हेकुई माजविली. कित्येक देशद्रोही स्वजनांनीं सुद्धां या चळवळीवर "ब्राह्मणी कावा" म्हणून आग पाखडण्यास सुरवात केली. या टीकेला प्रत्युत्तरेंही मिळालीं. मुंबईस सभा भरून कमिटी नेमण्यांत आली. श्री. शंकराचार्य यांनीं १० रुपये

समाधीला वर्षासन नेमून दिलें. फर्ग्युसन कॉलेजमध्यें याच विषयाच्या विचारा-साठीं प्रो. भानूंचे अध्यक्षतेखालीं सभा भरली. कोल्हापूरच्या छत्रपतीकडे ता. २६ आगष्ट रोजीं हिराबागेंत ठरल्याप्रमाणें डेप्युटेशन गेलें. लो. टिळक डेप्युटेशनचे चिटणीस होते. कोल्हापुरास डेप्युटेशनचा सत्कार चांगलाच झाला. "आपल्या इतर पूर्वजांच्या छत्र्याप्रमाणेंच रायगडावरील छत्रीचीही आपण व्यवस्था करूं व अंदाज ठरेल त्याप्रमाणें वार्षिक देणगीची रक्कम मागाहून जाहीर करूं." असें छत्रपतीनीं कळविलें. पुढें पुण्याच्या राष्ट्रीय सभेच्या ऐन धांदलींत रे मार्केटच्या विस्तीर्ण मैदानांत राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष श्री. बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं लो. टिळकांनीं शिवस्मारकासंबंधी जाहीर सभा भरली. मैदान गर्दीनें फुलून गेले होतें. शिवाजी महाराजांची तसबीर एका रेशमी दोरीनें झाडाला लटकावून दिलेली होती. अशाप्रसंगीं सुरेंद्रबाबू व पंडित मालवीय अशा वक्त्यांचीं किती स्फूर्तिदायक भाषणें झालीं असतील ? लो. टिळकांचे स्नेही, महाडकर ज्योतिषी व बाबाजी काशिनाथ पटवर्धन यांनीं चालू सालीं ( सन १८९६ ) रायगडावर वैशाख शु॥ २ स आपण मोठा उत्सव करणार आहों असें प्रसिद्ध करून सर्व लोकांकडून उत्सवास मदत मागितली. या उत्सवाचे मूळाशीं लो. टिळकांचे प्रयत्नच प्रमुख होते, व उत्सवाचा कार्यभारही त्यांनींच आपल्या अंगावर घेतला हाच रायगडावरील पहिला उत्सव होय. हा उत्सव स्मारक-फंड कमिटीचे मार्फत साजरा करण्यात येणार नव्हता; तर महाडकर मंडळी वेगळाच फंड जमवून मोठ्या प्रमाणावर उत्सव करणार होती. ता ३ मार्चच्या केसरींत उत्सवाचे नियम प्रसिद्ध करण्यांत आले. (१)सर्वांस प्रसादाचें भोजन दिलें जाईल.(२) उत्सवास लागणारें सर्व सामान देशीच वापरलें जाईल.(३) कथा, नाटकें, गोंधळ, पोवाडे यांत चांगलें शिववर्णन असेल तर त्यांना या नव्या संस्थेचे मानकरी समजून मानाचे नारळ देण्यांत येतील. याच वेळेला शिवस्मारकाची रक्कम १६००० रुपये जमल्याचें प्रसिद्ध झालें.

रायगडावरील त्या आधुनिक महोत्सवाची तारीख २५ एप्रील ठरली.

उत्सवाला 'प्रथमग्रासे मक्षिकापात' झाला. रायगड हा सरकारी जंगलाच्या हद्दींत असल्यामुळें जंगलखात्याची परवानगी मागितली व ती मिळाली. पण रेव्हिन्यू खात्याकडून उत्सवाला अडथळा आला. लँब साहेब कुलाब्याचे कलेक्टर होते, त्यांनीं या उत्सवाला जत्रांचा कायदा लागतो असें ठरवून अर्ज मुदतींत नाहीं या सबबीवर परवानगी नाकारली. उत्सवासाठीं लोक तर जमूं लागले व परवानगीचें खेकटें आयत्यावेळीं पुढें आलें. तेव्हां लो. टिळक महाबळेश्वरास खुद्द गव्हर्नर साहेबापर्यंत गाऱ्हाणें घेऊन गेले. लो. टिळक हे कायदे कौन्सिलचे सभासद; तेव्हां असल्या साध्या गोष्टींत टिळकांना नाखूष करणें सरकारच्या जिवावर आलें. एकदांची परवानगी आली ! परवानगीसाठीं किती त्रास सोसावा लागला हें टिळकाना माहित झाल्यामुळें उत्सवांत शक्य तितका नेमस्तपणा राखावा अशी विनंति टिळकांनीं लोकांना केली. लोकमान्य महाबळेश्वरीं परवानगी मिळवून महाडावरून रायगडास गेले. गेल्या १००–१५० वर्षांत नसेल इतकी गर्दी रायगडावर जमली. रायगडचा तो उंच चढाव, खडकाळ रस्ता व महाडापासून बारा मैल अंतर अशा स्थितींत एवढा मोठा उत्सव रायगडावर साजरा करणें किती श्रमाचें झालें असेल ?

## रायगडावरील पहिला उत्सव.

८. तारीख १४ पासून गडावर माणसें जमूं लागलीं. बाराही मावळांतले मावळे प्रतिनिधी आले होते. किल्ल्यावरील नगारखान्याचा चौक, राजदरबारचा दिवाणखाना, दारूखान्याचें कोठार, जगदीश्वराचें व शिरकाईचें देवालय वगैरे सर्व ठिकाणें माणसांनीं गजबजून गेलीं. देवळें, टांकीं व डबकीं स्वच्छ करण्यांत आलीं. गंगासागर बराचसा स्वच्छ करण्यांत येऊन मुख्य भागांतले कांटे काढून टाकण्यांत आले. सभेच्या जागीं तट्टयांचा मांडव घालून तोरण उभारण्यांत आलें होतें. सिंहासनाच्या जागेवर शिवाजी व रामदास यांच्या तसबिरी गाद्या घालून त्यावर मांडल्या. सकाळीं कै. विनायकशास्त्री अभ्यंकर यांचें कीर्तन झालें. नंतर मेळ्यांचीं पदें झालीं. दुपारीं गंगासागरावर सर्वांना प्रसादाचें भोजन मिळालें. सायंकाळीं पांच वाजतां समारंभ भरावयास सुरुवात झाली. मेळ्यांचीं पदें

झाल्यावर ना. बा. कानिटकर, कै. प्रो. शि. म. परांजपे व दापोलीचे गोगटे यांचीं ऐतिहासिक विवेचनपर भाषणें झालीं. शेवटीं लो. टिळकांचें समारोपादाखल भाषण होऊन "आपण आपल्या स्वराज्य-संस्थापकाचें स्मारक करण्यांत राजनिष्ठेचा मागमूसही नाहीं, असें त्यांनीं सांगितलें. नंतर पोवाडे म्हणण्यांत येऊन मध्यरात्रीं वाजत गाजत जगदीश्वराचे देवळापासून छबिना काढण्यांत आला.

ह्या प्रसंगीं रायगडच्या इतिहासाची बरीच उजळणी झाली. महाराष्ट्रीयांच्या रायगडाचें गतवैभव उभे राहून मनःचक्षूंसमोर आपण कोण होतों याचा वस्तुदर्शनानें धडा मिळाला. दुसरे दिवशीं समाराधनेनंतर तान्हाजी मालुसरे, येसाजी कंक वगैरे ऐतिहासिक वीरांच्या वंशजांना व कार्यकर्त्यांना मानाचे नारळ देण्यांत आले. स्वयंसेवकांनाही नारळ देऊन गौरविण्यांत आलें. स्वराज्य नष्ट झाल्यापासून आजच रायगडावर प्रथम हा राजशाही थाटाचा समारंभ झाला.

ह्या उत्सवास कित्येक सुधारकांनीं व अँग्लो इंडियन पत्रकारांनीं नांवें ठेविलीं. शिवाजी महाराजांचा झालेला गौरव त्या दिवाभीतांस पाहवला नाहीं. स्मारकाच्या वर्गणीचेंही काम रोडावलें. पुढच्याच वर्षी लो. टिळकांवर राजद्रोहाचा खटला झाला. राजद्रोही ठरलेले लेख मुख्यतः शिवाजी उत्सवाबद्दलचे होते. अर्थात् लोकांच्या मनाला त्यांतल्या त्यांत संस्थानिकांच्या मनाला तर हें शिव-स्मारक फारच वावडें वाटूं लागलें. जमलेले पैसे मात्र बँकेंत कमेटीच्या मार्फत ठेविले होते.

९. स्मारकाच्या प्रयत्नांचा पुढील इतिहास. कै. ना. दाजी आबाजी खरे यांना उत्सवमंडळाचे अध्यक्ष करून लो. टिळकांनीं सरकार दरबारीं खटपट १९०६ सालींच सुरू केली होती. व तिला थोडेंबहुत यशहि आलें होतें. तें असें कीं, ना. खरे यांनीं महाड येथून सन १९०६ चे एप्रील महिन्यांत सरकारकडे रीतसर अर्ज करून स्मारकासंबंधीं आपली योजना सरकारास कळविली. आणि पुढील सालीं सरकारी ठराव नं. ४४५४ ता. २ मे १९०७ रोजीं निघून सरकारनें या स्मारकाच्या कार्यास सर्वसामान्यपणें सहानुभूति व विशेषेंकरून ५००० रुपयांची मदत देण्याचा विचार ठरवून जाहीर केला.

परंतु पुढील सालीं लो. टिळक यांजवर खटला व शिक्षा होऊन त्यांची रवानगी मंडाले येथें झाली. फिरून १९११ सालीं जेव्हां नामदार खरे यांनीं सरकारकडे चौकशी केली. तेव्हां त्यांना असें सांगण्यांत आलें कीं,कबूल केलेली मदत देण्यास सरकार अजूनही तयार आहे. परंतु नकाशे, अंदाज-पत्रक व स्मारकाचें प्रत्यक्ष काम सरकारमार्फतच झालें पाहिजे. ही नवीन अडचण लक्षांत घेऊन नामदार खरे यांनीं या पुढील कार्य लो. टिळक बंधमुक्त होऊन परत येईपर्यंत तहकूब ठेवलें. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें टिळक आल्यावरही प्रथम त्यांचीं इतर व्यवधानें आड आलीं. टिळकासंबंधीं सरकारची दृष्टी त्यांच्या बंधमुक्ततेनंतरही कलुषितच राहिलेली होती. आणि पुढें तर डेक्कन बँक बुडाल्यामुळें स्मारकाला लागणारा स्मारकमंडळाचा सर्व पैसाहि घोटाळ्यांत पडला. पुढें लो. टिळक हे विलायतेस गेले व परत आल्यानंतर थोडे दिवसांत मृत्यु पावले. तात्पर्य या सर्व कारणांमुळें स्मारकाची योजना पूर्ण होऊन अंमलांत येण्यास विलंब झाला. ता. १ मे सन १९०६ च्या केसरीमध्यें त्या सालच्या उत्सवासंबंधानें लिहितांना लो. टिळक यांनीं असे उद्गार काढले होते कीं " शिवाजी महाराजांच्या जीर्णोद्धाराचें राष्ट्रीय कार्य पुरें होऊन रायगडावरील चवथा महोत्सव दुरुस्त केलेल्या जगदीश्वराच्या विस्तीर्ण देवालयांत शिवरायांच्या छत्रीसमोर साजरा होण्याची वेळ लौकरच येवो. "

"परंतु जगदीश्वराच्या देवळाच्या दुरुस्तीचें काम अद्यापि व्हावयाचें आहे. आज जरी त्याची कांहीं योजना लोकांपुढें नाहीं, तरी कार्यानें कार्य वाढतें. या रीतीनें समाधीच्या जीर्णोद्धाराच्या कार्यानंतर हें दुसरें कार्यही हातीं घेण्यास स्मारक–मंडळास सहजच उत्तेजन येईल आणि देवळाच्या जीर्णोद्धाराचें कार्य हें आपल्या देशांतील लोकांच्या धर्मबुद्धीला विशेष रीतीनें पटणारें असल्यामुळें पुढें मागें कोणी एखादा धनिक स्मारकमंडळाच्या प्रोत्साहनानें किंवा स्वतंत्रस्फूर्तीनें पुढें येऊन हें कार्य कां करणार नाहीं ? देवळाचे जीर्णोद्धाराशिवाय इतरही कांहीं गोष्टी प्रवाशांच्या सोईकरतां म्हणून गडावर व्हावयास पाहिजेत. त्यांतील मुख्य म्हटलें म्हणजे धर्मशाळा किंवा विश्रांतिगृह हें होय. सुदैवानें कुलाबा जिल्हाबोर्डाला या कामीं स्वतंत्रपणें

सतस्फूर्ती होऊन तिनें आरंभिलेल्या धर्मशाळेचें झालेलें निम्मे शिम्मे काम आपणांस पहावयास सांपडलेंच आहे. आणि या कार्यास लागणारें द्रव्य-सहाय्य वर्गणीनें गोळा करण्याची खटपट सुरू असल्यानें तेंही कार्य लौकरच पुरें होईल अशी आशा वाटत आहे. धर्मशाळेशिवाय तलावाच्या दुरुस्तीची व्यवस्था तसेंच पाचाड येथील मैदानांत प्रवाशांच्या मुक्कामाची व्यवस्था व रायगडचे पायथ्यापर्यंत येणाऱ्या सार्वजनिक मार्गाची सुव्यवस्था वगैरे लोकोपयोगी कामेंही व्हावयाचीं आहेत. पण तींही सरकार, स्मारक मंडळ, जिल्हा लोकलबोर्ड व सर्वसामान्य जनता यांच्या परस्पर साहाय्यानें पुढें मागें लौकरच पुरीं होतील आणि रायगड व श्री शिवाजीमहाराजांची समाधी यांचें दर्शन घेणाऱ्या शिवभक्तांचा प्रवास व वसति सुलभ, व सुखाची होईल अशी चांगली व्यवस्था दिवसेंदिवस अधिकाधिक होईल अशी आशा वाटत आहे."

## एक जुना प्रयत्न.

१०. केसरी मंगळवार ता. २० माहे एप्रील सन १९२६ इसवी मधील रा. ब. पु. बा. जोशी यांचा समाधीवरील छत्रीबद्दलच्या जुन्या प्रयत्नांचा इतिहास. "समाधीच्या जीर्णोद्धारासंबंधी पहिली सूचना व विनंति ४० वर्षांपूर्वी "समाधी शतकावली" या काव्याच्या रूपानें प्रस्तुत लेखकानें महाराष्ट्र जनतेपुढें आणली होती. मुंबई गॅझेटीयरकरितां ठाणें व कुलाबा जिल्ह्यांतल्या ऐतिहासिक व प्रेक्षणीय स्थळांच्या वर्णनासाठीं संशोधन कार्य करीत असतां शिवसमाधीची शोचनीय स्थिती आमच्या निदर्शनास आली, व त्यासंबंधानें 'टाईम्स ऑफ इंडिया'मध्यें एक पत्र लिहून जीर्णोद्धाराची आवश्यकता आम्हीं जनतेपुढें मांडली. त्यावेळीं त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें इ.स. १८८५ सालीं वरील 'समाधी शतकावली' ह्या नांवाचें मराठींत काव्य लिहून त्याच्या द्वारें रायगडावरील समाधीच्या जीर्णोद्धाराची व शिवस्मारकाची आवश्यकता महाराष्ट्र जनतेच्या निदर्शनास फिरून एकदां आणली. या काव्यांत न्या. रानडे, कुंटे, तेलंग इत्यादि लोकाग्रणींस, महाराष्ट्रांतील संस्थानिकांस, कोल्हापूरचे रीजंट आबासाहेब घाटगे यांस व विशेषतः केसरीकारांस हें कार्य हातीं घ्यावें म्हणून सविनय प्रार्थना केली होती. तेलंग यांनीं सहानु-

भूतिपर पत्र पाठवून आपली सहानुभुति दर्शविली. रा. सा. रानडे यांनीं सप्रेम पत्र लिहून आम्हांस पुण्यास येऊन भेटण्याची सूचना केली. त्याप्रमाणें प्रस्तुत लेखक पुण्यास गेले होते. रा. सा. रानडे यांचे घरीं नीळकंठराव कीर्तने व इतरही पुण्यांतील एक दोन पुढारी यांचा या कार्याकरितां हिराबागेंत एक जंगी सभा भरवावी असा विचार ठरला. त्यानंतर थोड्या अवधीनें हिराबागेंत एक जंगी सभा भरून आमचें 'समाधी शतकावली'हें काव्य सभेपुढें वाचण्यांत आलें व फंड गोळा करण्याकरितां कमिटीची योजनाही झाली. सरकारची परवानगी न मिळाल्यानें या सभेस प्रस्तुत लेखकास हजर राहतां आलें नाहीं. मध्यंतरीं म्हणजे रावसाहेबांची पहिली भेट घेऊन मुंबईस आपल्यावर समाधीच्या कार्यासाठीं अनेक दिशेनें आम्ही प्रयत्न चालविले होते. याच सुमारास कोल्हापूरचे रीजंट आबासाहेब घाटगे हे मुंबईचे गव्हर्नर फर्ग्युसन याच्याबरोबर विलायतेस जाण्याकरितां आले होते. त्यावेळीं त्यांची भेट घेऊन समाधीची शोचनीय स्थिती त्यांच्या निदर्शनास आणून समाधीच्या जीर्णोद्धाराचें काम हातीं घ्यावें म्हणन त्यांना विनंति केली. विलायतेहून आल्यानंतर तें काम आनंदानें हातीं घेण्याचें त्यांनीं आम्हांस आश्वासन दिलें आणि आबासाहेब सूज्ञ व उदार असल्यामुळें शिवाजी स्मारकाचे कार्यास त्यांनीं मनःपूर्वक सहाय्य केलें असतें असें आम्हांस वाटतें. परंतु मध्यंतरीं एक गोष्ट घडली त्यामुळें त्यांचें मन साशंक झालें असावें असें वाटतें. ती गोष्ट ही. प्रस्तुत लेखक सर जॉर्ज फॉरेस्ट यांनीं मुंबई सरकारतर्फे प्रसिद्ध केलेल्या Selections from State Papers Maratha Series Vol. 1st या पुस्तकांत शिवाजीच्या रायगडावरील बखरीचें भाषांतर अग्रभागीं दिलें आहे. त्यांत खालील प्रमाणें थोडासा मजकूर आढळतो. "When Shiwaji went to take half his share of chandi chandawar in the year of Shalivahan 1595 [A. D. 1673] the Goddes Bhawani came into his body and remained there five hours, during which time she gave him a view of future events, viz. that his dominion would fall into the hands of the people with red faces; that Smbhaji would be taken prisoner

by the Moghals; that Rajaram would succeed him on the masnad; that Shivaji would in the course of time, come into the world again under a new form and extend his dominion to Delhi for 27 Generations."

( जेव्हां शिवाजी शके १५९५ ( इ. स. १६७३ ) मध्यें चंदी चंदावरला आपला अर्धा हिस्सा मागण्यास गेला होता तेव्हां त्याच्या अंगांत तेथें भवानी देवी संचरली. ती ५ तास पर्यंत त्याच्या अंगांत होती. तिनें त्या अवधींत त्याला पुढील भविष्य कथन केलें. तें हें कीं, त्याचें राज्य ताम्र लोकांच्या हातांत जाईल; संभाजीला मोंगल कैद करतील; राजाराम संभाजीची गादी जिंकील; आणि शिवाजी या जगांत पुन्हां अवतीर्ण होऊन तो आपलें राज्य दिल्लीपर्यंत वाढवील व तें २७ पिढ्या होईतों टिकेल. )

रायगड संबंधीच्या भाषांतराच्या प्रुफाची एक प्रत सर जॉर्ज फॉरेस्ट यांनीं गव्हर्नर फर्ग्युसन यांस व प्रस्तुत लेखकानें दुसरी प्रत आबासाहेब घाटगे यांस अवलोकनार्थ दिली होती. भाषांतराच्या प्रुफाच्या पृष्ठभागावर असलेला वरील मजकूर गव्हर्नर साहेबांस राजकीय अस्वस्थता उत्पन्न करणारा आहे असें वाटून त्यांनीं एडनहून त्यावेळचे ॲक्टिंग गव्हर्नर सर मॅक्स्वेल मेलविल यांस त्याच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं तार केली! ज्याअर्थी ही बखर आमच्या आग्रहास व विनंतीस मान देऊन कांहीं फेरफार न करितां सर जॉर्ज फॉरेस्ट यांनीं मुंबई सरकारतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या Selections from State Papers, Maratha Series Vol. 1st. ह्या पुस्तकाच्या अग्रभागीं घातली होती त्याअर्थी त्यांतील विषयाच्या पात्रापात्रतेसंबंधीं जबाबदारी आमच्यावर होती व याच करितां आम्हांस व सर जॉर्ज फॉरेस्ट यांस जाब विचारला असतां स्पष्टीकरण करणें जरूर होतें. परंतु समाधानाची गोष्ट ही कीं, सर मॅक्स्वेल मेलविल व पील यांच्या अवलोकनांत हा विषय पूर्वीच आला होता. यामुळें आमचें स्पष्टीकरण जाण्यापूर्वीच सर मेलविल यांनीं त्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेऊन त्यांतील सर जे. फर्ग्युसन यांना आक्षेपार्ह वाटलेलें विधान अस्वस्थता उत्पन्न करणारें नसून ऐतिहासिक सत्य आहे म्हणून तें छापण्यास परवानगी दिली. आबासाहेब व गव्हर्नर फर्ग्युसन साहेब इंग्लंडला जातांना एकाच बोटींत

असल्यामुळें शिवाजीच्या भविष्यासंबंधीं त्यांचेमध्यें चर्चा झाली असावी; व गव्हर्नरास तें अराजकतेचें व अस्वस्थता उत्पन्न करणारें आहे असें वाटल्यामुळें आबासाहेबांचेंही मन जीर्णोद्धारासंबंधीं साशंक झालें असावें. ही गोष्ट पुढें आमच्या प्रत्ययासही आली. आबासाहेब विलायतेहून परत आल्यानंतर शिवाजीच्या जीर्णोद्धाराचें काम हातीं घेण्यास त्यांना मी पुन्हां विनंति केली पण त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं.

फर्ग्युसन यांच्या मागून लॉर्ड रे हे मुंबईचे गव्हर्नर झाले. त्यांसही पत्र लिहून समाधीचें कार्य हातीं घ्यावें म्हणून विनंति केली व याचा विचार होईल असा त्यांच्याकडून जबाबही आला. पुढें कांहीं काळ लोटल्यावर कुलाब्याचे कलेक्टर मि. सिंक्लेअर यांनीं आम्हांस कळविलें कीं, रायगडावरील समाधीची स्थिति सरकारनें ( पी. डब्ल्यू. डी. ) खात्याच्या नजरेस आणली आहे व त्यांच्याकडून योग्य ती व्यवस्था होईल. रायगड व त्याच्या आसमंतांतील जागाही राखून ठेवलेल्या जंगलाच्या हद्दींत असल्यामुळें बहुजनसमाजास तेथें सार्वजनिक उत्सवास परवानगी देणें इष्ट होणार नाहीं.

आपलें वास्तव्य पुण्यास असल्यामुळें रा. रा. रानडे यांच्या कमेटीनें काय केलें हें आपणांस अवगत असेलच. लो. टिळक यांनीं १८९९ या वर्षी म्हणजे पहिली सभा झाल्यानंतर दहा वर्षांनीं हें कार्य आपल्या हातीं घेतलें व तें आज त्यांच्या आपल्या व इतर मित्रांच्या परिश्रमानें पूर्णतेस येत आहे हें पाहून आम्हांस अतिशयच आनंद होत आहे. ह्या कार्यासाठीं केसरीकारांनीं व महाराष्ट्रांतील ज्या देशाभिमानी सद्गृहस्थांनीं मनोभावानें सहाय्य केलें त्यांची महाराष्ट्र जनता ऋणी राहील.

## रायगडावरील दुसरा उत्सव

११. लो. टिळक तुरुंगांतून सुटून आल्यावर पुन्हां रायगड येथें शिव–जन्मोत्सव करण्याचें ठरलें. त्याप्रमाणें २३ एप्रिल सोमवार चैत्र वद्य ९ शके १८२२ ही तिथी शिवाजीफंड कमिटीकडून ठरविण्यांत आली. वास्तविक ही तिथी जन्मदिनाची पण नव्हे व राज्याभिषेक दिनाची पण नव्हे. परंतु उत्सवास सोईस्कर म्हणून धरिली होती. रायगडच्या आसपास

महाड, बोरवाडी, बिरवाडी येथील स्वयंसेवक गोळा करण्यांत आले, निमंत्रणें वगैरे पाठविलीं. पांढरपेशे ५००।६०० व मावळे वगैरे मिळून मोठा जमाव रायगडावर जमला होता. सोमवारीं सकाळपासून कार्यक्रमास सुरवात झाली. कै. विनायकशास्त्री अभ्यंकर यांचें कीर्तन, मेळ्यांचे कार्यक्रम, आरती वगैरे होऊन प्रसादाच्या पंक्तीस सुरवात झाली. प्रसादाचा बेत साधा, सार भात हाच होता. पण तोही मंडळींना फार गोड वाटला. पुणेंकर पाहुणे मंडळीही स्वयंसेवकांसमवेत गंगासागराचें पाणी भरणें, पंक्ति वाढणें वगैरे कामांत भाग घेत होती. रात्रीं फिरून कार्यक्रमास आरंभ झाला. राजवाड्यापासून महादेवाचे देवळापर्यंत पालखीचा छबिना, नळे चंद्रज्योति, वाजंत्री, भजनी मेळे यांच्यासह निघाला. जगदीश्वराचे देवालयाला प्रदक्षिणा घालून पालखी राजवाड्यांत आली. तेथें गोंधळ्यांचे पोवाडे झाल्यावर लो. टिळकांनीं स्मारकाच्या रकमेचा जमाखर्च सांगितला, व समाधीच्या दुरुस्तीप्रीत्यर्थ काय तजवीज केली आहे हेंही सांगून लवकरच त्या कामास सुरुवात होईल असें आश्वासन दिलें. नंतर आरती प्रसाद होऊन पहाटे दोन अडीच वाजतां उत्सव समाप्त झाला. लो. टिळकांनीं आपल्या भाषणांत उत्सवाच्या हेतुसंबंधानें जरी फारशी चर्चा केली नव्हती तरी "इतके खटले वगैरे झाले असतां हा उत्सव इतक्या थाटानें होत आहे. यावरून लोकांची भावना अद्याप जागृत आहे. व सरकारनेंही उत्सवास प्रतिबंध केला नाहीं, यावरून सरकारचेंही मन साफ असावें" असें सांगितलें. सदर प्रसंगीं बंदोबस्तासाठीं पोलीस वगैरे पाठविण्यांत आले होते.

या उत्सवाचे पूर्वींच थोडे दिवस शिवजन्मतिथीसंबंधाचा वाद निघून त्यांनीं अनेक पुराव्यांनीं शके १५४९ वैशाख शु॥ १ गुरुवार उत्तररात्र अश्विनी नक्षत्र हा काल ठरविला !

## रायगडावरील तिसरा महोत्सव

१२. सन १९०६ च्या एप्रील महिन्यांत हा उत्सव करण्यांत आला. एकंदर समाज मागील १९०० सालापेक्षां कमी होता. तरी सरकारी बंदोबस्त भरपूर होता. या उत्सवाचें अध्यक्षस्थान कै. दाजी आबाजी खरे यांस दिलें होतें. कै. दाजीसाहेब यांच्या पत्नीही गडावर उत्सव प्रसंगीं

आल्या होत्या. कै. लोकमान्याबरोबर कै. शि. म. परांजपे, श्री. दत्तोपंत लिमये, श्री. भाऊसाहेब चौकर इ. इ. मंडळी गडावर गेली होती. यावेळीं सरकारची दृष्टी थोडी निवळली आहे असें वाटत होतें. म्हणून कायदे कौन्सिलचे सभासद दाजी साहेब खरे यांस अध्यक्ष करून त्यांचेमार्फत सरकारांत खटपट करून स्मारकास वर्गणी व इतर मदत मिळविण्याचा लोकमान्यांचा विचार होता. लॉर्ड कर्झन यांनीं पुराणवस्तु संरक्षणाचा कायदा केला होता. त्याअन्वयें समाधीच्या दुरुस्तीची सरकार आपण होऊन कांहीं तजवीज करील अशी आशा वाटत होती. उत्सवाचा कार्यक्रम मागील दोन उत्सवांप्रमाणेंच ठरविला होता. स्मारकफंडाचा हिशेब लो. टिळकांनीं वाचून दाखवून पैनपैचा मेळ दाखविला.

याच वेळीं शिवनेरीवर शिवजन्मस्थानीं सरकारनें एक त्यांच्या नांवाची पाटी लाविली. सारांश सरकारची दृष्टी बदलली आहे त्याचा फायदा घेऊन एकदांचें स्मारक उभारण्याची पर्वणी साधावी असा लो. टिळकांचा बेत होता. कै. दाजीसाहेब यांच्या अर्जावरून लॉर्ड लॅमिंगटन् हे स्वतः रायगडावर आले. वाटेंत त्यांस पावसानें फारच त्रास दिला. सर्व गड तशा पावसांत त्यांनीं स्वतः हिंडून पाहिला. नंतर त्यांनीं समाधीच्या दुरुस्तीला ५००० रु. आणि इतर सामानसुमान देण्याचा सरकारी ठराव काढला.

अशाप्रकारें तिसऱ्या उत्सवप्रसंगीं रायगडावरील शिवसमाधीवरील स्मारकाला सरकारची प्रत्यक्ष मदत मिळण्याचा संकल्प झाला.

## रायगड येथील चौथा महोत्सव.

(केसरी तारीख ६ माहे एप्रील १९२६ करून)

१३. शिवाजी स्मारक मंडळानें पूर्वी संकेत ठरवून प्रसिद्ध केल्याप्रमाणें चौथा महोत्सव शनिवार ता. ३ माहे एप्रिल १९२६ रोजीं रायगड येथें पार पडला. महाड येथें स्मारक–मंडळानें तात्पुरतें स्वागतमंडळ बनविलें होतें. उत्सवाकरितां लोक शुक्रवार पासून येऊं लागले. स्मा. मं. चि. श्री. न. चिं. केळकर कांहीं प्रतिनिधीसह शुक्रवारी सकाळीं गडावर आले. तत्पूर्वी भोजनगृहाची व सभेची मांडव घालून व्यवस्था ठेवण्यांत आली होती.

उत्सवाचे नियोजित अध्यक्ष श्रीमंत राजे लक्ष्मणराव भोंसले व डॉ. मुंजे शनिवारीं सकाळीं गडावर आले. छत्री पुरी झाली नसल्यामुळें छत्रीचा समारंभ कांहींच नव्हता. श्री. राजे लक्ष्मणराव यांनीं दोनप्रहरीं समाधीची यथाविधी वेदोक्त विधीनें पूजा केली. व लघुरुद्राचें उदक सोडून समाधीला उंची वस्त्रांचा अहेर केला. शनिवार सकाळीं महाड येथील शिल्पकार फडके यांनीं बनविलेल्या शिवाजी महाराजांचा अर्धपुतळा सिंहासन शिळेवर बसविला. व त्यावर आवासचे शिल्पकार करमरकर यांनीं केलेला ब्रॉन्झचा प्रतिमाफलक मांडण्यांत आला. मूर्तिला हार घातल्यावर वे. फडकेशास्त्री यांचें पुराण व प्रार्थनापद्यें झालीं. ह. भ. प. मुरूडकरबुवा यांचें कीर्तन झालें. बरोबर ११॥ वाजतां प्रसादाच्या समाराधनेस आरंभ झाला. पंक्तीवर पंक्ती उठत होत्या. जातगोत मनांत न आणितां सर्वांनीं प्रसादाचें अन्न पवित्र मानून आनंदानें खाल्लें. दुपारीं ४॥ वाजतां कुलाबा जिल्हा लो. बो. मार्फत बांधल्या जाणाऱ्या धर्मशाळेचा पायाचा दगड राजे लक्ष्मणराव भोंसले यांनीं बसविला. बोर्डाचे अध्यक्ष श्री. सितारामपंत टिळक यांनीं प्रास्ताविक भाषण केलें, "अशा राजधानीच्या जागीं यःकश्चित् दहावीस हजारांची छत्री किंवा दहावीस हजारांची धर्मशाळा बांधतांना बांधणाराच्या मनांत स्वतःविषयीं महत्त्वाची बुद्धि न येतां उलट स्वतःच्या क्षुद्रपणाची भावनाच अधिक प्रगट होते. तथापि पूर्ववैभवस्मरणाला जर पुराणवस्तुदर्शनाचें सहाय्य घेणें इष्ट तर ही क्षुद्रपणाची भावना मनांत दडपून टाकून समाधि रक्षणाकरितां छत्री व तिच्या दर्शनाला येणाऱ्या लोकांकरतां निवाऱ्याची धर्मशाळा अशा अनुषंगिक गोष्टीही इष्टच म्हणून त्यांचा उपक्रम होत आहे तो योग्य होय." नंतर राजेसाहेबांनीं रुप्याच्या सुंदर करणीनें चुना घातल्यावर कोनशीला बसविण्यांत आली. धर्मशाळेला १५१ रुपयांची देणगी दिली. श्री. केळकर यांनीं आभार मानतांना कुलाब्याचे कलेक्टर व मुंबईचे गव्हर्नर यांनीं धर्मशाळेला देणगी दिल्याचें सांगितलें.

सायंकाळीं सिंहासनापासून शिवाजी महाराजांच्या दोन्ही प्रतिमा पालखींत घालून छत्रीकडे जाण्यास छबिना निघाला. मिरवणुकीपुढें दांडपट्टा वगैरे मर्दानी खेळ सुरू होते. छबिन्याचा थाट व जमाव पाहून प्रेक्षकांस

ऐतिहासिक कालाची आठवण झाली. पालखी छबीला भेटून आल्यावर पुन्हां सभास्थानीं आणली. व राजेसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं सभेस सुरुवात झाली. प्रास्ताविक भाषणांत राजे लक्ष्मणराव यांनीं शिवाजीचें शौर्य, मुत्सद्देगिरी, धर्मरक्षण व देशरक्षण यांची पराकाष्ठा, स्वराज्यस्थापनेची कळकळ इत्यादि गोष्टींचें मार्मिक, गंभीर व कळकळीचें विवेचन केलें. स्मा. मं. चि. श्री. केळकर यांनीं १ एप्रील १९२६ पर्यंतचा शि. स्मा. फं. हिशोब सांगितला. श्री. रामभाऊ सोमण यांनीं स्मा. कमेटीनें या स्मारकाचें काम तडीस नेल्या-बद्दल आभार मानण्याचा व नवें कार्यकारी मंडळ नेमण्याचा ठराव मांडला. या ठरावाला ना. बेळवी श्री. काणे, डॉ. वेलकर, प्रो. पोतदार, श्री. आपटे, डॉ. सावरकर, डॉ. मुंजे व श्री. रानडे यांनीं दुजोरा दिला.

## रायगड शिवाजी स्मारक कमिटी.

१४. अध्यक्षः—श्री. मो. गो. देशमुख.

उपाध्यक्षः—श्री. शि. म. परांजपे, श्री. र. पां. करंदीकर, श्री. मु. रा. जयकर, श्री. ना. केशवराव, श्री. द. व्यं. बेळवी, खजिनदार व चिटणीसः—श्री. न. चिं. केळकर. दु. चिटणीसः—श्री. ना. रा. गुंजाळ.

सभासद—बृहन्महाराष्ट्रांतील चौतीस पुढारी (केसरी ता. १३।४।२६ पहा) येणेप्रमाणें कमिटी नेमण्याचा ठराव पास झाल्यावर श्री. केळकर यांनीं सर्वांचे आभार मानले. शेवटीं अध्यक्ष श्री. राजे लक्ष्मणराव भोंसले यांचा सन्मान करण्याकरितां हार घालण्यांत आला. व या प्रसंगाची खूण म्हणून मुद्दाम केलेली प्रस्तुत उत्सवाला यथोचित अशी रुप्याची तलवार व मानाचा पहिला नारळ हीं देण्यांत आलीं. तीं स्वीकारतांना अध्यक्ष गहिंवरले व म्हणाले ' या काळांत उत्सवमंडळानें दिलेली ही देणगी स्वीकारणाराची लाज एक श्री. शिवाजीमहाराज राखूं शकतील ' हे हृदयस्पर्शी उद्गार, ती गंभीर वेळ आणि शिवरायाच्या स्मरणानें सद्गदित झालेला श्रोतृसमूह हें दृश्य विशेष नव्हे काय ? श्री. केळकर व श्री. गुंजाळ या चिटणीसद्वयांना राजांनीं उंची वस्त्रांचा आहेर केला. अशा रीतीनें सभा आटोपल्यावर पोवाडे म्हणण्यांत आले. व रात्रीं बारा वाजतां शिवाजी महाराजांच्या जयघोषांत उत्सव पार पडला.

## रायगड व कुलाबा जिल्हा बोर्ड.

१५. रायगड किल्ला हा कुलाबा जि. बोर्डाचे हद्दींत येतो. लो. बोर्ड ही संस्था हल्लीं बहुतांशीं लोक प्रतिनिधींच्या ताब्यांत आल्यासारखी आहे. महाराष्ट्रांतील जनता ज्या अर्थीं रायगडावरील समाधीच्या दुरुस्तीसाठीं व स्मारकासाठीं हजारों रुपये जमविते, त्याअर्थीं रायगडाचे यात्रेकरूंना उतरण्यासाठीं धर्मशाळा व जाण्यासाठीं चांगला सडकेचा रस्ता करून देण्याची नैतिक जबाबदारी कुलाबा लो. बोर्डवर पडते. ह्या जबाबदारीची जाणीव बोर्डाला झाली असून त्यांनीं त्या दिशेनें काय प्रयत्न केला त्या संबंधीचा कु. लो. बोर्डाच्या सन १९२६ ते २८ सालच्या अहवालांतील उतारा सादर करितों.

गडावर चालून गेल्यावर विसांव्याकरितां सोय असावी म्हणून महाड ता. लो. बोर्डानें तारीख २५।५।१९२२ रोजीं ह्या किल्यांत धर्मशाळा बांधण्याचा ठराव केला. परंतु हें विशेष खर्चाचें काम ता. बोर्डाकडून होण्यासारखें नसल्यामुळें त्या वेळचे जिल्हा बोर्डाचे अध्यक्ष कै. रा. ब. गजानन महादेव कामत यांनीं तें हातीं घेऊन धर्मशाळेकरितां गडावर १० गुंठे जागा सरकारकडून मिळविली [ सरकार ठराव रेव्हेन्यु डिपार्टमेंट नं. २१४८।२४ ता. २०।१।२५ ] ह्या बोर्डाची आर्थिक परिस्थिती अनुकूल नसल्यामुळें रा. ब. कामत यांच्यामागून झालेले अध्यक्ष मे. सिताराम विश्वनाथ टिळक यांनीं रायगड–धर्मशाळा फंड सुरू करून त्यास नेक नामदार गव्हर्नर साहेब सर लेस्ली विल्सन यांची व दुसरे थोर गृहस्थांची सहानुभूति मिळविली. व फंड गोळा करण्याकरितां एक प्रचारक नेमण्यांत आला. त्यानें कुलाबा, ठाणें, पुणें, सातारा, रत्नागिरी, पूर्व व पश्चिम खानदेश या जिल्ह्यांत तसेंच बडोदें, कोल्हापूर, सांगली, मिरज, कुरंदवाड, जमखिंडी, मुधोळ, भोर, फलटण, औंध, गगनबावडा, अक्कलकोट, हैद्राबाद, धार, देवास वगैरे संस्थानांतून प्रवास करून वर्गणी गोळा करण्याचा प्रयत्न चालविला आहे. तसेंच दुसऱ्या जिल्हा बोर्डाकडून व इतर सार्वजनिक संस्थांकडून मदत होत आहे.

येणेंप्रमाणें रायगड किल्यांत धर्मशाळा बांधण्यांत आली. व धर्मशाळेची कोनशिला क्षत्रियकुलावतंस श्रीमंत धर्मवीर, धर्मविभूषण राजे लक्ष्मणराव

साहेब भोंसले, नागरपूकर यांचेकडून तारीख ३ एप्रील सन १९२६ रोजीं बसविण्यांत आली. त्यावेळीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं स्वतः गडावर येऊन व फंडास मदत करून या कार्यास उत्तेजन दिलें.

या धर्मशाळेस ९३२३ रुपये खर्च आला. त्यापैकीं ह्या फंडांतून ७००० रुपये घेतले असून बाकीचे बोर्डानें दिले. या फंडांत तारीख ३१।३।२८ पर्यंत १३२४८ रुपये जमले. व त्यांतील धर्मशाळेकरितां ७००० रुपये व धर्मशाळेजवळ औटहाऊस करितां व धर्मशाळेच्या व्हरांड्यांस कठडा व लाद्या बसविण्याकरितां लागणारे २९१४ रुपये फंडांतून घेतां फंडात बाकी ३३३४ रुपये राहात आहेत. आतां धर्मशाळेचें काम संपलें आहे. परंतु रायगडावर जाणाऱ्या लोकांचे सोईसाठीं बोर्डास पुष्कळ कामें हातीं घेण्या-सारखीं आहेत, व जसजसा फंड जमत जाईल, त्या त्या मानानें कामें हातीं घेण्याचा बोर्डाचा विचार आहे. करितां या फंडाचें नांव बदलून त्यास रायगड फंड असें नांव देण्यांत आलें आहे.

हा फंड लोकलफंडास लागू असणाऱ्या नियमाप्रमाणें बोर्डानें आपले ताब्यांत ठेवला असून त्याचा विनियोग कसा करावयाचा या बाबत सूचना करण्याकरितां एक कमेटी नेमण्यांत आली आहे. ह्या कमेटीच्या द्वारें रायगड फंडाचा योग्य तो विनियोग होऊन लोकांच्या उदार देणग्यांचें फळ लौकरच दिसून येईल असा पूर्ण भरंवसा वाटत आहे.

कुलाबा जिल्हा बोर्डाकडून श्री. पु. स आठवले, राहाणार पाली, यांस प्रचारक नेमण्यांत आलें होतें. ते गेलीं ५।६ वर्षे पुणें, मुंबई, बेळगांव, इंदूर, कोल्हापूर, सोलापूर, सांगली, मिरज इ. इ. ठिकाणीं वर्गणी जमविण्यास हिंडत होते. त्यांनीं रायगडच्या फोटोंचा एक संग्रह तयार केला असून कांहीं ठिकाणीं ते रायगडबद्दल सदीप व्याख्यानें देत. त्यांनीं अत्यंत कसोशीनें काम करून रायगड फंडास बरीच वर्गणी मिळवून दिली. वर्गणीची पोंच केसरींतून वारंवार प्रसिद्ध होत असे.

---

# प्रकरण ९ वें.

## रायगडावर जाण्याचे नवे व जुने मार्ग



सुमारें ३५ वर्षांपूर्वी महाडचे प्रसिद्ध नागरिक कै. प्रो. गो. गो. टिपणीस यांनीं रायगडवर्णनपर एक लहानसें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत मुंबईहून रायगडावर जाण्याचा एक मार्ग दिला आहे. पुस्तक लिहिलें त्या वेळेस तोच मार्ग सुमार्ग होता. पण, हल्लीं तो मार्ग मागें पडून अगर गैरसोईचा ठरून आधुनिक सुखसाधनांनीं सुसज्ज, जलद वेगाचा, मोटार प्रवासाचा मार्ग प्रचलित आहे. आणखी दहा वर्षांनीं कोंकण प्रांतीं रेल्वे झाल्यास रेल्वेचा मार्ग ह्यापेक्षाही सोईस्कर निघेल, आणि कोणी सांगावें, आणखी ५० वर्षांनीं विमानांची वाहतुक झाल्यास दिल्लीहून सकाळीं निघालेला प्रवासी दुपारीं रायगडीं पोंचूं शकेल. ज्या शिवशाहीचा रूमशामपर्यंत दरारा बसविण्याची महत्त्वाकांक्षा १८ व्या शतकांतील मुत्सद्यांच्या मनांत वावरत होती. तें रूमशामही मग रायगडास दूर नाहीं. सांगण्याचा मुद्दा—भौतिक शोधांनीं जुन्याला पुरे म्हणायला लावून नव्याचा धडाका जगभर प्रतिदिनीं गाजविला आहे. तेव्हां आज आम्ही दिलेले मार्ग मागें पडले तर नवल काय? आज प्रचलित असलेले मार्ग दिल्याशिवाय या पुस्तकाची पूर्णता होणार नाहीं हें जाणून रायगडावर जाण्याचे आजचे मार्ग देतों.

२. मार्ग सांगतांना आम्ही मुंबई, पुणें, कोल्हापूर व गोवें हीं चार केंद्रें कल्पून तेथून महाडपर्यंतचे मार्ग प्रथम सांगून, मग महाड ते रायगड हा मार्ग देऊं. महाड, गोरेगांव, बिरवाडी व निजामपूर या चार ठिकाणाहून रायगडावर जाण्याचे मार्गही देण्यांत आले आहेत.

३. प्रथम मुंबई ते महाडः—मुंबईहून सकाळीं ७ वाजतां धरमतर लाईनच्या बोटीनें १० वाजतां धरमतरला यावें. भाडें सेकंड क्लास १५आणे व थर्ड १० आणे. धरमतरीस महाडच्या पुष्कळ मोटारी येतात. महाडपर्यंत २ ते २॥ रु. भाडें पडतें. महाडास दुपारीं २ ते ३ च्या सुमारास त्या मोटारी येतात. धरमतर ते महाड अंतर ५६ मैल आहे.

दुसरा मार्गः—मुंबईहून सकाळच्या लोकलनें ठाण्यास यावें. ठाण्यास महाडच्या अगर पेणच्या मोटारी मिळतात. पेणची मोटार धरमतर नाक्यावर बदलून महाडच्या मोटारींत बसावें.

तिसरा मार्गः—मुंबईस सकाळीं कोंकण लाईनच्या बोटींत हरेश्वरचें तिकिट काढून बसावें. बोट ४ वाजतां हरेश्वरास येते. रात्रभर तेथें मुक्काम करून सकाळीं दासगांव खाडींतील मोटार लांचमधून दासगांवीं यावें. तेथें महाडच्या मोटारी मिळतात. हा तिसरा मार्ग हल्लीं बहुतेक रद्द झाल्यासारखा आहे. त्यांतल्या त्यांत जयंती व तुकाराम बोट बुडाल्या पासून तर ह्या मार्गानें येणारे प्रवासी फार विरळा. पहिल्या दोन मार्गांनीं खर्च कमी लागून शिवाय प्रवास ५ तासांत होतो. म्हणून पहिले दोन मार्गेंच हल्लीं जोराची रहदारी आहे.

४. पुणें ते महाड—पुण्याहून दोन मार्गांनीं महाडास येतां येतें. पुण्याहून सकाळीं ७ वाजतां निघणारी मोटार लोणावळा खंडाळा या मार्गानें १० वाजतां धरमतरीवर येते. तेथून मुंबईची बोट आल्यावर निघून सुमारें २ते४ च्या दरम्यान महाडला येते.

दुसरा मार्गः—पुण्याहून सकाळीं ७ वाजतां निघणारी मोटार भाटघरचें धरण, भोर, या रस्त्यानें वरंध्या घाटांतून दुपारीं १ ते २ च्या दरम्यान महाडास येते.

पहिला मार्ग जास्त लांब असल्यामुळें, मोटारींत बसण्याचा कंटाळा येतो दुसरा मार्ग त्या मानानें नजीक, नयनमनोहर व शिवशाहींतील घडामोडींचं पदोंपदीं स्मृति देणारा पण घाटांत थोडा धोक्याचा आहे.

५. कोल्हापूर ते महाडः—कोल्हापुराहून मोटारीनें कऱ्हाड, कऱ्हाडाहू

कुंभार्ली घाटानें चिपळूण, चिपळुणाहून खेड, खेडपासून कशेडी कवटीच्या घाटानें पोलादपूर व महाड हा सर्व मोटारींचा प्रवास झाला.

दुसरा मार्गः—कोल्हापुराहून रेल्वेनें मिरज, मिरजेहून पुणें, पुणें ते महाड मार्ग मागें दिला आहे.

तिसरा मार्गः—[ सायकलनें अगर मोटारनें जातां येईल. ] कोल्हापुराहून सातारा, साताऱ्याहून मालकमपेठ—महाबळेश्वर—तेथून पारघाटांतून पोलादपूर व महाड.

६. गोवें ते महाडः—गोंव्याहून आगबोटीनें मुंबईस यावें. मुंबई ते महाड मार्ग मागें दिला आहे.

दुसरा मार्गः—गोंव्याहून रत्नागिरीस आगबोटीनें यावें. रत्नागिरीपासून महाडपर्यंत मोटार सर्व्हिस आहे.

मागें दिलेल्या चार केंद्रापासून महाडास येण्याचे आजचे सोईस्कर मार्ग दिले आहेत.

७. कल्याण ते महाडः—नाशिक, खानदेश या भागांतून येणाऱ्या प्रवाशांनीं रेल्वेनें कल्याणास यावें. तेथून रेल्वेनें कर्जतला अगर ठाण्याला जावें. कर्जतहून व ठाण्याहून धरमतरीस येणाऱ्या मोटारी सकाळीं ७ वाजतां निघतात. त्या मोटारीनें महाडास येतां येतें.

आतां महाडाहून रायगडावर जाण्याचे मार्ग देण्यापूर्वी महाडासंबंधीं चार शब्द लिहिणें जरूर आहे.

८. महाड हें तालुक्याचें ठिकाण असून, ऐतिहासिक कालापासून आजपर्यंत मोठें व्यापारी शहर आहे. कुलाबा जिल्ह्याच्या दक्षिणार्धांत याच्याइतकें मोठें संपन्न शहर दुसरें नाहीं. बाणकोट बंदरापासून महाडपर्यंत मोठमोठीं जहाजें खाडींतून येऊं शकतात. महाड हें बंदर असून घाटीगाड्यांची उतार पेठ आहे. मुंबई व कलिकोट येथील गलबतें महाड बंदरांत येऊं शकतात. तसेंच पारघाटानें, वरंध्याघाटानें घाटीगाड्या महाडच्या तळावर बिनबरसातीच्या दिवसांत येऊं शकतात. मोसमांत महाड बंदरांत १०।१५ गलबतें व तळावर २००।३०० गाड्या व्यापारा-

च्या निमित्तानें आलेल्या असतात. महाडची मुख्य बाजार पेठ १॥ मैल लांबीची असून रचनेच्या दृष्टीनें फार नमुनेदार आहे. भात दळण्याच्या येथें ७ गिरण्या असून तांदूळ करण्याचें फार मोठें काम येथें होतें.

महाड बंदरांतून तांदूळ, नागली, वरी, भात, हिरडे, सागवान, लांकडी कोळसा, कडवे इ. इ. माल मुंबई व कालिकोट बंदरीं जातो.

कापड, साखर, चहा, स्टेशनरी, माल, राकेल, लोखंडी सामान, इ. इ. माल मुंबईहून महाडास येतो.

पुणें, भोर, वांई, कऱ्हाड, सातारा, फलटण येथून गहूं, हरभरा, तुरी भुईमुग, हळद, तंबाखु, जोंधळा, बाजरी, तेल, मिरची, बटाटे, कांदे, लसूण इ. इ. माल महाडच्या तळावर विक्रीस येतो. महाडची एकंदर वार्षिक व्यापारी उलाढाल एक कोट रुपयांची आहे.

महाड म्युनिसिपालिटी संपन्न असून शहराची व्यवस्था ठीक आहे. महाड येथें पाहाण्यासारखीं ठिकाणें–वीरेश्वराचें मंदीर, मैकावतीचें जुनें मंदीर, बंदरावरील–महायुद्धांत मरण पावलेल्या शिपायांच्या स्मारकाप्रीत्यर्थ उभारलेला–दगडी स्तंभ हीं स्थळें विशेष आहेत.

९. महाड ते रायगडः–महाडाहून रायगडचा पायथा सुमारें १२ मैल लांब आहे. महाडाहून सायंकाळीं ७ वाजतां बैलगाडीनें निघावें तें नातें या गांवांवरून कोंझरास व तेथून पाचाडास जावें. ५-६ वर्षांपूर्वी नात्या-पर्यंत फक्त चांगला रस्ता होता. पण अलिकडे कुलाबा डि. लो. बोर्डानें पाचाडपर्यंत सडक बांधली आहे. म्हणून तेथपर्यंत बैलगाड्या जाऊं शक-तात. लवकरच मोटारीनें पाचाडपर्यंत जातां येण्यासारखा रस्ता होईल.हल्लींही मोटार जाऊं शकते.

पाचाड येथें पूर्वी मोठी पेठ होती. गडावरील सर्व सामानाचा पुरवठा पाचाडहून होत असे. महाराजांची आई जिजाबाई यांचा वाडा व त्याच्या नांवाची विहीर तेथें आहे. ती विहीर अद्यापपर्यंत पडकी होती. परंतु १९२६ सालीं इंदूरच्या महाराजानीं ५००० रुपये तिच्या जिर्णोद्धाराकरतां दिल्या-मुळें हल्लीं तिचें बांधकाम पुरें झालें आहे. मातुश्री जिजाबाईच्या वाड्याच्या पडक्या भिंती येथें अद्याप दिसतात. वाडी गांवच्या देशमुखांच्या घराण्यांत

एक महत्त्वाची ऐतिहासिक वस्तु आहे. ती म्हणजे शिवाजी महाराज आपले गुरु रामदास यांच्या ज्या पादुकांची पूजा करीत त्या पादुका त्यांचे घरीं आहेत.

१०. माणगांव ते रायगडः—माणगांव हा गांव धरमतर—महाड रस्त्यावर असून महाडच्या उत्तरेस १७ मैलांवर आहे. हें तालुक्याचें ठिकाण आहे. माणगांव येथून सकाळीं ६ वाजतां बैलगाडीनें अगर पायानें निघून पळसगांवाहून घरोशी येथें जावें. घरोशी या गांवीं पाण्याचें दुर्भिक्ष आहे. तेथें दुपारचें जेवण करावें. तेथून ऊन कमी झाल्यावर सुमारें ३ वाजतां निघावें. निघतांना बरोबर पाण्याचा तांब्या भरून घ्यावा. कारण रस्ता चढणीचा असून वाटेंत कोठेंहीं पाणी नाहीं. पहिला चढाव चढल्यावर दोन रस्ते लागतात. एक आडवा, डोंगर पठारावरून व दुसरा पठारावरून खालीं खोऱ्यांत व तेथून पुन्हां डोंगराच्या चढावानें वर जाऊन रायगडच्या पायथ्याशीं पाचाडच्या वाडीवर पहिला रस्ता जास्त लांब पण बिनचढणीचा. दुसरा लांब कमी पण चढउताराचा. दोन्ही रस्त्यांनीं मनुष्य रायगडच्या पायथ्याशीं असणाऱ्या पाचाड गांवीं जातो. पाचाडाहून रायगडचा चढाव सुरू होतो. पाचाडापासून २ फर्लांगावर एक खिंड आहे. त्या खिंडींतून पलीकडे जाऊन मग किल्याच्या उत्तरेकडून वर चढण्याचा रस्ता आहे. हल्लीं रायगडावर जाण्यास खिंडीच्या उजव्या बाजूला किल्याच्या पश्चिमेस असलेल्या ‘खूबलढा’ बुरुजावरून रस्ता नेला आहे. या रस्त्यानें अंतर थोडेसें कमी होतें. हाच रस्ता हल्लीं दुरुस्त राखला आहे.

११. निजामपूर ते रायगडः—कोस्तें—निजामपूराहून बोरवाडीस जावें. बोरवाडी गांवाच्या पूर्वेस मानगड नांवाचा किल्ला इतिहासप्रसिद्ध असून रायगडच्या घेऱ्यांतील तो टेहळ्या किल्ला आहे. तेथून समोर तळगड दिसतो. मानगड किल्ल्यांत वंझाई नांवाची प्रसिद्ध देवी आहे. नवरात्रांत देवीचा उत्साह होतो त्या देवीस सरकारांतून नक्त नेमणूक आहे. बोरवाडीहून चनाट व तेथून जोर या गांवीं जावें जोराहून पुनाड, म्हसेमाळ, या गांवावरून सोनारवाडीस जावें. सोनारवाडी ही रायगडच्या उत्तर पायथ्याशीं आहे.

तो रस्ता पाचाडाहून जाणाऱ्या रस्त्याला नाना दरवाज्याच्या अलीकडे मिळतो. निजामपुराहून रायगड सुमारें १४ मैल लांब आहे.

१२. बिरवाडी ते रायगडः–१ बिरवाडीहून बैलगाडीनें अमशेत, दहिवड, वाळण, मांगरुण, वारंगी या गांवांवरून छत्री–निजामपूर, तेथून पाचाडच्या वाडीपर्यंत जावें. हा रस्ता लो. बोर्डाचा असून असावा तितका व्यवस्थित नाहीं, व चढउताराचा आहे. २ बिरवाडीहून मांगरुण, वाघोलीपर्यंत गाडीरस्ता आहे. तेथपर्यंत जावें. व पुढें धनगर वाडींत जावें. तेथून गडऱ्यांत जावें ( पाचाड गांवची वाडी ).

बिरवाडीहून रायगडास जातांना वाळणजवळ गुयरी म्हणून एक इतिहासप्रसिद्ध डोंगर आहे. हा डोंगर रायगडच्या दक्षिणेस आहे. त्या डोंगरावरून पाण्याचा एक मोठा झोत ( धबधबा ) पावसाळ्यांत पडतो. हल्लीं धनगर लोकांचे वाडे त्या डोंगराच्या पश्चिमेस आहेत. रायगडावर जाण्याकरितां गुयरीच्या उत्तर बाजूस दगडांनीं बांधलेली एक कमान व कांहीं ठिकाणीं दगडी पायऱ्या आहेत. त्या पायऱ्यांनीं वाघोलींत उतरतां येतें. ह्या गुयरी डोंगराचा उत्तरेच्या बाजूला जो फांटा जातो त्याला पोटल्याचा डोंगर म्हणतात. व तेथून शके १७४० ( सन १८१८ ) मध्यें ज्या काळकाईवरून रायगडवर तोफा डागण्यांत आल्या तें ठिकाण हेंच होय. या पोटल्याच्या डोंगरावरील काळकाई ह्या टोंकावर तोफांचे गाडे ठेवून रायगडावर मारागिरी इंग्रजांनीं चालविली होती, परंतु तोफेचा गोळा दारूकोठींत पडेना. तेव्हां रायनाक महार फितूर होऊन त्यानें सांगितलें कीं तोफांच्या गाड्यांच्या चाकाखालीं दोन दोन शिवराई ढबू घाला म्हणजे गोळा नेमका दारूखान्यांत पडेल. त्याप्रमाणें करितांच गोळा दारूच्या कोठींत पडून भडका झाला. ह्या कामगिरीबद्दल त्या महाराला गुयरी डोंगरावरून कडेलोटाचें बक्षीस इंग्रजांनीं दिलें अशी दंतकथा आहे.

## १३ रायगडावर येणाऱ्या प्रवाशांस सूचना:—

१ रायगड पाहाण्यास येणारांनीं नाताळच्या सुटीपासून ( डिसेंबर अखेर ) ते मेच्या सुटी अखेर पर्यंतच्या मुदतींत केव्हांही यावें. दिपवाळीच्या सुटींत येऊं नये. कारण ते दिवस कापणीच्या हंगामाचे असल्यामुळें मजूर मिळत

नाहीं. रस्त्यावर गवत फार वाढलेलें असतें. त्यामुळें चालण्यास फार त्रास पडतो.

२ माणगांव व महाड या तालुक्यांतील लोकांखेरीज इतर ठिकाणच्या व विशेषतः परजिल्ह्याच्या लोकांनीं रायगडावर जाण्यासाठीं महाडासच यावें. तेथें सर्व प्रकारची सोय उत्तम होऊं शकते. बिरवाडी, माणगांव, निजामपूर ( कोस्ते ) ह्या ठिकाणीं ओळख असेल किंवा तेथील कोणी मित्र बरोबर येण्यासारखा असेल तरच तेथें जावें.

३ पाचाड येथें श्रीपत भागोजी शेडगा या नांवाचा मराठा इसम आहे. त्याचें लहानसें दुकान असून प्रवाशाला लागणारा माल त्याचेकडे मिळतो. या इसमाचा वाटाड्या म्हणूनही उपयोग होतो. प्रवाशांनीं या शेडग्याला बरोबर घेऊन गडावर जावें. म्हणजे कसलीही अडचण पडणार नाहीं.

## रायगडच्या आसपास

१४. रायगडच्या आसपास जे डोंगरी किल्ले व इतर ऐतिहासिक व विशेष दृश्यें आहेत त्यांचें वर्णन देतों.

बिरवाडीचे १ उत्तरेस ९।१० मैलांवर दापोली खेड्याचे खालचे बाजूस एका दरींत १०० यार्ड लांब व ३० यार्ड रुंद असा डोह आहे. त्याला वाळणकोंडी असें म्हणतात. हा काळनदींतील एक डोह आहे. यांच्या दोन्ही बाजूच्या दगडी ( कातळ ) दरा* ( कांठ ) खूप उंच असून खालीं खोल व भयाण वाटतें. या कोंडींत मोठमोठे मासे असून ते विविध रंगाचे आहेत. तांदूळ, चणे, कुरमुरे, वगैरे पदार्थ टाकिले असतां माशांचे एकापेक्षां एक मोठे असे थवेच्या थवे वर येतात. या ठिकाणची एक दंतकथा आहे ती अशीः–ह्या कोंडींवर आसरा म्हणून कोणी देवता आहेत. ज्या कोणास लग्नकारणासाठीं किंवा सैन्याच्या तळासाठीं जें सामान लागेल तें त्यानें येथें येऊन आदले दिवशीं प्रार्थनापूर्वक मागितलें असतां मिळत असे. कार्य होतांच पुन्हां तें कुंडांत बुडवावें लागत

*या दरा इतक्या ताशीव व गुळगुळीत आहेत कीं कोणी आंत पडल्यास त्याला वरून दोर सोडल्याशिवाय वर निघतां यावयाचें नाहीं.

असे. पण कोणी एकानें तेथून आणलेली भांडीं तशीच दडपली तेव्हां-पासून वस्तु निघेनाशा झाल्या.

१५. छत्री निजामपूरः—कोंडींपासून सुमारें तीन मैलांवर पन्हे ( एक गांव ) येथें एका माळावर पुष्कळशा झाडाची गर्द छाया असून त्या खालीं पन्हेकर नांवाचें जुनें देवालय आहे. अशा आंबराया ह्या भागांत पुष्कळ ठिकाणीं आहेत. राजाच्या भोयांना ३।३ कोसांवर विसांवा घेतां यावा म्हणून मुद्दाम लाविल्या असाव्या. बिरवाडीची बाग, अकल्याची बाग, पुर्णेकरांच्या परिचयाची शिवापूरची बाग ह्या आज अस्तित्वांत असून आज देखील प्रवाशांना शीतल छाया देत आहेत.

या पन्हे गांवच्या बागेपासून ४ मैलांवर छत्री निजामपूर हें गांव आहे. ह्या गांवाला छत्री निजामपूर नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, शिवाजी महाराज रायगडच्या तटाची पाहणी करीत टकमक टोंकावर आले होते. एका नोकरानें महाराजावर छत्री धरली होती. इतक्यांत सोसाट्याचा वारा आल्यामुळें तो नोकर छत्रीसह उडाला तो एकदम खालीं जाऊं लागला. त्यानें छत्रीचा दांडा घट्ट हातांत धरल्यामुळें तो सुरक्षितपणें खालच्या निजामपूर गांवीं उतरला. तेव्हांपासून त्याला छत्री निजामपूर म्हणून संबोधण्यांत येऊं लागले.

१६. शिवतर घळः—वरंध्याहून पारमाची गांव ३ मैल तेथून पूर्वेस ३ मैल कसबे शिवतर गांव लागतें. शिवतराच्या आग्नेयेस २ फर्लांगावर डोंग-राच्या पायथ्याशींच दरडींत ही शिवतर घळ लागते. हल्लीं ह्या घळींत डोंगरांतील कपारी व माती पडून बरीच अव्यवस्था+ झाली आहे. मनुष्याला आंत उभ्यानें जातां येत नाहीं, वांकून जावें लागतें. ही घळ लेण्याप्रमाणें खडकांत खोदलीं असून आंत अनेक खोल्या आहेत. एकंदर घळईची लांबी १२५ फूट व रुंदी ७५ फूट आहे. हल्लीं त्या खोल्या नादुरुस्त व

+१९३० च्या जानेवारी महिन्यांत हीं शिवतर घळ उकरून साफ करण्यांत आली. तेव्हां २५०।३०० माणसें बसण्याजोगी जागा झाली आहे. पूर्वीची घाण वगैरे नाहींशी होऊन आतां या पुण्य क्षेत्र ला बरीच स्वच्छता आली आहे. ज्यानें हें कार्य केलें त्याची रामदासभक्ति वाखाणण्याजोगी आहे.

अंधःकारमय आहेत. घळईत शेजारीं पाण्याचा लहानसा झोत पडतो. घळईच्या शेजारीं 'खुस्याचा विरा' नांवाचा ओढा आहे. घळईच्या डोंगर-माथ्यावर तीन पाण्याचीं टांकीं असून उन्हाळ्यांतही त्यांत पाणी असतें. सर्वांत मोठ्या टांक्याची खोली १५ फूट असून तें कातळांत कोंडीसारखें झालें आहे. पावसाळ्यांत पाण्याचा झोत घळईच्या शेजारीं पडत असतो. हल्लीं जितकी घळ आहे त्यापेक्षां पूर्वी बरीच मोठी असावी. कारण घळई-च्या पुढें डोंगराचे सुमारें ५०X५० हात आकाराचे ४।५ दगड पडले आहेत. ते त्या घळईचेच पुढचे भाग असले पाहिजेत. हल्लींच्या घळईचे तीन भाग दिसतात. प्रत्येक भागाची लांबी सुमारें ४० फूट व रुंदी १५ फूट असावी. आंत सर्वत्र वाघळांच्या लेंडयांची घाण पसरली आहे. शेजारील सृष्टिसौंदर्य मात्र फारच बहारीचें आहे. वरून पडणारा पाण्याचा झोत हजारी कारंजासारखा तुषारमय पडतो. त्याशीतल तुषारमय झोताखालीं उभे राहून त्या समर्थतीर्थाचें अवगाहन करतांना मनांत अत्यंत पवित्र भावना उत्पन्न होते. घळईपासून वाघजई नांवाचें ठिकाण दिसतें. वरंध्या घाटाचा माथाही दिसतो. घळईच्या डोंगराच्या माथ्यावर चंद्रराव मोऱ्याच्या वाड्याचे जुने चौथरे आहेत. घळईच्या ईशान्येस चेराव नांवाच्या गांवा-शेजारीं हें ठिकाण आहे. वाडे २ असून भोंवतीं दगडी कुसूं आहे. जोतें घडीव चिऱ्याचें असून पूर्वाभिमुख आहेत. प्रत्येक जोत्याची लांबी ६५ फूट व रुंदी ३० फूट आहे. जवळ पाण्याचें सुंदर टांकें आहे. चंद्रराव मोऱ्याच्या वाडयापासून कसबें येथील शंकराच्या देवळापर्यंत भुयार होतें असें म्हण-तात. हल्लीं देवळासमोर एक चौथरा आहे. तो भुयाराचें तोंड म्हणून दाखवितात. चंद्रराव मोऱ्याच्या जावळीपासून या ठिकाणापर्यंत डोंगराच्या पठारानें एक पायवाट आहे. चंद्ररावाचा अंमल या प्रांतीं असतांना हे वाडे बांधले असावेत. वाडयांची रचना पाहतां ते वाले किल्ल्यासारखे भासतात. हा डोंगर उंच व चढावास अवघड आहे.

## १७. शिवतर घळीची ऐतिहासिक माहिती.

श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं ज्या सुंदरमठांत बसून ग्रंथराज दासबोध रचिला तें हें ठिकाण !

सुंदर मूर्ति सुंदर गुण । सुंदर कीर्ति सुंदर लक्षण
सुंदर मठीं देव आपण । वास केला ॥
गिरिकंदरीं सुंदरवन । सुंदर वाहाती जीवन
त्यामधें सुंदर भुवन । रघुनाथाचें ॥

समर्थ स्फुट प्रकरण.

समर्थे सुंदरमठीं गणपती केला । दोनी पुरुष सिंदूरवर्ण अर्चिला
सकळ प्रांतासी मोहछह दाविला । भाद्रपद मास पर्यंत ॥

स. प्र. स. ८ वा.

वावी पोखरणी झरे । टाकीं विशाळ सुंदरें
कडेकपाटें दुर्कुटें । पाहों जातां भयचि वाटे ॥

असल्या ह्या कडेकपाटांत समर्थांनीं एकांतवास पत्करून दासबोधासारखा ग्रंथ रचिला.

समर्थ रामदासस्वामी शिवतरीं असतां त्याच्या भेटीसाठीं शिवाजी महाराज आले. परंतु वाटेंतील नद्यांना महापूर आल्यामुळें त्यांस शिवतरीं जातां आलें नाहीं म्हणून ते बिरवाडीस राहिले. रात्रौ दर्शनोत्सुक शिवाजी महाराजांच्या पलंगाशीं समर्थ येऊन त्यांनीं त्यांना दर्शन व आशिर्वाद दिला अशी एक दंतकथा आहे !

दत्ताजी त्रिमल यानें दिवाकर गोसाव्यास लिहिलेलें पत्रः—

" राजश्री छत्रपती यजमान कर्नाटकांतून स्वारी करून श्री रामदास स्वामींच्या दर्शनास सज्जनगडासी आले. ते समई श्रीस प्रार्थनायुक्त विनंति केली कीं, श्रीनीं पूर्वीं बिरवाडीचे मुक्कामीं श्री शिवथर प्रांतीं असतां मधें महानदी महापूर आणि अकस्मात+ रात्रीं पलंगापासी येऊन चमत्काररूपें दर्शन दिल्हें किर्तीके चित्तीं होतें तेचि आशिर्वाद दिल्हे. दुसरे दिवशीं सिवथर प्रांतीं सुंदरमठी भेटी जाली. "

+समर्थ प्रताप:- शिवराजे शिवतरीं चमत्कार देखिले । करतळ स्फोटक स्मरणें तात्काळ शमले । स्वप्नीं समर्थ प्रसाद देऊनि गेले । महानदी उतरूनिया ॥ स. ३. ६५

शिवाजी महाराजांना राज्याभिषेक झाल्यावर देखील रामदास शिवथर घळींत होते. याबद्दल ऐतिहासिक आधार आहेत.

शके १५९८ भाद्रपद वा। ८ ( ले. १३ )
शिवथर तर्फे रामनगरपेठ बसवावयाची आज्ञा केली.

शके १५९८ ( ले. १५।१६ ) रामदास गोसावी शिवतरीं राहती असें शिवछत्रपती म्हणतात.

शके १५९९ भाद्रपद वा। २ ले. १७।१८ या दोन लेखांत समर्थ शिवतरीं असतां शिवछत्रपती त्यांचे भेटीस गेले होते.

शके १५९८ श्री समर्थांनीं छत्रपतींना शिवतरास १८ शस्त्रें समर्पिलीं व समर्थांच्या इच्छेनें राजे यांस कित्येक आशिर्वचनें प्राप्त झालीं.

१८. पाल्याचीं लेणीं:— हीं लेणीं गांधारी नदीच्या पश्चिम बाजूच्या टेकडीवर पालेगांवच्या नजीक आहेत. या लेण्याचें तीन मजले आहेत. तिन्ही मजले मिळून ४७ खोल्या आहेत. पाण्याचीं ७ टांकीं असून प्रत्येकांत पाणी आहे. मुख्य सभामंडपाच्या लेण्यांत मोठा स्तूप आहे. त्याच्यावर एकंदर ६ मूर्ती आहेत. त्या छिन्नभिन्न झाल्यामुळें नीटशा ओळखतां येत नाहींत. इतर खोल्यांत स्तूप असून त्यावर पाली भाषेंत कांहीं लेख कोरले आहेत. सभामंडपाचा दिवाणखाना सुमारें ५०० मनुष्यें बसूं शकतील इतका मोठा असून त्याचें कोरींव काम उत्तम प्रकारचें आहे.

## कांगोरी किल्ला.

१९. हा किल्ला रायगडच्या घेऱ्यांत येतो. शिवाजी महाराजांनीं तळें, घोसाळगड हे किल्ले घेतले त्याच सुमारास म्हणजे शके १५७८ नंतर हा किल्ला घेतला असावा. या किल्यावरून रायगड, प्रतापगड, राजगड, तोरणा, हे किल्ले स्पष्ट दिसतात. शके १७४० सालीं रायगडला इंग्लिशांनीं वेढा दिला त्यावेळीं कर्नल प्रॉथरच्या सैन्यावर छापे घालण्यासाठीं या किल्यावरून सैन्याची तुकडी रवाना झाली होती. तिची व ले. क्रॉसबी याच्या सैन्याची पोलादपुराजवळ गांठ पडून क्रॉसबीच्या सैन्यानें या तुकडीचा पराभव केला. पुढें रायगड पडल्यावर हा किल्ला पुढील उन्हाळ्यांत इंग्र-

जांचे ताब्यांत गेला. या किल्याचा शिवाजी महाराजांना पार घाटानें संरक्षणाचे कामीं फार उपयोग होत असे. हा किल्ला चढण्यास फारच बिकट आहे. पायथ्यापासून सुमारें २ मैलावर दिंडीदरवाजा आहे. हा दरवाजा हल्लीं पार कोसळून गेला आहे. दरवाजांतून आंत गेल्यावर पूर्वेकडे सुमारें ७०।७५ कदमावर काल–भैरवाचें देवालय आहे. देवळाच्या भिंती पार पडल्या आहेत. या देवळाच्या पाठीमागें शंकराच्या दोन पिंडी आहेत, व काल-भैरवाच्या भंगलेल्या ४।५ मूर्ति आहेत. देवाल्याला १५ पायऱ्या आहेत. तेराव्या पायरीवर डाव्या हाताला एक दीप-माळ आहे. देवळासमोर दोन टांकीं आहेत. तीं कोरडीं आहेत. पुढें १०० कदमांवर पूर्वेकडील बुरुज आहे. यावरून प्रतापगड महाबळेश्वर व ब्रम्हारण्याचा डोंगर हीं स्पष्ट दिसतात. या बुरूजावरून एक पलीकडे पठार दिसतें. या ठिकाणीं शंकराचें स्वयंभू देवस्थान आहे. या पठारास ‘ महादेवाचा मुरा ’ असें म्हणतात. काल-भैरवाच्या देवळाच्या पश्चिमेकडे बालेकिल्ला आहे. त्यावर ७।८ घरटे व दोट पडक्या इमारती आहेत. बालेकिल्यांत ७।८ जिवंत पाण्याचीं टांकीं आहेत.

कांगोरी किल्ल्यावर पेशवाईच्या अखेरच्या कालांत खालील किल्लेदार होते, असें बिरवाडी येथील रा. रा. वि. त्र्यं. पटवर्धन यांचेकडील जुन्या कागदपत्रावरून दिसतें. त्यांचेकडे कौलनामे, येजित खतें, निवाडापत्रें सांपडलीं आहेत.

शके १७१० मार्गशीर्ष वा। १३ चें येजित खतांत कांगोरीचा उल्लेख किल्ले मंगळगड असा केला आहे.

शके १७३५ कौलनामा यांत मंगळगडचा किल्लेदार रूपराम चौधरी हा होता असें लिहिलेलें आढळतें.

शके १७२९ कौलनामा यांत “ राजश्री बाळकृष्ण येशवंत सुभेदार तो मंगळगड ” असा उल्लेख आहे.

## पुण्याहून रायगडास येण्याचे जुने मार्ग

२०. पुणें, खडकवासले, खामगांव, पाल्याचा घाट, येल्याची पेठ,

बोचेघोळी, रायगड तेथून महाड, मानगड, तळगड, घोसाळगड, गोबेलें ( तर्फ गोरेगांव ) श्रीवर्धन बाणकोट. [ राजवाडे प्रस्तावना ]

## रायगडाहून पुण्यास

रायगडावरून दहिवड ( वाकी ) तेथून मढ्या घाटानें अन्नछत्र ६ मैल आहे. त्या गांवचें नांवच अन्नछत्र. येथें जाणाऱ्या येणाऱ्या प्रवाशास जेवण मिळतें. हें अन्नछत्र पंतसचीव ( भोर ) यांच्या देणगींतून चालतें. प्रस्तुतचा मार्ग पेशवाईत कोंकणची भिक्षुक मंडळी पुण्यास दक्षिणेसाठीं जात त्यावेळीं फार प्रसिद्ध होता. ह्या भिक्षुकांस वाटेंत जेवण मिळावें म्हणून ही सोय मुद्दाम केली होती. अन्नछत्राहून १३ मैलांवर वेल्याची पेठ येथें जवळच प्रचंडगड किल्ला आहे. पुढें पाब्याघाट चढून गेल्यावर खानापूर लागतें. खानापुराहून डोणजे, खडकवासलें व मग पुणें. विरवाडी येथें प्रस्तुत लेखक ज्या गोखले यांच्या घरांत राहतों त्या घरीं दक्षिणेच्या ब्राम्हणांना जेवण मिळत असें.

रायगडाहून पुणें— रायगडाहून शिवतर गांवीं तेथून गोण्याघाटानें निरा नदी ओलांडून तिच्या कांठानें शिवापूर व तेथून पुणें.



# प्रकरण १० वें.

## रायगडचें आजचें दर्शन



मागील एका प्रकरणांत आम्हीं रायगडच्या पायथ्याशीं म्हणजे पाचाडपर्यंत येण्याचे मार्ग दिले आहेत. पाचाड पासून पुढें जाण्याचा मार्ग व रायगडावरील स्थलवर्णन प्रस्तुत प्रकरणांत देण्याचा विचार आहे.

प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, सन १९२५ सालापासून रायगड रस्ता दुरुस्त करण्याकडे कुलाबा जिल्हा बोर्डाचें लक्ष गेल्यापासून रस्त्याची बरीच दुरुस्ती झाली आहे; व महाड तालुका बोर्डाचे सभासद, नातें येथील श्रीमान् गृहस्थ श्री. शंकरभाई धर्या यांच्या प्रयत्नानें व माहितीनें रस्ता पुष्कळ ठिकाणीं नवीन व सोइस्कर असा करण्यांत आला आहे. १० वर्षांमागें रस्त्याचें जें स्वरूप होतें तें आता बरेंच बदललें असून रस्ता पुष्कळ चांगला झाला आहे. ह्यापेक्षांही जास्त चांगला रस्ता करण्याची बोर्डाची इच्छा आहे. पण ही गोष्ट जनतेच्या व सरकारच्या मदतीवर अवलंबून आहे. असो.

पाचाडहून निघालें कीं, प्रथम जिजाबाईची विहीर लागते. ही विहीर पायऱ्यांची असून हिचें १० महिने पाणी टिकतें. ही नुकतीच दुरुस्त केली आहे. विहिरीपासून पुढें थोड्या अंतरावर शिवाजीमहाराजांचा बाग लागतो. हल्लीं येथें भुरटें जंगल वाढलें आहे. पुढें दगडी पायऱ्यांचा रस्ता आहे. या रस्त्यानें खिंडीपर्यंत गेल्यावर उजवे बाजूस किल्ल्याचे वायव्य बाजूस " खुबलढा " बुरूज आहे. हा बुरूज मुख्य डोंगरापासून अलग आहे. तेथें एक खिंड आहे. खिंडीचे उत्तरेस मोठी दरी आहे. पूर्वीचा रस्ता ही खिंड ओलांडून पलीकडून दरींतून गेला आहे. परंतु हल्लीं खुबलढा बुरूजावरून रस्ता नेला आहे. हा थेट महादरवाजापर्यंत हिरकणी

बुरूज ज्या टोंकावर बांधिला आहे त्याच्या पायथ्याला वळसा घालून जातो. आणि जेथें हा पायथा चढण्यास सुरवात होते त्या ठिकाणींच उजव्या अंगच्या दरींतून वाघोलींकडून एक रस्ता येऊन मिळतो. वाडीकडून येणाऱ्या रस्त्यानें गड चढूं लागल्यास प्रथम नाना दरवाजा लागतो.

२. नाना दरवाजाः—कोणी म्हणतात नाना फडणीसांनीं हा दरवाजा दुरुस्त केला म्हणून याला नाना दरवाजा असें म्हणतात. पण हा निव्वळ तर्क आहे. नाना हे लहाना ह्याचें अपभ्रष्ट रूप असावें. एक मोठा दरवाजा व हा "लहान दरवाजा" लहाना-लाना-नाना अशीं रूपें बदललीं असलीं पाहिजेत. हा दरवाजा अगदीं मोडकळीस आला आहे. सोळा सतरा पायऱ्या चढून दोन्ही कमानींतून जावें लागतें. कमानींची उंची १५ फूट व दरवाजाची रुंदी १० फूट आहे. दरवाजा गोमुखीच्या आकाराचा असून दोन्ही बाजूस २० फूट उंचीचे दोन बुरूज आहेत. बुरुजावर बसण्याजोगे कट्टे असून मारगिरी करण्यासाठीं माऱ्याचे झरोके राखून ठेविले आहेत. पाहारेकऱ्यांना बसण्यासाठीं खडकांत कट्टे किंवा ओसऱ्या खोदल्या आहेत. या दरवाजापासून ३/४ मैल रस्ता बहुतेक सपाटीचा आहे. पुढें दोन मोडलेल्या इमारतींचे अवशेष आहेत. एकीची लांबी रुंदी ३९×२५॥ आहे. व दुसरीची ७५×२० आहे. हीं धान्याचीं कोठारें (अंबरखाने) असावीं. नाना दरवाजापासून हें ठिकाण ३०० फूट उंच आहे. येथेंच मदनशहाचें थडगें आहे, व 'मसजिद तोफखानाही' आहे. ले. रेमननें १८१८ सालीं रायगडावरील या तोफखान्याचा "मसजिद" तोफखाना असा उल्लेख केला आहे. येथुन ४०० यार्डावर खडकांत कोरलेल्या तीन खोल्या दिसतात त्यांची लांबी रुंदी अनुक्रमें २०×८; १८×८; ३३×८ अशी आहे. पैकीं तिसरीस दोन आंगचेच दगडी खांब आहेत. या घोडयाच्या पागा असाव्या. खोल्यांची उंची सुमारें ८ ते १० फूट आहे. थोडया अंतरावर खडकांत खोदलेल्या पायऱ्या लागतात. येथें रस्ता फारच बिकट आहे. परंतु आतां येथें लोखंडी कठडा घालून चांगला बंदोबस्त केला आहे. येथन वर बघितलें तर महादरवाजा अगदीं आपल्या डोक्यावर दिसतो. येथून ४०० फूट उंचीवर तो असून चढाव अगदीं खडा आहे. हिरकणी

टोकाचें वायव्येस जें वाकण आहे त्या वाकणांत महादरवाजा येतो.

३. महादरवाजाः--दरवाज्यांत जाण्यास ३२ बांधीव चांगल्या पायऱ्या आहेत. दरवाजापुढील तटाचें बांधकाम खूप मजबूत असून गोमुखीच्या आकाराचें आहे. असें असण्याचें कारण शत्रूनें महादरवाजावर हल्ला केल्यास त्याच्या तोफांचे गोळे दरवाजास न लागतां समोरच्या बुरुजावर आदळावे दरवाजा लगतच्या तटाची उंची ७५ व ६५ फूट आहे. दरवाज्यापुढील मार्गाची रुंदी प्रथम ८ फूट, गोमुखीच्या वाकणांत १६ फूट व दरवाज्यापाशीं ८ फूट अशी आहे. दरवाज्यापुढील भव्य बुरुजांना माऱ्याचे झरोके असून तटाच्या आड शिबंदीला लपून बसण्यास कट्टे केले आहेत. दरवाजाची एक फळी उभी आहे व दुसरी फळी मोडून पडली आहे. दरवाजाची अर्गला किंवा अडसर एका मोठ्या वहाला येवढा जाड आहे. दरवाजा औदुंबराच्या लाकडाचा असून त्याला लोखंडी लंगरी खिळे ठोकलेले आहेत. दरवाज्याच्या आंतल्या बाजूस दोन्ही बाजूला पहारेकऱ्यासाठी देवड्या आहेत. हीच किल्ल्यावर जाण्याची मुख्य वाट. दुसरी एक चोरवाट दक्षिण बाजूस आहे. पण ती बंद पडली आहे. महादरवाज्यापासून हिरकणी टोंक ४०० फूट उंचीवर आहे. व बालेकिल्ला ६०० फूट उंच राहातो. दरवाजांतून आंत गेल्यावर पश्चिमेस हिरकणी टोंक व वायव्येस टकमक टोंक आहे.

मोठ्या दरवाजानें आंत जाऊन सुमारें पाऊण मैल चढाव गेल्यानंतर डाव्या बाजूला एका थडग्यासमोर एक लोखंडी खांब पुरलेला आहे तो 'मलखांब' असावा असें म्हणतात. पण तें खरें दिसत नाहीं, त्याला वर कडी आहे. त्यावरून तो झेंडा वगैरे उभारण्याच्या काठीचा आधारस्तंभ असावा असें वाटतें. उजव्या बाजूला एक तलाव लागतो. त्याची लांबी रुंदी १२×७५ आहे. या तलावापासून ३०० फूटावर दक्षिणेस प्रख्यात गंगासागर तलाव लागतो.

४. गंगासागर तलावः—हा तलाव सुमारें ३७५ फूट लांब व ३०० फूट रुंद असून खडक खोदून तयार केला आहे. उत्तरेस व पश्चिमेस चिरेबंदी बांधकाम केलें आहे. सुमारें ७।८ वर्षांपूर्वी गंगासागराचे पश्चिमेच्या बाजूचें

बांधकाम तळाशीं फुटल्यामुळें चैत्र वैशाखांत पाणी संपून जाई. परंतु अलीकडे त्याची दुरुस्ती केल्यामुळें नेहमीं पाणी भरपूर असतें. बालेकिल्ल्यांतील राजघराण्याला व इतर लोकांना पाण्याचा मुख्य पुरवठा याच तळ्यापासून होई. गंगासागराचें पाणी स्वच्छ व चवदार असल्यामुळें त्या पाण्याचा प्रवाशांनीं पिण्याकडे व स्वयंपाकाकडे बिनदिक्कत उपयोग करावा. गंगासागरावर उभें राहिलें असतां विशेष शोभा दिसते. दक्षिण बाजूला बाले किल्याचा उंच प्रचंड तट त्याच्या लगत तळयाच्या त्याच कडेवर दोन मनोरे. समोर पूर्वेस उंच दरड. त्या पलीकडे ईशान्येस देवळाचा घरटा थोड्या अंतरावर आहे. त्यांत अष्टभूजा देवीची मूर्ति आहे तीच शिरकाई देवी होय. हें ठिकाण हल्लींच्या धर्मशाळेच्या पूर्वेस येतें. पश्चिमेस खोल दरी व उत्तरेस निवडुंगाचें रान. गंगासागराच्या उत्तरेस लोकलबोर्डाची धर्मशाळा आहे. धर्मशाळेचा रखवालदार एक पगारी नोकर आहे. प्रवाशानें त्याचेपासून किल्ली घेऊन धर्मशाळेंत उतरावें. धर्मशाळेंत प्रवाशांची सर्व सोय होईल अशी व्यवस्था केली आहे. आणखी कांहीं उणीवा आहेत पण द्रव्याभावीं त्या दूर करितां येत नाहींत असें बोर्डाचें म्हणणें आहे. जनतेनें या कार्यास जास्त मदत केल्यास प्रवाशांची सर्वप्रकारें उत्तम सोय होईल.

५ **मनोरे**:—गंगासागरापासून जवळच ४० फूट उंचीचे दोन मनोरे आज दिसते असें आहेत. तिसरा एक मनोरा राजवाड्याशेजारीं पश्चिम अंगास असावा असें त्याच्या अवशिष्ट भागांवरून वाटतें. हे दोन मनोरे पूर्वी पांच पांच मजली होते असें सांगतात. हल्लीं फक्त दोनच मजले आहेत. मनोऱ्यास बारा पैलू किंवा बाजवा आहेत. प्रत्येक बाजूस एक एक निमुळती खिडकी असून तिच्यावर नकासकाम केलें आहे. मनोऱ्याच्या गर्भाचा व्यास तळांत १४ फूट आहे. धर्मशाळा नव्हती तेव्हां प्रवासी येथेंच जेवण करीत. रायगड ही राजधानी असतां मनोऱ्यांचें स्वरूप काय असेल बरें ! स्वराज्य संस्थापनेच्या प्रयत्नानें श्रांत झालेले शिवाजीमहाराज जेव्हां विश्रांतीसाठीं येथें बसत तेव्हां गंगासागरावरून आलेल्या थंड वायुलहरींनीं त्यांचे सर्व श्रम हरण होत असतील! आज हे मनोरे पाकोळ्यांचें आश्रयस्थान बनलें आहेत.

**बालेकिल्ला**:—मनोऱ्यांच्या पश्चिमेस ३२ पायऱ्यांचा एक प्रशस्त दगडी जिना आहे. त्याच्या बाजूचे धक्के अद्याप पुष्कळ चांगल्या स्थितींत आहेत. या पायऱ्यांनीं वर चढलें कीं, बालेकिल्ल्यांत प्रवेश होतो. बालेकिल्ल्याची पूर्वपश्चिम लांबी ९०० फूट, व दक्षिणोत्तर रुंदी ४५० फूट आहे. बालेकिल्ल्यांत शिरतांना जो दगडी कमानींचा दरवाजा लागतो त्याला 'पालखी दरवाजा' म्हणतात. बालेकिल्ल्यांत पश्चिमेस अनेक मोडक्या इमारतींचे अवशेष आहेत. पालखी दरवाजापासून उत्तर दक्षिण जो रस्ता जातो. त्याच्या पश्चिमेस सात मोडक्या इमारतींचीं भिंताडें उभीं आहेत. भिंती विटांच्या असून त्या सलग आहेत. हे राण्यांचे महाल असावे असें वाटतें. रस्त्याच्या पूर्वेस अनेक मोडक्या इमारती व जमिनींत बांधलेलीं कोठारें असून रस्त्याच्या दक्षिण टोंकाशीं एक दरवाजा व पायऱ्या आहेत. त्या उतरून पुढें गेलें कीं थोडी सपाटी आहे. हीच राण्यांची हवा खाण्याची जागा होय. पालखी दरवाजापासून एक रस्ता पूर्वेकडे जातो. त्या रस्त्यानें गेलें म्हणजे राजसभा किंवा दरबारची जागा लागते.

६ **राजसभा**:—हिंदवी स्वराज्याचें सिंहासन ज्या स्थानीं विधिपूर्वक झालें तेंच हें महान् पवित्र पुण्यस्थान! मागें प्रकरण ३ मध्यें राज्याभिषेक महोत्सवाचें जें वर्णन केलें आहे तो सर्व विधि याच ठिकाणीं घडून आला. येथेंच सुवर्णपुष्पांचा वर्षाव शिवप्रभूंवर झाला! आणि आतां.... ... ... ... ...! सारांश—

सा रम्या नगरी महान् स नृपतिः सामन्तचक्रंच्च तत्।
पार्श्वे तस्यच सा विदग्ध परिषत् ताश्चंद्रबिंबाननः।
उन्मत्तः सच राजपुत्रनिवहस्ते बंदिवानस्ताः कथः।
सर्वं यस्य वशादगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः॥

हें कविवचन सार्थ मानून कालाच्या कठोर करणीस नमस्कार करावा झालें! राजसभेच्या भोंवतालच्या भिंती मात्र शिल्लक आहेत. या जागेची लांबी १२० फूट व ५० फूट आहे. पटांगणाच्या पश्चिमेस उंच चौथरा आहे ती जागा अद्याप पवित्र पादत्राणें घालून येथून कोणीं जात नाहीं.

सिंहासनाचे दोन्ही बाजूस असलेल्या इमारतींत पेशव्यांचे काळीं



गंगासागर तलाव व मनोरे.

धान्य ठेवीत असत असें वाटतें. कारण सिंहासनाचे जागीं अद्याप जुने जळके तांदूळ सांपडतात. जवळच्या १५ फूट रुंदीच्या दोन खोल्या खजिन्याच्याच असाव्या. सिंहासनासमोर कारंजाची एक खूण दाखवितात; पूर्वेकडील भिंतीला कमानीच्या १२ खिडक्या असून त्यांचें मोजमाप ३॥×१$\frac{1}{2}$ फूट आहे.

७ **नगारखाना:**—राजसभेच्यासमोर पूर्वेस नगारखाना आहे.ही दुमजली सपाट माथ्याची इमारत असून तळमजल्यांत मोठा दरवाजा आहे. हेंच राजसभेंत शिरण्याचें प्रवेशद्वार होय. या द्वाराची उंची ३० फूट असून बांधकाम सर्व दगडी आहे. नगारखान्याची इमारत ५० फूट उंच, ३० फूट लांब व २० फूट रुंद आहे. कमानीखालून जो रस्ता जातो त्याच्या दोहों बाजूला पहारेकऱ्यांसाठीं देवड्या आहेत. या देवडीवर चढून गेले म्हणजे भिंतींत २९ पायऱ्यांचा एक जिना आहे. तो चढल्यावर नगारखान्याची जागा लागते. येथें स्वराज्याच्या अमदानींत त्रिकाल चौघडा व नगारा झडत असे. ज्या चौघड्याचा व नगाऱ्याचा निनाद स्वजनांस स्फूर्तिदायक, शत्रूंस भीतिदायक, आर्तांस अभयसूचक, व स्वातंत्र्यलक्ष्मीस मंगलदायक वाटे, तें स्थल आज निस्तब्ध आणि ओसाड पाहून मन शतशः विदीर्ण होतें. असो. येथून आणखी वरच्या मजल्यावर जाण्यास १० पायऱ्यांचा जिना भिंतींतच आहे. तो चढून वर गेलें कीं, उघडें गच्चीसारखें पटांगण लागतें. हेंच किल्यांतील सर्वांत उंच ठिकाण. येथून फारच भव्य व विस्तीर्ण देखावा दिसतो. पूर्वेस सह्याद्रीची काळी-कभिन्न लांबच लांब ओळ व त्यावरील सुळके, राजगड, लिंगाणा, तोरणा, कांगोरी हे किल्लेही येथून दिसतात. तसेंच रायगडावरील कुशावर्त तलाव, त्यापलीकडील पडक्या इमारती वगैरे दिसतात. आग्नेय कोपऱ्यांत प्रतापगड दिसतो. दक्षिणेस गुयरीचा डोंगर व दुसऱ्या अनेक टेकड्या दिसतात. पश्चिमेस तळगड दिसतो. व सायंकाळीं आकाश निरभ्र असेल तर दुर्बिणीच्या साह्यानें पश्चिमसमुद्र देखील दिसतो. नुसत्या डोळ्यानें पश्चिम क्षितिजावर एक चकचकीत रुपेरी कडा दिसते. या नगारखान्याची रचना

अशी आहे कीं, शिवाजीमहाराज सिंहासनावर बसून सहज कांहीं बोलले तरी तें बोलणें या इमारतीजवळ असणाऱ्या इसमांस सहज ऐकूं जावें. सिंहासनाच्या चौथाऱ्याजवळ उभे राहून आज सुद्धां कांहीं आपण बोललों तर त्या बोलण्याचा प्रतिध्वनी आपल्याला दोनदां स्पष्ट ऐकूं येतो व नगारखान्याशीं बोलणें स्पष्ट ऐकूं जातें. यावरून ज्यावेळेस ही इमारत व सभामंडप पूर्णावस्थेंत होतीं, त्यावेळेस आवाज किती मोठा होत असेल याची बरोबर कल्पना होते. नगारखान्याच्या बाहेर पडल्यावर पूर्वेस एक पायवाट जाते. त्या वाटेनें गेलें कीं, कुशावर्त तलावावरून श्रीगोंदे टोंकाकडे जातां येतें. तळ्याच्या कांठीं एक लहानसें मंदीर आहे. त्याचे आसपास बरेच चौथरे आहेत ते बहुधा प्रधान व इतर मानकरी यांच्या घरांचे अवशेष असावे.

८ **बाजारपेठ**:— नगारखान्यापासून उत्तरेस जो रस्ता जातो त्या रस्त्यानें थोडें पुढें गेलें असतां रायगडावरील बाजारपेठेच्या दुकानांचे चौथरे लागतात. रस्त्याच्या प्रत्येक बाजूला २२ याप्रमाणें दोन्ही बाजूस मिळून ४४ चौथरे लागतात. पेठेंतील रस्त्याची रुंदी ४० फूट आहे. १० वर्षांपूर्वी ही सर्व सडक माती विटांनीं ओहरून गेली होती. पण अलीकडे हे मातीचे ढीग काढून टाकून रस्ता व चौथरे साफसूफ करण्यांत आले आहेत. घोड्यावर बसून देखील माल घेतां यावा इतकी जोत्याची उंची आहे. दुकानांची साफसफाई करतांना मातीच्या ढिगांत फक्त जातीं, लामणदिवे, ठाणवया, देवादिकांच्या मूर्तीच सांपडल्या आहेत! बाजारपेठेंतून बाहेर पडले कीं वाटेंत बरेच चौथरे लागतात व पुढें महादेवाचें—जगदीश्वराचें—देऊळ लागतें.

९ **जगदीश्वराचें मंदीर**:—हें बालेकिल्यापासून अर्ध्या मैलावर आहे. देवळाभोंवतीं उंच तट असून सभोंवार फरसबंदी आहे. कुंसवाच्या पश्चिमेस लहानसें प्रवेशद्वार असून आंत बाहेरच्या बाजूस तीन फूट उंचीची बलभीम मारुतीची मूर्ति आहे. मूर्ति भग्न स्थितींत आहे. पश्चिम दरवाजानें आंत शिरल्यावर आपण देवळाच्या पिछाडीस येतो, तटाला लागून राहाण्यासारख्या ओवऱ्या आहेत. देवाचे सेवेकरी व पुजारी यांच्या राह-

ण्याच्या त्या जागा असाव्या. देवालयाचा धाट कांहींसा हेमाडपंती आहे. सभामंडप मोठा व प्रशस्त आहे. देवळाचें सर्व काम दगडी आहे. गाभाऱ्यांत शंकराची पिंडी आहे. ती कोणी उध्वस्त केली आहे. पूर्वी देवळांत पाण्याचीं डबकीं सांठून घाण होत असे, पण अलीकडे पी. डब्यू. डी. कडून थोडीफार दुरुस्ती होते. त्यामुळें देवळाची जागा सुव्यवस्थित आहे. *देवळांतून बाहेर पडल्यावर पूर्वेस मोठा दरवाजा आहे. त्यांमधून बाहेर पडतांना खालच्या उंबरठ्याबर बाहेरच्या अंगास "सेवेचे ठाई तत्पर हिरोजी इटळकर" असा व दरवाजाच्या उजव्या बाजूस बाहेरच्या अंगास सुमारें दीड हात लांब व १। हात रुंदीच्या एका चिऱ्यावर खालील श्लोक कोरलेले आहेत.

॥ प्रासादो जगदीश्वरस्य जगतामानन्ददोऽनुज्ञया ॥
॥ श्रीमच्छत्रपतेः शिवस्य नृपतेः सिंहासने तिष्ठतः ॥
॥ शाके षण्णव बाण भूमिगणनादानन्द संवत्सरे ॥
॥ ज्योतीराज मुहूर्त कीर्तिसहिते शुक्लेश सार्पे[1] तिथौ ॥
॥ वापी कूपतडागराजी रुचिरं रम्यं[2] वनंवीतिके ॥ ( वीतिकौ )
॥ स्तंभैः कुंभिगृहे नरेंद्रसदनैरभ्रंलिहैर्मीहीते ॥ (निर्मिते)
॥ श्रीमद्रायगिरौ गिरामविषये हीराजिनानिर्मितो
॥ यावचंद्र दिवाकरौ विलसत स्तावत्समुज्रुंभते ॥

*देवळाच्या तटबंदीच्या घेराचा व्यास पूर्वपश्चिम १५० फूट लांब व दक्षिणोत्तर १५० फूट रुंद व तटाची १० फूट उंची आहे. दक्षिणेकडील तटाची उंची ४० फूट आहे. पश्चिम दरवाजा ६ फूट उंच व ४ रुंद. पूर्वेकडील दरवाजा ८ फूट उंच, कमान ५ फूट व दरवाजावरील चौघड्याच्या जागेसुद्धां दरवाजाची एकंदर उंची २५ फूट आहे. खुद्द देवालयाची लांबी ३५ फूट, रुंदी २२ फूट, उंची १८ आहे. देवळाच्या उत्तरेस व दक्षिणेस लहान लहान २ दरवाजे आहेत; त्यांची लांबी ४ फूट व रुंदी २॥ फूट आहे.

१ भिंतीवर सार्ध्ये असा शब्द आहे.

२ 'रुचिर हर्म्यै वनैर्वीथिको' असा पाठभेद मूळांत आहे.

दोन्ही श्लोकांच्या प्रारंभीं श्रीगणपतये नमः असें आहे.

**अर्थ**:--तीन्ही लोकांना आनंद देणारा हा जगदीश्वराचा प्रासाद (मंदीर) सिंहासनाधीश्वर श्रीमच्छत्रपति शिवाजी राजा यांच्या आज्ञेनें शके १५९६ आनंद नाम संवत्सरे (?) शुक्ल पक्षाच्या एकादशी तिथीला आश्लेशा नक्षत्र असतांना या ज्योतिष शास्त्रांत कीर्तिवान् मानलेल्या मुहुर्तावर ज्याच्या सभोंवती मनोरे, गजशाळा, विहिरी, तळीं उंच राजवाडे आहेत, असा तो वाणीला अवर्ण्य अशा श्री रायगडावर हीराजीनें (नांवाच्या शिल्पकारानें) निर्माण केला असून तो यावच्चंद्र या पृथ्वीतलावर खुशाल नांदो.

१०. महाराजांची समाधी व छत्रीः—छत्रपति शिवाजी महाराजांच्या स्थूल देहाचा भस्मीभूत झालेला पावन अंश ज्या पावनस्थलीं आहे, तें समाधीचें स्थान देवालयाचे पूर्वेस अगदीं नजीक आहे. समाधी अष्टपैलू असून चिरेबंदी आहे. कोणा लोभी दुष्टानें द्रव्यलाभाच्या आशेनें तिचे धोंडे उखळले होते! सन १८८५ सालापासून समाधीच्या किरकोळ दुरुस्ती करतां सरकारांतून ५ रुपये मंजूर झाले होते! आमच्या साम्राज्य सरकारचें हें केवढें औदार्य! ज्याच्या वंशजापासून साऱ्या दख्खनची दुनिया पैदा झाली, त्याच्या समाधीला सालीना पांच रुपयांचा तनखा काय थोडा झाला? पण यांत सरकारला दोष लावण्यापेक्षां आपणच आपल्या अक्षम्य उपेक्षेबद्दल शरमले पाहिजे. असो. लोकांना आपल्या या उपेक्षेची जाणीव होऊन लोकमान्य टिळकांनीं रायगडावरील स्मारकासंबंधें कोणती खटपट केली याचा इतिहास मागें दिला आहे. लोकमान्यांच्या निधनानंतर लवकरच स्मारक कमिटीचे अध्यक्ष श्री. नानासाहेब देशमुख यांनीं पुढाकार घेऊन सरकारशीं पत्रव्यवहार केला. सुमारें चार वर्षें हें स्मारक प्रकरण सरकारांत शिजून सन १९२५ सालीं सरकारी ठराव नं. ७०२३ ता. ६।२।१९२५ अन्वयें स्मारकाचें काम पूर्ण करण्यास सरकारची संमति मिळाली. नंतर एक बडे सरकारी ऑफिसर व श्री. न. चिं. केळकर हे दोघे समक्ष गडावर येऊन छत्रीचा नकाशा व अंदाजपत्रक करून गेले. छत्रीचा अंदाची खर्चं १९००० रु. ठरवून त्याची विभागणी अशी झाली. १२००० रु. स्मारक कमिटीनें द्यावे, ५००० रु. मुंबई सरकारनें द्यावे, व २००० रु. पुराणवस्तुसंशोधन खात्यानें द्यावे. त्याप्रमाणें स्मारक कमिटीनें १२०००

६. मुंबई सरकारचे ए० इंजिनियर रत्नागिरी याजकडे भरले (ता.१०।२।-२५). त्या छत्रीच्या बांधकामाच्या बाबतींत सरकारनें अभिनंदनीय सहकार्य केलें. समाधी बांधण्याचें कंत्राट रा. सुळे यांस दिलें. रा. सुळे यांनीं आपलेपणानें व मोठ्या कुशलतेनें छत्रीचें बांधकाम १९२७ सालीं संपविलें. बांधकामास आक्टोबर १९२५ मध्यें सुरवात झाली. पाया खोदण्याचें काम चालू असतां १२ फूट खोलीवर पहार अडूं लागली. म्हणून तेथला भाग काळजीपूर्वक मोकळा करण्यांत आला. तेव्हां आंत घनाकृती बांधकाम आढळलें. त्याच्या दोन बाजूंनीं कमानी असून वर मोठी शिळा होती. शिळा उखळतांच आंत श्रीशिवरायाच्या देहाची पवित्र रक्षा अतिशय काळजीपूर्वक ठेविलेली आढळून आली. तिच्या पेट्या भरून आंत ठेविल्या आहेत. छत्री मूळच्या अष्टकोनी चौथऱ्यावरच उभारिली असून तिच्यावर अर्धगोलाकार घुमट बसविला आहे. छत्रीच्या गाभाऱ्यांत ब्रॉंझ धातूचा प्रतिमाफलक पश्चिमाभिमुख बसविला आहे. हा प्रतिमाफलक प्रसिद्ध शिल्पकार श्री. विनायकराव करमरकर यांनीं केलेला आहे.

११. बाराटाकीं:- देवालयाच्या दक्षिणेस थोडे खालीं उतरून गेल्यावर बारा टाकीं लागतात. यांत पाणी नेहमीं असतें. या पैकीं कोणत्याही एका टाक्याचें पाणी हालविलें असतां सर्व टाक्यांतील पाणी हालतें यावरून तीं तळांत सलग असावीं. "पायांत बेडी असतां यांतील पांच टाकीं पोहून एक मनुष्य पलीकडे गेल्या बद्दलचा जुना लेख आपणांस मिळाल्याचें प्रो. टिपणीस यांनीं लिहिलें आहे. सर्व टाकीं सारखी नसून लहानमोठीं आहेत. हीं खडकांत कोरलेली असून जिवंत पाण्याचा झरा असावा असें वाटतें.

दारूचीं कोठारें:-टाक्यांचा दक्षिणेस दारूकोठ्या आहेत. त्यांची लांबी ९० फूट व रुंदी २० फूट आहे. कोठड्या कातळांत खोदल्या असून ३॥ फूट जाडीच्या चिरेबंदी भिंती, वर बांधिल्या आहेत. सन १८१८ सालीं गुयरी डोंगराच्या काळकाई टोंकावरून फेकलेल्या कुलपी गोळ्यांनीं या दारूकोठाराचा नाश झाला. मागें एके ठिकाणीं द्रव्याला लालचावलेल्या रायनाक महारानें माऱ्याची जागा दाखवून दारूकोठारें जाळून टाकिलीं.

असें लिहिलें आहे तींच हीं कोठारें. या काळकाई टोकालाच पोटल्याचा डोंगर असें म्हणतात.

१२. भवानीटोंकः– जगदीश्वराचें देवळाच्या थेट पूर्वेस पुष्कळ ओसाड जागा आहे. किल्यावरील शिबंदी या भागांत राहत होती. राज्याभिषेकांचें वेळीं आलेल्या इंग्रज वकीलास इकडेच उतरण्यास जागा दिली होती. या पुढील टोंक तेंच भवानी कडा होय. याच टोकावर अगदीं अवघड जागीं भवानींचें देऊळ आहे. वाट इतकी अवघड आहे कीं, सामान्य प्रवासी तेथें जाऊं शकत नाहीं. देवीचा भोपी सुद्धां दर मंगळवारीं पूजा करण्यास जातो. कड्याच्या अगदीं टोकावरून उभी उतरंडीची वाट आहे. शिवाजी महाराजांनीं आपल्या वरदायिनी कुलदेवतेचें बांधिलेलें देऊळ तें हेंच होय.

१३. टकमकटोंकः–कडेलोटाची शिक्षा केलेले अपराधी या टोकावरून लोटून देत. ही शिक्षा होतांना लोक टकमक बघत राहत यावरून या टोका-हें नांव पडलें असावें, हा कडा अगदीं लंब रेषेंत तुटला आहे. बाजार पेठेंतून थेट उत्तरेकडे गेलें असतां या टोकावर प्रवासी पोहोंचूं शकतो.

हिरकणीटोंकः–राजवाड्याचे पश्चिमेस ३ टप्पे उतरून गेल्यावर हें टोंक लागतें. दुसरा टप्पा उतरण्यास त्रासाचा असल्यामुळें कातळ खोदून २७ पायऱ्या केल्या आहेत. या ठिकाणीं राण्यांचें हवा खाण्याचें ठिकाण म्हणून जें सांगितलें आहे, तेथून थेट पश्चिमेस जाणाऱ्या रस्त्यानें येणें सोपे. तिसऱ्या टप्प्यावर म्हणजे हिरकणी टोंकाच्या कडेवर उभें राहिलें असतां खालीं खूपलढा बुरूज दिसतो. हिरकणी हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, खाल-च्या वाडीवरील एक गवळण कोजागिरी पौर्णिमेस दूध घेऊन गडावर आली होती. तिला किल्ल्याचे दरवाजे रात्रीं बंद झाल्यामुळें खालीं येतां येईना. तिचें तान्हें मूल घरीं होतें. त्याला पाजण्याची तिला अत्यंत उत्कंठा लागली. पण किल्याचा दरवाजा उघडणें अशक्य म्हणून तिनें या टोकाव-रून खालीं उडी घातली. आश्चर्य हें कीं इतक्या उंचीवरून उडी टाकून ती सुखरूप खालीं उतरली. तिचें नांव हिरकणी होतें. हिरकणीचें हें अजब कृत्य महाराजांच्या कानावर गेल्यावर त्यांनीं या ठिकाणीं बुरुज बांधून त्याला ' हिरकणी बुरुज हें नांव दिलें.

१४. किल्ल्यावर तोफा बऱ्याच आहेत. चौदा पंधरा सहज दिसतात. धमशाळजवळील एकीवर ४।१।१९१६ असें खोदलें आहे. हिच्या कान्यांत खिळा मारला आहे. बाकीच्या तोफावर अक्षरें वगैरे कांहीं नाहींत. त्यांच्या कान्यांत खिळे मारलेले नाहींत.

अंधारकोठड्याः—राजवाड्याचे दक्षिणेस, व राण्यांच्या महालाच्या पूर्वेस तीन कोठड्या आहेत. पैकीं दोहोंची खोली सुमारें २५।३० हात आहे. तिसरी ओहरल्यामुळें दहा बारा हात खोल आहे.



# प्रकरण ११ वें

## उपसंहार




त्रपती शिवाजी महाराजांच्या नव्या व बहुमान्य जन्मतिथीप्रमाणें येत्या फाल्गुन व॥ ३ शके १८५१ ला त्रिशत सांवत्सरिक महोत्सव महाराष्ट्रभर मोठ्या प्रमाणावर साजरा होणार आहे. त्यावेळीं महोत्सव रूपी भावनोत्कट पण तात्कालिक गुणसंकीर्तनाबरोबरच वाङमयस्वरूपी विचारप्रवर्तक व चिरकालिक व्हावें, असें अनेक शिवभक्तांनीं ठरविलें. शिवजन्माला ३०० वर्षें पूर्ण झालीं; तरी देखील संपूर्ण साधार व सत्य शिवचरित्र निर्माणकरण्याइतका आत्मविश्वास इतिहासज्ञांस आला नाहीं, असें म्हटलें असतां फारसें चुकणार नाहीं. परंतु महाराष्ट्राच्या इतिहाससंशोधनाच्या कार्याची झपाट्यानें प्रगति होत असून शिव–चरित्राच्या साधनसामग्रीची भरपूर जुळवाजुळव झाली आहे. त्याचें दृश्य फल म्हणजेच त्रिशत सांवत्सरिक उत्सवप्रसंगीं प्रसिद्ध होणारा हा ग्रंथ होय. भावी शिवचरित्र ग्रंथाचा हा पाया होय ! या सत्य व साधार पायावर उभारलेलें शिवचरित्र तरुणांच्या मनांत नव्या आकांक्षा उत्पन्न करील ! महाराष्ट्रीयांचीं मनें आजच शिवभक्तीनें भरून गेलीं आहेत. “ शिवाजी आमुचा राणा । भवानी आमुची माता ” ही नव्या कविशाहिराची ललकारणी साऱ्या मराठ्यांच्या हृदयांत घुमून राहिली आहे. शिवाजीच्या नांवानें मोहित झालेले आजचे मराठे देखील सारे भेदभाव विसरून एकमुखानें त्या “शिवनामाचा” जयजयकार करीत आहेत.

२. अशा वेळीं महाराष्ट्रापुढें शिवाजी महाराजासंबंधी जितक्या गोष्टी ांडल्या जातील तितक्या पाहिजेच आहेत. प्रस्तुत ग्रंथ याच दृष्टीनें लेहिला आहे. हें वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. त्रिशतसांवत्सरिक ाहोत्सव प्रसंगीं व्हावयाच्या वाङमयपूजेंतील हें एक लहानसें तुलसीपत्र ाहे ! हें तुलसीदल अत्यंत भक्तिभावानें "रायगडावरील शिव-समा- ोला" गरिबाचें पूजासर्वस्व म्हणून अर्पण असो ! त्या प्रसंगीं शिव-चर- ावर समर्पण केल्या जाणाऱ्या कमालखानी व गेंदबाज हारतुऱ्यांच्या ानानें हें तुलसीपत्र म्हणजे कोण्या झाडाचा पाला ! पण भक्तिभावाला ुकेलेला शिव-प्रभु ही माझी सेवा गोड करून घेवो व वाचकवृंदाच्या नांत ह्या ग्रंथाबद्दल असेंच प्रेम उत्पन्न करो अशी त्यांच्याच चरणीं वेनंति करून उपसंहाराच्या उपसंहाराकडे वळतो !

३. प्रस्तुत पुस्तकाचे दोन भाग पडतात. हें वाचकांना दिसून आलेंच असेल. एक ऐतिहासिक व दुसरा स्थलवर्णनात्मक ! पहिल्या प्रकरणांत महाराष्ट्रांतील किल्ल्यासंबंधानें भौगोलिक दृष्ट्या विचार केला असून, मराठी राज्याचें किल्ले हेंच प्राण कसें हें थोडक्यांत दाखविलें आहे. प्रस्तुत ग्रंथारंभीं हा विषय घेण्याचें कारण वर्ण्य विषय जो "राजधानी रायगड" तो एक किल्ला असून इतर सर्व ठिकाणापेक्षां राजधानी करण्यास शिवाजी महाराजांस तोच जास्त योग्य वाटला; तेव्हां तत्काळीं किल्ल्याचें वैशिष्ट्य तरी काय होतें हें वाचकांच्या लक्षांत यावें हें होय. कै. दे. भ. शि. म. परांजपे यांनीं देखील "मराठ्यांच्या लढाया" या पुस्तकांत 'मराठी किल्ले' या नांवाचा लेख लिहून मराठेशाहीच्या अंतकाळीं देखील हे किल्ले कसे उपयोगीं पडले हें दाखविलें आहे.

रायगडचें आजचें दर्शन हें प्रकरण वाचकास पाचाडपासून जणूं काय हातांशीं धरून रायगडावरील आजचे प्रत्येक दृश्य दाखवील. वाचक हें पुस्तक घेऊन रायगडावर कोणच्याही मदतीशिवाय तो संपूर्ण गड पाहूं शकेल. आजपर्यंत पुष्कळ प्रवाशांना वाटाड्ये न मिळाल्यामुळें रायगडावर गेल्यावर कोठें काय आहे, व कशाला काय म्हणतात, हें समजण्याची

मोठी पंचाईत पडे; ती अडचण सर्वस्वी दूर करण्याचा प्रयत्न आहे किंवा नाहीं हें वाचकांनीं स्वानुभवानेंच ठरवावें.

बृहन्महाराष्ट्रांतील कोणत्याही ठिकाणापासून रायगडावर येण्याचे सविस्तर मार्ग दिले आहेत. त्यामुळें कोणाही प्रवाशाला रायगडचा मार्ग शोधण्याची खटपट उरली नाहीं. रायगडच्या आसपास कांहीं ऐतिहासिक महत्त्वाचीं स्थळें आहेत. ज्या कोणा हौशी प्रवाशाला निवांतपणा असेल त्याला रायगडाभोंवतीं असलेल्या मनोहर दृश्याचा आस्वाद घेण्यास या पुस्तकाचा उपयोग होईल.

शिव–कालापासून रायगडचा जितका इतिहास आज उपलब्ध आहे, तितका सर्व देण्याचा प्रयत्न केला आहे. * वास्तविक रायगडच्या आसपास असलेल्या खेड्यांत हिंडून रायगडविषयक कांहीं नवीन संशोधन करून हा इतिहास लिहिला असता तर पाहिजे होता. पण दोन दृष्टींनीं हे शक्य जाहले नाहीं.

एक पुस्तक लिहिण्याचा संकल्प आचरणांत आल्यापासून अवधि थोडा राहिला. स्वतःच्या पोटाचा व्यवसाय व पुस्तकाच्या लिखाणाचा व्यवसाय यापुढें संशोधनास स्वास्थ्यच मिळेना. दुसरें, दोन तीनदां संशोधनाचा प्रयत्न केला. त्यांत असें आढळलें कीं लोकांचा विश्वास बसून कागदपत्र हातीं येण्याला कै. राजवाड्यासारखा सर्वसंगपरित्यागी संशोधकच हवा; किंवा एखाद्या संस्थेचा तरी पाठिंबा हवा. अर्थात् ह्या दोन्ही गोष्टी नसल्यामुळें संशोधन शक्य झालें नाहीं. सुदैवानें पुस्तकाची द्वितीयावृत्ती काढण्याचा सुयोग आला, तर ही उणीव भरून काढण्याच्या तजविजींत आहे.

शिवपूर्वकालीन रायगडचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं हें स्पष्ट दाखविण्याकरतांच जणूं काय "शिवपूर्वकालिन इतिहास" हें प्रकरण

* शिवराज्यारोहण प्रसंगाचे शब्दचित्र मुद्दाम सविस्तर दिलें आहे. बारीक सारीक समारंभाचीं वर्तमानपत्रीं भडक वर्णनें वाचणाऱ्या वाचकांस स्वराज्यकालीन अत्यंत महत्त्वाच्या मोठ्यांत मोठ्या महोत्सवाचें सत्य वर्णन गोड वाटेल यांत नवल काय ?

दिलें आहे अशी टीका कोणा टीकाकारानें केल्यास ती मान्य केल्यावांचून गत्यंतर नाहीं. कारण शिवपूर्वकालीन रायगडची माहिती मला कोठेंच आढळली नाहीं. कोणा वाचकास आढळल्यास त्यानें मला कळवावी, मी तिचा साभार स्वीकार करीन. असो. या प्रमाणें प्रस्तुत ग्रंथाच्या विषयाचा थोडक्यांत आढावा आहे.

४. शेवटीं ज्या प्रभुकृपेनें ही वेडीवांकडी सेवा करण्याचें सामर्थ्य दिलें, ज्या रायगडाच्या नित्य दर्शनानें माझी स्फूर्ति सतत टिकविली व ज्या रायगडच्या राजराजेश्वराची अल्पशी वाङ्मयपूजा करण्याचें भाग्य लाभलें, त्या प्रभूला, रायगडाला व राजराजेश्वर शिव-नृपाला अभिवादन करून हें पुस्तक संपवितों.



# परिशिष्ट.

## दिलचंगा.

१. [ रायगडावरील गंगासागर तलावाविषयींची आख्यायिका. ]

श्री० भालचंद्र कवि [ महाड ] यांनीं केलेली; त्यांच्याच परवानगीनें प्रसिद्ध करीत आहों.

शिवराया अभिषेक कराया । विष्णूपद रायातें याया ॥
सर्व सिद्धता महाराष्ट्र करी । गंगेच्या कावडी झडकरी ॥
आणाया काढिले निवडुनी । श्रेष्ठ ब्राह्मण! तोंच येऊनी ॥
जरी एक आरडला नंगा । दिलचंगा–कठवठमें गंगा ॥ १ ॥
टकमक बघती सर्व त्याकडे । म्हणती वदतो साचें कोडें ॥
गंगेच्या कावडी झडकरी । आणाया पाहिजेत द्विजकरिं ॥
म्हणशी बाबा तूं काय परी? । गंगा येती रे काय घरीं? ॥
जटी परी आरडला नंगा । दिलचंगा कठवठमें गंगा ॥ २ ॥
आरडुनी हें दंड करींचा । रोवी भूमीं रुद्रचि साचा ॥
भासे! भार जटेचा विखरे । नेत्रीं दावाग्नीच त्या स्फुरे ॥
टकमक बघती भयाभीत तें । वदती शब्द न कुणी एक ते ॥
जटी परी आरडला नंगा । दिलचंगा–कठवठमें गंगा ॥ ३ ॥
आरडतां हें दंड करींचा । काढी भूमीं! गंगा वेगें ॥
उडी घेतसे त्याच्या संगें । धो–धो वाहे प्रवाह साचा ॥
टकमक बघती सर्व तदातें । वदती गंगा कैशी येथें? ॥
जटी परी आरडला नंगा । दिलचंगा कठवठमें गंगा! ॥ ४ ॥
आरडुनी हें क्षणांत झाला । दृष्टीला पारखा! विराला ॥
वातावरणीं कीं तेजीं तों । टकमक बघती–वदती ' हा, तों ॥
सांबचि! शिवरायास्तव आणी । पाताळांतुनि गंगापाणी ॥
वाणी सांब करी तो नंगा । दिलचंगा कठवठमें गंगा ॥ ५ ॥

सहस्रकर लागुनी झडकरी । ' गंगासागर ' निर्माण करी ॥
शिवराया अभिषेक होतसे । विष्णूपद रायास येतसे ॥
शिवराया दिलचंगा ! गंगा । कठवठमें कांये ना सांगा ? ॥
कारण वाणी साच अभंगा । दिलचंगा कठवठमें गंगा ॥ ६ ॥
हीन दीन जी जनता-गाई । तिच्या रक्षणीं निजबल वही ॥
स्वार्थाचा होम जयें केला । भीतीला लावी भ्यायाला ॥
ऐसा शिवराया दिलचंगा । कठवठमें कां ये ना गंगा ? ॥
कारण वाणी सच्चिद्रंगा । दिलचंगा कठवठमें गंगा ॥ ७ ॥

# अनुचर.

२. [ श्री शिवाजी महाराजांबरोबर त्यांचा आवडता कुत्रा चितेंत उडी घेऊन मेला. ह्या आख्यायिकेवर श्री. भालचंद्र कवि [ महाड ] यांनीं केलेलें काव्य, त्यांच्या परवानगीनें देत आहे. ]

शिवराजे निजधामा गेले । भग्न हृदय जन अवघे झाले ।
राष्ट्र अश्रुनीं साचें न्हालें । परी एकला अश्रु न ढाळित ।
बावरूनी बघतो । कुत्रा त्यांचा तो ॥ १ ॥
धाय मोकलित रथारूढ तें । पुण्य श्लोकाचें शव करितां ॥
हंबरडा फोडी ती जनता । परी एकला दुःख न करितां ॥
रथीं उडी घेतो । कुत्रा त्यांचा तो ॥ २ ॥
विशालाकृती, भिसाळ ढवळा । श्वानकेसरि नरकेसरिचा ॥
ऐसा जो जगताला गमला । साचा अनुचर छत्रपतीचा ॥
सवे रथीं चढतो । कुत्रा त्यांचा तो ॥ ३ ॥
स्वारी शेवटली हाले ती । भगवा झेंडा हत्ती पुढती ।
सहस्र हय गज त्या मागूती । 'धडड' सलामी भांडी देतीं ।
परी उगी बघतो । कुत्रा एकचि तो ॥ ४ ॥
स्वारी शेवटली येतां ती । श्री जगदीश्वर देवा पुढतीं ॥

धाय मोकलित रथा खालतीं । शिवरायाचें शव तें घेती ।
उडी खालिं घेतो । कुत्रा त्यांचा तो ॥ ५ ॥
शय्या शेवटली ती होतां । चंदन काष्ठाची ती वरती ॥
हंबरडा फोडित जनता ती । शव ठेउनि त्या अग्नी देतां ॥
आंत उडी घेतो । कुत्रा त्यांचा तो ॥ ६ ॥
शिवराजे निजधामा गेले । राष्ट्र अश्रुंनीं साचें न्हालें ॥
भग्न हृदय जन अवघे झाले । परी एकटा एकनिष्ठ तो ॥
त्यांच्या सह जातो । कुत्रा त्यांचा तो ॥ ७ ॥
त्यांच्यासह जाउनियां होई । समाधिस्थ त्यांच्या जवळी ही ॥
त्यांच्यासह पूज्यपदा घेई । एकनिष्ठता गुणेंचि ऐसा ॥
श्रेष्ठपदीं वसतो । कुत्रा केवळ तो ॥ ८ ॥

---

# हिरकणी.

३ [ रायगडावरील 'हिरकणी' टोंकाविषयींची आख्यायिका. श्री. भालचंद्र कवि [ महाड ] यांनीं केलेली व बडोद्याच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष रसिकवर्य तात्यासाहेब केळकर यांनीं नांवाजलेली कविता येथें देत आहे. ]

आश्विनमासीं पौर्णिमादिशीं या कोजागरिशी ।
द्वाही ऐसी शिवरायाची फिरली मुलखाशी ।
खंडोगणती दूध पातलें रायगडावरतीं ।
लाखोगणती गवळी गवळिणी घेऊनियां जमती ।
त्यांत चमकती पहा 'हिरकणी, हिरकणीच साची ।
नाजुक साजुक केवळ पुतळी पिवळी सोन्याची ।
पोरवयाची परि आवरती ती संसाराची ।
प्यारी येसाजीची–भारी तालेवाराची ।
" बत्ती ती नवलास गडींची पाहियली नाहीं ।
पाहुनि येत्यें, तान्हुकलें तें उठलें जंव नाहीं " ।

लाड कोड पुरविता धनी तो " जा ये बघ गमती ।
दूध घालवुनि फिर माघारी गवळ्या सांगाती "।
धाई येई उभी गडावर पांचाडाहुनि ती ।
दोन विसानी दोन दुधाच्या चरव्या सांगाती ।
गडीं दुधाचे समुद्र पडले त्यांतचि दोन विसा ।
दोन दुधाच्या चरव्या पडतां पडला दिवस कसा ?।
रात्र पातली नगारखाना–नौबत झडली ती ।
ऐकत गुंगत गवळ्यासंगत रमली त्यांतचि ती ।
रात्र पातली पुनवेचा तो चांद उडी घेई ।
दूध चांदणें पडे, त्यांतची बुडे तिचें मन ही ।
रात्र पातली ! सनइ चौघडे सुटले गडभर ते ।
ऐकत नादावत त्यांतचि हो वेडें पाडस तें ।
रात्र पातली बत्ति पेटली नवलाखावरती ।
पाहत पाहत चमकत झाले चांदणि त्यांतचि ती ।
बत्ती ती पाजळे मनोऱ्या वरति महालाच्या ।
जळीं तळीं भडकलीच दिसली गंगासागरिच्या ।
बत्ती ती जगदीश–देऊळीं दीपस्तंभाची ।
जिव्हा जी मोजितां होत हो मूकस्तंभाची ।
बत्ती वरती ! बत्ती खालति ! बत्ती चौफेरी ।
बत्ती ती नवलाख पेटली ह्या परि गडाभरी ।
नटली नगरी शिवरायाची इंद्रपुरीच जशी ।
बघतां गुंगे गवळ्यासंगे हिरकणि ती न कशी ।
तोफ उडे तों धडड गडींची पहिल्या प्रहराची ।
साडेसात घडी रात्रीची–दिंडी बंदीची ।
धडड ऐकतां दचके चमके हिरकणि नागिणिशी ।
जीव उडे तो ! ऊर धडाडे ! आतां गत कैशी ?।
उडे गडांतुनि धांवत, दिंडीकडेस यायाला ।
घडे पाहतां नको तेंच ! तों धीर तिचा तुटला ।

दिंडी ती मृत्युची उघडणें सोपें हो साच ।
ब्रह्माचा लेखही लिहविणें पुनरपि तैसाच ।
परी गडावरि शिवरायाच्या दिंडी उघडवितां ।
इह लोकीं ना उद्यां तयातें भुवनत्रय मिळतां ।
पाहुनि दिंडी काळ कठोरा बंद अशी हाय ।
तान्हुकल्याची पान्ह्याविण गति आतां हो काय ? ।
तान्हुकल्यारे ! करीत वेगें धरणीवर पडलीं ।
तान्हुकल्यारे करीत तीची शुद्ध बुद्ध गेली ।
दोन विसानी दोन धावते गवळी पाठिवरी ।
दिंडीशीं येऊनी पाहती घनीण धरणिवरी ।
पाणी ! पाणी ! करीत कोणी पाणी तें आणी ।
डोईवर शिंपडतां होई सावध तोंच झणीं ।
तान्हुकल्यारे ! करीत सुटली तीरा सारी ती ।
तान्हुकल्यारे ! करीत ये पश्चिमटोंका वरती ।
काळखाइसें काळकाइचें खोरें त्या खालीं ।
वरी उभी ती कांठावरती हिरकणी हो झाली ।
किर्र दरींतुनि रात किड्यांची घूं घूं घुबडांची ।
साद येत त्या ‘ तान्हुकल्यारे ! ’ पडसादचि साची ।
‘ तान्हुकल्यारे ! ’ करीत फुटला पान्हा तिजलागीं ।
पान्हा दे बळ तान्हाजीचें त्या अबले अंगीं ।
‘ तान्हुकल्यारे येत्ये आतां ! ताड माड पाही ।
पहाड सारी दूर तुला तरि आतां गत नाहीं ।
अंबेनें घडविला साच हा तासुनिया हातीं ।
तरी तुला ती माझ्यापासुनि दूर न हो करती ।
तान्हुकल्यारे ! ’ करीत टेकी हात कड्या वरती ।
दूध चांदणें भरे हरी ती तींताचि उतरे ती ।
दोन विसानी दोन पातले गवळी तों तेथ ।
‘ अब्बा ! ’ करुनि बसती मटकन मर्द तिशीं बघत ।

दूध चांदणें भरे दरी ती; तींतचि झळके ती ।
बघतां बघतां धनीण हिरकणी दर्यांतिल मोती ।
इकडे पाचाडीं येसाजी होई साच पिसा ।
हिरकणी येना म्हणुनी जैसा जळावीण मासा ।
तोफ उडे तों धडड गडींची पहिल्या प्रहराची ।
जीव उडे तों येसाजीचा; झोंपहि तान्ह्याची ।
शंभ्यानें साधिला कायरे दावा ! मुलखाचा ।
दुस्मान उभा ! कुलाशिलाचा आया बहिणींचा ।
ठेवी डोळा तिच्यावरी तो फार दिवस पाहीं ।
लेक पोळ हा सुटला, करितो राजा तरि कायी ?
बघ गे आतां बये तान्हुलें ! घेउनि मी येतों ।
तीशी दिंडी फोडुन ! बघतों काय बाप करितो ।
सडा उडाला आंवळुनी जरि फेटा डोईशी ।
फडा टाकली मेढ उपटली ती हिसक्यासरशी ।
टाकी ती खांद्यावर हा कीं भीमसेन दुसरा ।
गदा टाकुनी स्कंधीं धांवे शत्रूसंहारा ।
चोरटाग त्या आंब्यापाशीं एकदमी येई ।
तोंच झळकली तळीं पहाडा हिरकणि ती पाही ।
धनी देखतां अंगावरती उडी तया घेई ।
मेढ टाकुनी हातीं तीशीं झली तो घाई ।
खांद्यावरती टाकी, ठोकी धूम घरा येई ।
'तान्हुकल्यारे' करतां हातीं तान्हुकलें देई ।
दुज्या दिशीं ती वार्ता सरशी जातां रायाशीं ।
पाचारी तो झणी हिरकणीशी—येसाजीशी ।
प्रभू प्रजेचा सिंधू साक्षात् तो वात्सल्याचा ।
चोळी पातळ गांव देऊनी गौरव करि साचा ।

## परिशिष्ट ( ब )

कुलाबा जिल्हा बोर्डानें रायगडासंबंधी केलेली तजवीज.

महाड तालुका बोर्डाचा ठराव नं ११२ ता. ९।३।२८ चा खालीं लिहिल्याप्रमाणें—

"मे. केशव अंताजी हर्डीकर यांनीं, रायगडावर तलावाची व रस्त्याची बोर्डाकडून जरूर ती दुरुस्ती झाली आहे, परंतु तेथें धर्मशाळा असणें फार जरूर आहे, करितां सदर धर्मशाळेकरितां एस्टिमेट तयार करून डि. बोर्डाकडे पाठवावें."

रायगडावरील धर्मशाळेचा खर्च सुमारें ९३००रुपये आहे.

रायगड फंड प्रचारक श्री. आठवले यांनीं आजपर्यंत सुमारें ३२००० रुपये वर्गणी जमविली आहे.

रायगडावर धर्मशाळेकरिता १० गुंठे जागा देणेबद्दलचा सरकारी ठराव पुढील प्रमाणें आहे.

---

G. R. R. D. 2148124
20-1-29

The grant to the District Local Board kolaba of land, measuring 10 gunthas free of revenue & occupancy price for the construction of a Dharmashala in the Rayagad fort, Taluka Mahad, i sanctioned subject to the conditions prescribed in No. 36 of the Land revenue rules and the following additional canditions that the building shall be errected according to the instructions given and on the site pointed out by the superintenden Archaelogical survey Westeru Circle.

[2] Government have no objection to allowin the Board to use loose stones and bricks lyin about the fort for the construction of the buildin in accordance of the directions of the superintendent of Archaelogical survey Western Circle.

# परिशिष्ट २ रें

## रायगडावरील इंग्रज कैदी—शिवकाल

( शं. ना. जोशी. )

श्रीशिवाजीराजांच्या सैन्याचा इंग्रज वखारवाल्यांशीं प्रथम व प्रत्यक्ष संबंध असा श. १५८१ ( इ. स. १६६० मार्च ) मध्यें आला. दोन महिन्यांपूर्वी म्ह. मार्गशीर्ष वद्यांत ( ७ मी, ता. १०-११-१६५९ ) अफजलखानाचा वध झाल्यानंतर शिवाजीचें सैन्य अदिलशाही मुलखांत उत्तर, दक्षिण व पूर्व ह्या तिन्ही दिशांकडील प्रांत हस्तगत करण्याकरतां चाल करून गेलें. कोंकणांतहि शिवसैन्याचा एक भाग दोरोजी नामक सेनापतीच्या आधिपत्याखालीं गेला होता. अफजलवधानंतर खानाचें सामान घेऊन तीन गलबतें राजापुरास या वेळीं नांगरून उभीं होतीं. अर्थात् हीं गलबतें ताब्यांत घेण्यासाठीं दोरोजीनें प्रयत्न चालविला. परंतु, राजापूरचा अदिलशाही सुभेदार जो अब्दुल करीम त्याच्या देण्याघेण्याच्या भानगडीमुळें इंग्रज व्यापारीहि हींच गलबतें आपल्या आधीन असण्याबद्दल खटपट करीत होते. अशा प्रकारें शिवाजीचें सैन्य व इंग्रज सौदागर ह्यांचा एव्हां संबंध आला. ह्या बाबतींत इंग्रज व्यापाऱ्यांशीं दोरोजीचा खटका उडून दोरोजीनें राजापूर वखारीवरील इंग्रज व्यापारी जो गिफर्ड ह्यास व त्याबरोबर एक दलाल यास पकडून नेलें ( ता. २०-१-१६६० ). विजापुरकरांतर्फे ह्यावेळीं राजापूर हें रुस्तुमजमाकडे होतें, आणि रुस्तुमाचा इंग्रजाप्रमाणें शिवाजीशींहि सलोखा होता; यामुळें गिफर्डच्या कैदेविषयीं रुस्तुमजमाकडे तक्रार येतांच रुस्तुमाचा हा संबंध लक्षांत आणून व गिफर्डनें सुटका झाल्यावर शिवाजीस दंडाराजपूर घेण्यास सहाय्य करण्याचें पुनः कबूल केल्यामुळें गिफर्डची सुटका झाली. पण इंग्रजांच्या अतिलोभामुळें ह्या गिफर्डला इतर

इंग्रजासमवेत पुनः शिवाजीच्या कैदेंत पडावें लागलें; आणि ते इंग्रज कैदी रायगडावर ठेविले होते. तो प्रसंग असाः—

अफजलप्रसंगानंतर १५ दिवसांनीं शिवाजीराजांनीं पन्हाळा किल्ला घेतला. पुढें श. १५८२ 'चैत्र शुद्ध प्रतिपदेस राजश्री शिवाजीराजे फिरोन' पनालि ( या ) स आले. मग सिदी जोहार येऊन पनालियास वेढा घातिला. सिद्दीला राजापूरच्या वखारवाल्या इंग्रजांकडून तोफेचे गोळे वगैरे सामान पुरविलें जात होतें. इंग्रज व शिवाजी यांचा स्नेही असलेल्या रुस्तुमजमानें ह्या इंग्रजी व्यापाऱ्यांना, तुम्ही ह्या वेळीं युद्धसामग्री पुरविण्यांत सामील होऊं नका, असें सांगितलें असतां, व विशेषतः तसा कंपनीचाहि स्पष्ट इशारा असतां राजापूरच्या वखारवाल्यांनीं तें न ऐकतां सामग्री पुरविली. रुस्तुमजमानें इतकेंहि सांगितलें कीं, तुमचा माल खपविणें एवढाच हेतु असला तर तो माल मजकडे द्या. पण ह्या सांगण्याकडेहि दुर्लक्ष करून इंग्रजांनीं शिवाजीच्या शत्रुपक्षाला गोळे पुरविले. पुढें पन्हाळाप्रकरण आटोपून शिवाजीनें जेव्हां *राजापूर घेतलें ( श. १५८२ माघ ) तेव्हां शिवाजीनें इंग्रजांच्या ह्या आगळिकीचें चांगलें उट्टें काढिलें. म्हणजे त्यांची वखार लुटली, तेथील जमीन खणून संपत्ती नेली व फिलिफ गिफर्ड, हेन्री रेव्हिंगटन, रंडाल्फ टेलर इत्यादि ७,८ इंग्रजांना कैद केलें.प्रथम ह्या कैद्यांना वासोटा किल्यावर (ले.$८४८) कांहीं दिवस ठेविलें; तेथून त्यांना सोनगड–कुलाबा ( ले. ८५२ ) येथें नेलें; आणि तेथून रायगडावर ठेविलें; ते तेथें सुटेपर्यंत होते (ले. ८७४,९०७).

रायगडावर जाण्याच्या पूर्वीं सोनगडावरून ह्या कैद्यांच्या सुटकेविषयीं बरेच प्रयत्न झाले. 'आमची सुटका न होईल तर औरंगजेबाचें सैन्य सुरतेहून दख्खनमध्यें आणण्यास आम्ही मदत करूं' अशी धमकावणीहि कैद्यांच्या मार्फत दिली गेली. नंतर एक हजार होन खंडणी देण्याचेंहि कबूल करण्यांत आलें. पण सुटका होण्याचें चिन्ह दिसेना. रायगडावर गेल्यावर त्या कैदी मंडळींनीं प्रे. ॲन्ड्रयूजला आपल्या सुटकेविषयीं खटपट करण्याबद्दल दोन

*चिटणीस व शिवदिग्विजय बखरींमध्यें राजापूर घेतल्याचा शक १५७० दिला आहे. ता बरोबर नाहीं. $हे लेख शिवकालीन-पत्र-सार संग्रह ह्या ग्रंथांतील आहेत

तीन पत्रें मोठ्या उत्सुकतेनें पण जरा रागानेंच लिहिलीं. कारण त्यांचे उत्तरीं प्रे. लिहितात कीं, "आपल्याला कैद कां प्राप्त झाली हें तुम्ही चांगलें जाणतां. कंपनीच्या मालाचें रक्षण केलें म्हणून ही कैद प्राप्त झाली नसून पन्हाळ्याच्या वेढ्यांत जाऊन इंग्रजांचा बावटा फडकावून गोळे उडविल्याबद्दलचें हें प्रायश्चित आहे. शिवाजी नसता आणि दुसरा कोणी असता तरी ज्याला म्हणून असल्या अत्याचाराबद्दल सूड उगविण्याचें सामर्थ्य आहे तो तसाच वागला असता. व्यापाऱ्यांनीं दारुगोळ्यासारखा माल विकावयाचा नसतो किंवा शत्रुसैन्यावर उडवावयाचा नसतो. परदेशांत असे उपद्व्याप केल्यास मग त्याचें फळ भोगावें लागतें. तुमच्या कैदेचें हेंच खरें कारण आहे. रेव्हिंगटनला स्वतःला शिवाजीची, दारुगोळा न विकण्याबद्दलची आज्ञा माहीत होतीच."ह्यावरून ह्या कैदी मंडळींनीं आपल्या-बरोबर आपल्या वखारीवरहि जी आपत्ती ओढविली ती केवळ त्यांच्याच गुणांनीं होय असें स्पष्ट होतें. ह्या कैद्यांचे तुरुंगांतच वर्ष सवावर्षावर दिवस गेल्या-नंतर सुरतेच्या इंग्रजांनीं ठरविलें कीं, शिवाजीचीं कांहीं गलबतें मक्केहून येणार आहेत तीं पकडूं आणि दरम्यानीं सांपडेल त्यासहि मोकळें सोडणार नाहीं. ह्या मार्गानें काय होतें तें पाहूं ( ले. ८८८ ). पण ह्या मार्गापेक्षा राजापूरचा शिवाजीचा अंमलदार रावजी पंडित ह्याचेंहि मन वळविण्याचा प्रयत्न करावा; विशेषतः शिवाजीचीं जीं गलबतें मोठ्या किमतीचा माल भरून मक्केकडे जाणारीं आहेत तींच हल्ला करून धरावीं असें ठरविलें. शेवटीं इतक्या निकरावर ही गोष्ट येण्याच्या पूर्वींच ह्या रायगडावरील कैद्यांची सुटका झाली ( इ. १६६३ जाने. १७ ). जवळ जवळ दोन वर्षे हे इंग्रज कैदेंत होते. पुढेंहि रायगड हा राजकीय कैदी ठेवण्याची जागा म्हणून उपयोगांत आणिलेला दिसतोच. असो. अशा प्रकारें श. १५८२ अखेर ते १५८४ माघ व. ४ पर्यंत ( इ. १६६१ ते १६६३ जाने. १७ ) हे राजापूर वखारीमधील इंग्रज कैदेंत होते आणि त्यापैकीं शेवटचें वर्ष हे कैदी रायगडावर होते.

# परिशिष्ट ३ रें

## रायगड-शकावली

( शं. ना. जोशी. )

११ वें शतक- रायगडावर यादव सत्ता, मराठे पाळेगारांचा ताबा.

१२ ,, यादव सत्ता.

१३ ,, विजयानगरकर मांडलीक. पाळेगार ( शिर्के ? )

१३५८ ,, हा अल्लाउद्दीन बहामनीच्या अधिपत्याखालीं येतो.

१४०० सुभा रायरी निजामशाहीकडे येतो. येथील देशमूख शिर्के. त्यांचे मुतालीक दलपतराव, पाताणे प्रभु

१५५८ ,, आदिलशाहीकडे येतो, चंद्रराव मोरे यांचा ताबा.

१५७८ चैत्र व. ७ ( ६।४।१६५६ ) शिवाजी राजे रायरीस येतात.

,, वैशाख ( एप्रील १६५६ ) रायरी गडावर शिवाजी राजांचा अंमल.

१५८३ फाल्गुन ( इ. १६६२ )
१५८४ माघ व. ४ (१७।१।१६६३) } राजापुरचे वखारवाले रेव्हिंग्टन, गिफर्ड इत्यादि इंग्रज शिवाजीच्या अटकेंत.

१५९२ ( इ० १६७० ) शिवाजीची मुक्कामाची जागा.

१५९४ ( इ० १६७२ ) रायगड दुरुस्ती.

१५९६ ज्येष्ठ शु. ४ ( २९।५।१६७४ ) शिवाजीची मुंज.

,, ,, शु. ६ ( ३०।५।१६७४ ) शिवाजीचा सोयराबाईशीं वैदिक मंत्रानें विवाह.

,, ,, शु. १३ ( ६।६।१६७४ ) राज्याभिषेक समारंभ.

,, ,, वद्य ९ (१७।६।१६७४) माता जिजाबाईचा, पायथा पाचाड,

,, आश्विन शु. ५ (२४।९।१६७४) शिवाजीचें पुनः सिंहासनारोहण
१६०१ फाल्गुन व. २ ( ७।३।१६८० ) राजारामाची मुंज
,, ,, वद्य १० (१५।३।१६८०) राजारामाचें प्रतापराव गुजराच्या कन्येशीं लग्न.
१६०२ चैत्र शु. १५ ( ३।४।१६८० ) शनिवारीं दुपारीं शिवाजीचें स्वर्गारोहण.
,, वैशाख शु. ३ ( २१।४।१६८० ) राजारामाचें मंचकारोहण.
,, आषाढ शु. २ ( १८।६।१६८० ) संभाजी राजाचें पन्हाळ्याहून △ आगमन.
,, ,, शु. ११ ( २७।६।१६८० ) पुतळाबाई–शिवाजीपत्नी सती जाते.
,, श्रावण शु. ५ ( २०।७।१६८० ) संभाजी मंचकारोहण
,, आश्विन वद्य ( १६८० आक्टो. ) मोरोपंत पिंगळे प्रधान मृत्यु.
,, माघ शु. ७ ( १६।१।१६८१ ) संभाजी सिंहासनाधिष्ठित होतो.
१६०५ पौष शु. १५ ( २३।१२।१६८३ ) रायगडीं संभाजी मुक्काम.
१६१० कार्तिक ( १६८८ आक्टो. नवं. ) संभाजी रायगडाहून कविकलुशाच्या मदतीकरतां जातो.
१६११ चैत्र शु. १५ ( २५।३।१६८९ ) झुलपुकारखानाचा रायगडास वेढा.
,, चैत्र व १० ( ५।४।१६८९ ) राजाराम रायगडाहून पळून प्रतापगडास जातो.
,, मार्ग. शु. २ ( ३।११।१६८९ ) रायगड मोंगलास दिधला.
१६१४ ज्येष्ठ शु. ७ ( १२।५।१६९२ ) रायगड हस्तगत करण्याबद्दल छ. राजारामाकडून उत्तेजन व मदत
शंकराजी नारायण रायगड घेतात
रायगड शिद्दी याकुतखानाकडे जातो.
१६५५ अ. आषाढ शु. ८ (८।६।१७३३) रायगड पंतप्रतिनिधी घेतात.

१६५५ कार्तीक ( १७३३ आक्टो. नवं. ) हबशियाचा रायगडास वेढा.
१६९४ ( इ. १७७२ ) रायगडावरील किल्लेदारांचा दंगा
१६९५ ( १७७३ ) ,, ,, ,, बंदोबस्त
१६९८ (इ. १७७६) सदाशिवराव भाऊंच्या तोतयाची रायगडकडे चाल.
१७०० जेष्ठ शु. १५ (१०।६।१७७८) शिद्दीकडील लोकांचा पुन्हा दंगा.
,, श्रावण शु. ३ ( २६।७।१७७८ ) ,, ,, बंदोबस्त.
१७१२ जेष्ठ व. ३ ( ३१।५।१७९० ) रायगडवर शिद्दी याजकडील कैदा.
१७२४ कार्तिक ( १८०२ नवं. ) दुसऱ्या बाजीरावांचे रायगडहून वसई-कडे प्रयाण.
१७३१ पौष व. १३ ( २।२।१८१० ) रायगड—माची येथें बाजीरावांचा मुक्काम.
१७३८ ( इ. १८१६ ) रायगड इंग्रज कंपनीच्या ताब्यांत जातो व परतहि लगेच घेतला जातो.
१७४० चैत्र व. ५ ( २५।४।१८१८ ) इंग्रज कंपनीचा रायगडास वेढा व लढाई.
,, वैशाख शु. १ ( ६।५।१८१८ ) पर्यंत बाजीरावपत्नी किल्ला लढवितात. शेवटीं पराभव.
,, वैशाख शु. ५ ( १०।५।१८१८ ) तह होऊन रायगड इंग्रजांकडे गेला.

---

इ. स. १८९५ रायगडीं शिवोत्सव—लोकमान्य पुरस्कृत.
१८९६ ,, ,, फार मोठा
१९०० ,, ,, दुसरा उत्सव.
१९०६ ,, ,, तिसरा ,,
१९२६ ,, ,, चौथा ,,

# परिशिष्ट क्र. ४



## कांहीं खुलासा

( शं. ना. जोशी )

खालील मजकुरांत दुरुस्तीसह खुलासाहि असल्यामुळें स्वतंत्र परिशिष्टच करून तें जोडिलें आहे

पृ. ७ वर टीपेंत चिटणीस बखरीविषयीं, ती शाहुकालीन आहे, असें मोघम लिहिलें आहे. बखरींत प्रारंभीं ' शाहू नृप छत्रपती ' असेंच आहे. परंतु राज्याभिषेक श. १३७ ज्येष्ठ बहुल ६ असा तेथें कालाचा निर्देश केला असल्यामुळें शाहू ह्या नांवाचा योग्य खुलासा करतां येतो. रा. श. १३७ श. १७३२ ज्येष्ठ व. ६ (ता. २२।६।१८१०) हा ह्या बखरीचा शक येतो. धाकटे शाहू राजे तर श १७३० वैशाख शु.९(ता.४-५-१८०८) स निवर्तले. अर्थात ते शाहू छ. एव्हां असणें शक्य नाहीं. ह्या वेळीं छ.प्रतापसिंह महाराज हे गादीवर होते. बखरींतील टिपा प्रकरणामध्यें इ. स. १८११ हें साल पडलें आहे त्याऐवजीं वर कंसांत दिलें तें वर्ष येतें. शाहू हें नांव बखरींत आलें आहे, त्याजविषयीं, बखर लिहिण्यास आज्ञा ( धाकटा ) शाहू छ. नीं केली असावी व म्हणून त्यांचा नामनिर्देश आला असेल, असें कै. रा. ब. साने यानीं सुचविलें आहे.

पृ. १६— शिवकालीन रायगड ह्या ३ ऱ्या प्रकरणांत प्रारंभींच ' शहाजी राजांनीं विजापुराहून बाल शिवाजीस पुण्याकडे पाठविलें ' असें लिहिलें गेलें. परंतु ह्याचीच दुरुस्ती, पुढें २० व्या ओळींत ' बंगलुराहून शिवाजी महाराजांना पुणें प्रांताकडे रवाना केलें ' असें लिहिण्यांत आल्यानें झाली आहे. शिवाजी महाराजांच्या पहिल्या बारा वर्षांपर्यंतच्या आयुष्यांतील त्यांच्या मुक्कामाविषयीं अद्याप निश्चित अशी माहिती नाहीं. सध्यां इतकें म्हणतां येतें कीं, श. १५५१-१५५८ पर्यंत माता जिजाबाई व शिवाजी राजे यांचें रहाणें शिवनेरी व माहुलीस होतें; आणि शहाजी राजांना बंगळूर

बक्षीस म्हणून मिळाल्यानंतर तेथें कांहीं दिवस शिवाजी रहात असे. तेथून म्हणजे बंगळूराहून शिवाजी पुण्यास जहागिरीची व्यवस्था पहाण्यास आला.

ह्याच परिच्छेदात 'निजामशाहींतून दुसऱ्यांदा निवृत्त झाल्यावर (शहाजी) राजांना सुमारें तीन वर्षे आपल्या पुणें जहागिरीवर रहावें लागलें' असें एक वाक्य आलें आहे. परंतु याविषयीं खुलासा असाः-हीं वर्षे म्ह. १५५८ ते ६१ च्या प्रारंभापर्यंत, शहाजी कर्नाटकांतील संस्थानिकांच्या बंडाळीचा बंदोबस्त करण्याकरितां तिकडेच मोहिमेवर होता.

पृ. १७ वर दादोजी कोंडदेवाच्या मागें जहागिरीची वहिवाट विजापूर दरबाराकडून शिवाजीस मिळण्याबद्दल संशय दर्शविला आहे; तो बरोबर वाटत नाहीं. जहागिरीऐवजीं, दादोजीप्रमाणें कोंढाण्यावरील अधिकार व सुभेदारी त्या हक्कांबद्दल हें विधान मानल्यास चालेल

पृ. २०--'अफजलखानानें जावळीहून चंद्ररावाची उठावणी करतांच तो रायरीगडावर येऊन राहिला. त्याचवेळीं शिवाजी महाराज वडिलांच्या सुटकेच्या खटपटींत होते' असें आलें आहे. अफजलखानानें जावळीवर स्वारी काढली होती हें खरें; पण त्यांत चंद्रराव जावळीहून रायगडास गेला नाहीं. खानाच्या ह्या स्वारीचा काल श. १५७१ तील व चंद्रराव रायगडावर जातो श. १५७७-७८ मध्यें. रायगडावर चंद्रराव जाण्यास चंद्ररावावर शिवाजीची स्वारी हें कारण आहे; अफज०ची नव्हे. शिवाय, ह्यांतील दोन्ही कालांचा शहाजीच्या सुटकेशीं जो संबंध 'त्याच वेळीं' ह्या शब्दानें दाखविला आहे तो अर्थातच जमत नाहीं. कारण, शहाजीची सुटका श. १५७१ च्या ज्येष्ठी पौर्णिमेसच (पूर्णपणें नाहीं तरी) झाली आहे. पूर्ण सुटका पुढें चार वर्षांनीं झाली असें मानिलें तरीहि तो काल जमत नाहीं. तेव्हां हें लिहिणें येथेंच दर्शविल्याप्रमाणें दुरुस्त मानावें व तसें मानण्याची सोय ग्रंथांतही पृ. २३-२४ वरील मजकुरानें कांहींशी झाली आहे.

पृ. २१--चंद्रराव व शिवाजी यांचेमधील भांडणास ज्या गोष्टी कारणीभूत झाल्या त्यांत, गुंजणमावळच्या देशमुखीवर चंद्रराव मोरे आपला हक्क सांगू लागले, ही एक गोष्ट आहे. असें असतां, ह्या देशमुखी-ऐवजीं बिरवाडीची पाटिलकी असें १६-२२ मध्यें लिहिलें गेलें. बिरवाडी-

बद्दलचा उल्लेख ह्याच पृष्ठावर ओळ ४–६ मध्यें आला आहे, व तो बरोबर आहे.

पृ. २२––कोंढाणा किल्ला ताब्यांतून गेल्यामुळें महाराजांनीं आपले प्रयत्न रोहिडखोरें व वेळवंडखोरें यांत सुरू केले असें म्हटलें आहे. येथें विरोध असा येतो कीं, श. १५७१ मध्यें कोंढाणा किल्ला शिवाजीच्या हातांतून गेला व वेळवंडखोऱ्यांतील हालचाल आहे ती श. १५६७ मधील! तेव्हां ही हालचाल अशी जमेस धरण्याचें कारण नाहीं.

पृ. ५६–– शिवाजी महाराजांची तृतीय पत्नी हिचा मृत्यु श. १६०२ च्या आषाढांत सहगमनविधीनें झाला, असा उल्लेख आढळतो.

पृ. ५८––संभाजीराजांनीं शिवाजीच्या मृत्यूनंतर पन्हाळ्याहून येऊन प्रसिद्ध मुत्सद्यांचे व आप्तइष्टांचे अमानुषपणें खून केले असें जें बखरींतून आलें आहे तें खोटें आहे. कारण संभाजी रायगडाहून, आषाढ लागतांच आला, व मोरोपंत पेशवे यांचा मृत्यु श. १६०२ च्या आश्विनांत (स. १६८० सप्टें. आक्टो.) झाला व लगेच त्यांचे पुत्र निळोपंत यांस सोडून पेशवाई दिली. सोयराबाई ही श. १६०३ आश्वीन व ११ (२७।१०।१६८१) स वारली. तसेंच आण्णाजी दत्तो, बाळप्रभु, हिरोजी फर्जंद यांस परळीखालीं कैद करून मारविलें; तेंहि श. १६०३ च्या भाद्रपद महिन्यांत (१६८१ आग. सप्टें.). तेव्हां ह्याच पृष्ठावरील टीपेंतील मजकूर ग्राह्य धरणें इष्ट आहे.



# शुद्धि पत्र.



| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १३ | राष्ट | राष्ट्र |
| ७ | २७ | शाहुकालीन आहे | शके १७३२ मध्यें लिहिली आहे |
| ९ | २ | मावळखोर | मावळ खोरें |
| ११ | ३ | महाराष्ट्रांतील | महाराष्ट्रांतील |
| १४ | १ | साये | सोय |
| १९ | २५ | विजीपुरकरांचा | विजापुरकरांचा |
| २२ | १ | प्रकरण मध्यें | प्रकरण ९ मध्यें |
| २३ | २५ | हणमंतराव | प्रतापराव |
| २४ | ११ | चैत्र व० ७ | वैशाख |
| २६ | २६ | ऊर्फ | तर्फ |
| २७ | ११ | आहै | आहे |
| ३१ | २१ | १५८१ | १५८२ |
| ३२ | ४ | १५८२ | १५८५ |
| ३२ | (उ) (ऊ) (ऋ) हीं कलमें (ई) च्या पुढें | | |
| ३२ | ११ | + | *पान ३३ वरील टीप |
| ३२ | २२ | * | ऽपान ३३ वरील टीप |
| ३६ | १ | राजगड | रायगड |
| ३६ | ११ | वाळ | बाळ |
| ३८ | १५ | दोऊन | होऊन |
| ३८ | १९ | द्विपांत राहून | द्वीपांतराहून |

| | | | |
|---|---|---|---|
| ४० | २६ | पांदडतें | सांपडतें |
| ४१ | २० | येसूबाई | जिजाबाई |
| ४२ | १२ | राज्याभिषेकास | राज्याभिषेकासारखा |
| ४२ | १६ | वेशापैकीं | वंशापैकीं |
| ४३ | २८ | सईबाई | सोयराबाई |
| ४४ | ८ | ,, | ,, |
| ४४ | ११ | इशान्य | ईशान्य |
| ४६ | २१ | ग्रहप्रवेश | गृहप्रवेश |
| ४७ | ६ | पासुन | पासून |
| ४७ | १७ | कुलावतांस | कुलावतंस |
| ४८ | २१ | ११००० | १०००३ |
| ४८ | २४ | सत्तोजीपंत | दत्तोजीपंत |
| ५२ | ९ | आमचा | आमच्या |
| ५३ | ५ | १८ जुन | १७ जून |
| ५४ | १२ | खंड ६ | खंड ८ |
| ५७ | १३ | वा॥ | शुद्ध |
| ५८ | २५ | अभिजात | अमानुष |
| ६३ | २२ | अभिजात | अलौकिक |
| ६३ | २४ | वधाला | वधाचा |
| ६५ | १२ | १६०२ | १६१२ |
| ६७ | ४ | सिंव्हासनाचे | सिंहासनाचे |
| ६८ | १३ | धनमंत्र्यास | धूर्त मंत्र्यास |
| ७० | १२ | पुर्ण | पूर्ण |
| ७४ | ८ | वैभम्य | वैषम्य |
| ७४ | २० | भेट | भेद |

| | | | |
|---|---|---|---|
| ७९ | ८ | घऊन | घेऊन |
| ८५ | ६ | स्पोटपणा | स्फोटकपणा |
| ९७ | १० | क्षरली | भरविली |
| ९९ | ४ | राजनिष्ठेचा | अराजानिष्ठेचा |
| १०७ | ६ | फडके | वडके |
| ११८ | १८ | वरंध्याहून | वरंधेहून |
| ११९ | २६ | स्यामींनीं | स्वामींनीं |
| १२२ | १४ | दोट | दोन |
| १२२ | १७ | च्यं | अं |
| १२८ | २७ | पवित्र पादत्राणें | पवित्र समजून पादत्राणें |
| १३६ | १२ | होणारा हा ग्रंथ होय. | होणारे शि. च. मंडळाचे ग्रंथ होत. |

